युद्धरहस्य !

अथवा

महायुद्धाची

गुरुकिल्ली !

पुस्तक १ लें.

# जर्मनीचें पाताळयंत्र !

पुस्तक २ रें.

# केसरची प्रभावळ !

किंमत १। रुपाया.

युद्धरहस्य !
अथवा
महायुद्धाची
गुप्तकिल्ली !

पुस्तक १ लें.

## जर्मनीचें पाताळयंत्र !

पुस्तक २ रें.

## केसरची प्रभावळ !

किंमत १। रुपाया.

भारत-गौरव-ग्रंथमाला—पुष्प सतरावें.

# जर्मनीचें पाताळयंत्र!



न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते।

भगवान् श्रीकृष्ण.

प्रकाशक—प्र. श्री. भसे, गिरगांव—मुंबई.

मुद्रक—केशव रावजी गोंधळेकर,
'जगद्धितेच्छु प्रेस,' ४३२ शनवार पेठ, पुणें.

द्वितीयावृत्ति.

१९१७.



किंमत बारा आणे.

# प्रकाशकाचे दोन शब्द.

जर्मनीचें पाताळयंत्र आणि केसरची प्रभावळ या जोड पुस्तकाची ही द्वितीयावृत्ति असून ती आह्मी आमच्या आश्रयदात्यांच्या हातीं प्रेमपूर्वक देत आहों. युरोपखंडांत महायुद्धाची आग भडकण्यापूर्वी युरोपांतल्या कांहीं कांहीं देशांविषयीं यथार्थ माहिती मिळविण्याचें प्रयोजन अर्थातच कोणास पडलें नाहीं. कांहीं कांहीं देशांविषयींचें अज्ञान साधारण जनसमुहांतच होतें असें नाहीं, तर इतिहासाचा अभ्यास करणारांतहि होतें. जर्मन देश व जर्मन राष्ट्र अनेक बाबतींत युरोपांत प्रसिद्ध असल्यामुळें या देशाची माहिती इतिहासज्ञांस नव्हती, असें कांहीं ह्मणतां यावयाचें नाहीं; परंतु जर्मन राष्ट्रानें ब्रिटिश साम्राज्याशीं शत्रुत्व जोडून घेऊन सगळ्या जगाला आपल्या लष्करी बळाचा चमत्कार दाखविल्यावर इतिहासज्ञहि आश्चर्यचकित झाले आणि जर्मनीचा खरा इतिहास मिळविण्याचा त्यांचा प्रयत्न चालू झाला. हळू हळू ही जिज्ञासा सर्वत्र पसरून हा जर्मन शत्रू आहे तरी कसा, हें शोधण्याची इच्छा प्रत्येकास होऊं लागली. मराठी वाचकांची ही इच्छा शक्य तितक्या सुगमतेनें पुरी करावी ह्मणून हा प्रयत्न आह्मीं केला आहे. या पुस्तकाची ही द्वितीयावृत्ति इतक्या लवकर काढावी लागली, यावरून हा प्रयत्न महाराष्ट्रीयांना आवडला हें उघड दिसतें. हल्लींसारख्या बिकट स्थितींत खर्चाच्या दृष्टीनें द्वितीयावृत्ति काढणें बरेंच त्रासाचें असल्यामुळें पाहिलीच आवृत्ति आह्मीं मोठी काढली होती. असें असतांहि या पुस्तकाची ही द्वितीयावृत्ति आह्मांस घाईघाईनें प्रसिद्ध करावी लागली, यावरून युद्धरहस्य जाणण्याची इच्छा बरीच वाढली आहे, असें अनुमान काढावें लागतें. नाहीं तरी प्रत्यक्ष युद्धापेक्षां युद्धरहस्यांतच अधिक मौज आहे. आमच्या विशेष परिचयाच्या महाभारतांतहि युद्धकथेपेक्षां युद्धरहस्यच अधिक मननीय आहे. याच दृष्टीनें हल्लींहि युरोपांतल्या प्रचंड युद्धाचें रहस्य शोधण्याचा प्रयत्न सर्वत्र आढळून येत आहे. एवढीं मोठालीं राष्ट्रें कशीं लढतात, हें समजण्यापेक्षां कां लढतात, हेंच समजावून घेणें अधिक महत्त्वाचें असून

तें समजलें म्हणजे या महायुद्धाची गुरुकिल्ली सांपडली, असें ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं.

ज्या युद्धाचा परिणाम अनंत कालाच्या पोटांत तयार होत आहे, अशा प्रचंड युद्धासंबंधानें उगीच इकडची तिकडची माहिती गोळा करून वाचकांपुढें ठेवणें केव्हांहि अयोग्य असल्यामुळें आह्मीं या पुस्तकाचें लेखन साहित्य विशेष परिश्रमानें मिळवून तें शक्य तितकें मनोरंजक करण्याचाहि प्रयत्न केला आहे. इंग्रजींत गुप्त हेरांच्या विलक्षण गोष्टींचीं अनेक पुस्तकें आहेत व त्यांतल्या कांहीं पुस्तकांचा मासला मराठींतहि पहावयाला मिळतो, परंतु असल्या विलक्षण व काल्पनिक कथानकांपासून हें पुस्तक अगदीं अलिप्त असून या पुस्तकांत जर्मनीच्या राजकीय हेर खात्यांत काम करणाऱ्या डॉ. आर्मगार्ड कॉर्लग्रेव्ह या नांवाच्या हेरानें लिहिलेला अगदीं खराखरा इतिहास ग्रथित केला आहे. हा इतिहास केवळ आश्चर्यकारकच आहे, असें नाहीं, तर तो अत्यंत मनोरंजक असून मननीयहि आहे. युरोपांत युद्धाची आग भडकण्यापूर्वीं सर्व युरोपांतल्या राष्ट्रांची व त्या त्या राष्ट्रांतल्या मुत्सद्यांची मनोभूमिका कशा प्रकारची होती, याचें यथातथ्य चित्र या पुस्तकांत वाचकांना पहावयाला मिळेल. विशेषतः जर्मनीची कुटिल राजनीति व विलक्षण महत्त्वाकांक्षा यांची तर चांगलीच ओळख वाचकांना पटेल अशी आमची समजूत आहे.

केसरची प्रभावळ या पुस्तकाची लेखनसामग्री एकत्र करतांना श्रम, पैसा व वेळ हीं बरींच खर्च झालीं आहेत. हा प्रयत्न लोकांना आवड ल्यास या सर्वांचें चीज झालें, असें ह्मणतां येईल. या पुस्तकांत दिलेली माहिती जितकी मनोरंजक आहे, त्यांपेक्षांहि ती अधिक मननीय आहे, हें कोणाच्याहि लक्षांत येण्यासारखें आहे. राजकारणाच्या दृष्टीनें जर्मनी जगांत श्रेष्ठ आहे कीं कनिष्ट आहे, हें सांगण्याचा या पुस्तकाचा उद्देश नसून औद्योगिक, बौद्धिक व वैज्ञानिक दृष्टीनें कोणत्या थोर पुरुषांनीं जर्मनीची उत्क्रांति कशी घडवून आणली, एवढेंच या पुस्तकांत सांगित लेलें आहे. शेतकी, यंत्रशास्त्र, व व्यापार या बाबतींत सर्व जगाच्या मागें पडलेल्या हिंदुस्थानास या लहानशा पुस्तकापासून पुष्कळ शिकतां येण्या सारखें आहे व तेवढी जाणीव हिंदी जनतेच्या अंतःकरणांत उत्पन्न

झाली, तरी देखील या लहानशा पुस्तकानें आपलें कार्य बजाविलें असें होईल.

जर्मनांचें पाताळयंत्र हें पुस्तक १९१६ च्या मार्च महिन्यांत प्रसिद्ध केलें होतें. या पुस्तकाच्या सर्व प्रती त्याच वर्षाच्या मे महिन्यांत म्हणजे अवघ्या दीड पावणेदोन महिन्यांत खपल्या. त्यानंतर दुसरें पुस्तक केसरची प्रभावळ हें १९१६च्या जूनमध्यें प्रसिद्ध केलें आणि त्याच्याहि प्रति अवघ्या दोन महिन्याच्या अवधींत खपल्या. तेव्हांपासून या पुस्तकांना एकसारख्या मागण्या येत होत्या; परंतु छपाइचें सगळें सामान विलक्षण महाग झाल्यामुळें ही द्वितीयावृत्ति इतक्या उशीरां प्रसिद्ध करावी लागली. मागणीबरोबर ज्यांच्या हातीं पुस्तकें पडलीं नाहींत, ते वरील अडचण लक्षांत घेऊन उशिराबद्दल क्षमा करतील अशी आशा आहे. पूर्वीं हीं दोन्हीं पुस्तकें निरनिराळीं छापलीं होतीं; पण आतां तीं एकत्र करून पूर्वींपेक्षां बांधणीहि मजबूत केली आहे. तसेंच या आवृत्तींत पूर्वींपेक्षां चित्रेंहि अधिक दिलीं आहेत. एकंदरींत ही द्वितीयावृत्ति प्रसिद्ध करण्यास कृपणपणा असा आह्मी मुळींच केलेला नाहीं. हल्लींसारख्या बिकट परिस्थितींत हा प्रयत्न पैशाच्या दृष्टीनें आम्हांस फार डोईजड झाला आहे. या अडचणींतून पार पाडणें सर्वस्वी आश्रयदात्यांच्या स्वाधीन असल्यामुळें आमचे गुणग्राहक आश्रयदाते ग्रंथमालेस नवीन आश्रयदाते मिळवून देण्यास हयगय करणार नाहींत, असा आम्हांस भरंवसा आहे.

## युद्धमान राष्ट्रें आणि राजपुरुष !

या नांवाचें एक पुस्तक प्रसिद्ध करण्याचा मनोदय आम्हीं मागें कळविला होता व तेव्हांपासून हें पुस्तक केव्हां प्रसिद्ध होणार ? असें आम्हास आमच्या आश्रयदात्यांकडून एकसारखें विचारण्यांत येत आहे. आम्हासहि हें पुस्तक प्रसिद्ध करण्याची घाई आहेच; परंतु हा प्रयत्न अत्यंत श्रमाचा आहे. युद्धांत पडलेल्या सात आठ बलिष्ठ राष्ट्रांची व त्यांतील मुत्सद्यांची खरी व उपयुक्त माहिती मिळवावयाची व त्यावरून सुसंगत नवीन इतिहास लिहावयाचा; ही कल्पना मनांत आणली म्हणजे या कार्यासाठीं केवढ्या जबरदस्त श्रमाची आवश्यकता आहे, हें कोणाच्याहि लक्षांत येईल. या पुस्तकाचें लेखनसाहित्य मिळवीत असतां केव्हां केव्हां आम्ही

देखील निराश होत होतों; परंतु आम्हांस कळविण्यास आनंद वाटतों. कीं, परमेश्वरकृपेनें बरीच माहिती मिळाली असून आणखी चार दोन महिन्यांनीं या पुस्तकाचा पहिला भाग आश्रयदात्यांच्या हातीं खात्रीनें पडेल. हल्लीं सगळ्या जगाचे डोळे जर्मनीकडेच वेधलेले असल्यामुळें पहिल्या भागांत जर्मन राष्ट्र आणि जर्मन मुत्सद्दी या संबंधाचीच माहिती देणार आहों. युद्धमान राष्ट्रें आणि राजपुरुष हें पुस्तक अर्थातच फार प्रचंड होणार असून तें कांहीं भागांत प्रसिद्ध करावे लागेल. हीं पुस्तकें अत्यंत उपयुक्त व मनोरंजक तर असतीलच; पण तीं शक्य तितकीं सर्वांगसुंदर करण्याचाहि आमचा फार मानस आहे. उत्कृष्ट कागद, सुंदर छपाई, सुबक बांधणी आणि हाफटोन प्रोसेसचीं पाहण्यासारखीं चित्रें; इतक्या गोष्टी एकत्र करणें, हें हल्लींच्या महागायीच्या दिवसांत किती बिकट आहे, हें कोणासहि समजण्यासारखें आहे. तथापि या आमच्या प्रयत्नास जर भरपूर लोकाश्रय मिळेल, तर चित्रें वगैरेंच्या बाबतींत या पुस्तकांत कोणताहि उणेपणा राहणार नाहीं, असें आम्ही आमच्या आश्रयदात्यांना निश्चितपणें कळवितों. आमच्या जुन्या आश्रयदात्यांनीं मात्र नवीन आश्रयदाते मिळवून देण्याचे कामीं हयगय व उपेक्षा करूं नये. पुस्तकास लागणारी प्रत्येक वस्तु कल्पनेच्या बाहेर महाग झाल्यामुळें या पुस्तकांच्या प्रति वर्गणीदारांच्या संख्येइतक्याच काढण्याचें आम्हीं ठरविलें आहे.तसेंच द्वितीयावृत्ति काढण्याच्या भानगडींतहि अशा स्थितींत पडणें श्रेयस्कर नसल्यामुळें या पुस्तकांची द्वितीयावृत्तीहि निघावयाची नाहीं. या सर्व गोष्टींचा विचार करून नवीन आश्रयदाते वर्गणीदारांत नांव नोंदण्याची त्वरा करून किती प्रती छापाव्या लागतील याची कल्पना आम्हांस लवकर करून देतलि अशी आम्हांस आशा आहे. या अत्यंत उपयुक्त, आवश्यक व महनीय कार्यास प्रत्येक महाराष्ट्रीयाकडून आश्रय व प्रोत्साहन मिळेल असा भरंवसा बाळगून हे प्रास्ताविक शब्द आम्ही पुरे करतों.

मुंबई,
गिरगांव, ता. १ मार्च १९१७.

सर्वांचा नम्र साहित्यसेवक,
प्रभाकर श्रीपत भसे.



जर्मन बादशहा दुसरे वुइलियम.

# जर्मनीचें पाताळयंत्र !

[ कुटिल जर्मन राजनीतीचें एक चित्र. ]

—:o:—

## प्रकरण पहिलें.

## मी हेर कसा झालों ?

इसवी सन १९१३ च्या जूनची बारावी तारीख. कोठल्याशा टॉवरवरील एका घड्याळांत साडेतीनचा ठोका पडला. या वेळीं कॉमन्स् सभेंत सॉमर्सेट परगण्याचे प्रतिनिधि मि. किंग हे बैठकीच्या जागीं बसले होते. ते आतां जो प्रश्न विचारणार होते, तो विलक्षण खळबळ उडवून देणारा होता. ते ह्मणाले, " आर्मगार्ड कार्ल ग्रेव्हज् या नांवाच्या जर्मन हेरावर जो खटला चालला होता, त्यांतील कांहीं गुप्त गोष्टींचा स्फोट स्कॉटलंडचे सेक्रेटरी मि. म्याकिनान् वुड् यांनीं सभेपुढें करावा, अशी आमची इच्छा आहे. "

हीं प्रश्नोत्तरें पुढें सुरू करण्यापूर्वीं त्यासंबंधीं थोडासा खुलासा करणें अवश्य आहे. हीं प्रश्नोत्तरें झालीं त्या वेळीं राजकीय गुन्हा सिद्ध झाल्यावरून मला तुरुंगाची शिक्षा मिळाली होती आणि स्कॉटलंडांतल्या एकाद्या तुरुंगांत आमची स्वारी शिक्षा भोगीत असेल, असें सर्व इंग्लंडास वाटत होतें; पण अमेरिकेंतील न्यूयॉर्क शहरांत अस्मादिक एकदम प्रगट झाल्यामुळें सर्व इंग्लंड आश्चर्यानें थक्क होऊन गेलें होतें.

किंग यांनीं विचारलेल्या प्रश्नांतील मुख्य मुद्दे असेः—हेर म्हणून मला झालेली शिक्षा मी अद्याप भोगीत आहें कीं काय ? जर तसें नसेल, तर माझी मुक्तता केव्हां आणि कां करण्यांत आली ? माझी शिक्षेची मुदत

संपल्यानंतर मला देशाबाहेर हांकून देण्यांत येईल कीं काय ? अथवा सध्याच मला तशा रीतीनें हद्दपार केलें आहे ?

यापुढें एडिंबरो येथील स्कॉटस्मन् वर्तमानपत्राच्या १९१३ तील जून बारा तारखेच्या अंकांतील उतारा जशाचा तसा देतों.

स्कॉटलंडचे सेक्रेटरीः—ग्रेव्हज् याला गेल्या दिसेंबरांत मुक्त करण्यांत आलें. राजेसाहेबांना दयादानाचा जो विशेष हक्क आहे, त्या हक्काच्या अमलाखालीं ग्रेव्हज् याला तुरुंगांतून सोडण्यांत आलें. राजेसाहेबांनीं हा हक्क या प्रसंगीं कां बजावला, याचा खुलासा करणें पूर्वापार पद्धतीस अनुसरून नाहीं. हा कोणत्या जातीचा मनुष्य आहे, हें मला सरकारी रीतीनें समजलें नाहीं. याला हद्दपार करावा, अशा-प्रकारची शिफारस जज्जसाहेबांनीं शिक्षा देतांना केली नव्हती.

मि. किंगः—त्याची प्रकृति नादुरुस्त झाली, म्हणून त्याला मुक्त करण्यांत आलें काय ?

सेक्रेटरीः—त्याची प्रकृति बरोबर नव्हती, असें मला वाटतें; पण याहून अधिक खुलासा मला करतां येत नाहीं.

मि. किंगः—त्याला मुक्त केलें, तेव्हां त्याच्याशीं कांहीं विशेष अटी ठरविण्यांत आल्या होत्या काय ?

सेक्रेटरीः—मला वाटतें या प्रश्नाचें उत्तर मीं पूर्वींच दिलें आहे. ( सभेंत नाहीं नाहीं अशी मोठी ओरड होते. )

मि. किंगः—आमचे सन्मान्य सेक्रेटरीसाहेब अधिक खुलासा करतील काय ? ( हशा ) यांत खरा प्रकार काय आहे, हेंच जाणण्याची सभासदांची इच्छा आहे. सन्मान्य सेक्रेटरीसाहेब याहून अधिक स्पष्ट खुलासा न करतील व ग्रेव्हज् याला कांहीं अटीवर मुक्त करण्यांत आलें कीं काय, हें न सांगतील, तर मला हाच प्रश्न पुन्हां विचारावा लागेल. ( हंशा. )

नंतर सभापति ( स्पीकर ) मध्यें पडून त्यांनीं हा वाद येथेंच थांबविला आणि हा विषय तितकाच राहिला.

पुन्हां अधिक प्रश्नोत्तरें होण्याचा रंग दिसूं लागला, पण सभापतीला

आंतून तावडतोब सूचना मिळाली आणि हा विषय पुरा झाला, असें त्यास पुकारावें लागलें.

आतां सेक्रेटरीसाहेबांनीं दिलेल्या उत्तराचा थोडासा विचार करा. ते म्हणतात, " राजेसाहेबांनीं आपल्या विशिष्ट हक्काचा उपयोग कां केला, याचा खुलासा करणें पूर्वपरंपरेस अनुसरून नाहीं. " या उत्तराचा खरा अर्थ इतकाच कीं, राजेसाहेबांच्या हक्काचा उपयोग करून बार्लिनी येथील तुरुगांतून माझी गुप्तपणें सुटका करणें इंग्लंडांतील उच्च अधिकाऱ्यांस युक्त वाटलें. कां ? हेंच मी पुढे हळु हळू सांगणार आहें.

तसेंच माझी जात कोणती, हें सरकारी रीतीनें माहीत नाहीं, असें सेक्रेटरी साहेबांनीं कां म्हटलें, हेंहि पहाण्याजोगें आहे. या उत्तरांत फार गूढ अर्थ होता, हें पुढें तुमच्या लक्षांत येईलच.

माझ्या संबंधानें तीन गोष्टींशीं वाचकांना कांहीं कर्तव्य नाहीं. एक माझें मूळ घराणें, माझी जात आणि माझी नीतिमत्ता. मी खरोखर कोण आहें, हें ज्यांना ठाऊक आहे, असे पुरुष फक्त तीनच आहेत आणि या तिघांपैकीं एक मोठा सत्ताधारी बादशहा आहे. मी खरोखर कोण आहें, याचा सुगावा या तिघांपैकीं एक जणहि तुह्मांस लागूं देणार नाहीं. कांहीं खोट्यानाट्या सव्वाहात बाता झोंकून जगांत उगीच गडबड उडवून द्यावी या गोष्टीचा मला मनापासून तिटकारा आहे. पुढील हकीकत सांगण्यांत कांहीं प्रसंग असे आहेत कीं, त्यांचा उल्लेख करण्याचें धाष्टर्य मूर्खांवांचून दुसरें कोणी करणार नाहीं, आणि असें धाष्टर्य कोणीं केलें, तर त्याचें कटु फळ त्याला मिळाल्यावांचून रहाणार नाहीं. जगांतील मोठ्या सामर्थ्यवान् राष्ट्राच्या सरकारालाहि माझी पूर्वपिठिका चव्हाट्यावर आणणें इष्ट वाटलें नाहीं. तीन सभासदांनीं पिच्छा पुरविला असतांहि मि. म्याकिनान्वुड यांनीं माझ्याबद्दलची माहिती सांगितली नाहीं. कदाचित् सेक्रेटरीसाहेबांना माझी पूर्वपीठिका माहीत नसेल; अथवा यासंबंधानें उत्तर न देणें, हेंच त्यांना सयुक्तिक वाटलें असेल.

शेंकडो वर्षें ज्या घराण्यानें आपल्या पितृभूमीचीं अनेक कार्यें बजाविलीं व अनेक उलाढालींत जातीनिशीं काम केलें, अशा एका घराण्यांत

माझा जन्म झाला. या घराण्यांत मी एकुलता एकच मुलगा असल्यामुळें अर्थात् त्या घराण्याचा लौकिक, संपत्ति व इतर हक्क वगैरे हीं सर्व मला एकट्यालाच मिळावयाचीं होतीं ! ही गोष्ट अगदीं खरी होती आणि लहानपणापासून मला ही गोष्ट अगदीं स्पष्ट दिसत असल्यामुळें मीं आपल्या अयुष्याचा बराचसा भाग निरुद्योगावस्थेंत घालविला आहे. मनाची अशी समजूत असल्यामुळें मीं विशेष काळजीपूर्वक शिक्षण संपादन केलें नाहीं, हें खरें; पण तें मला अगदींच लाभलें नाहीं, असें कांहीं नाहीं. वडिलार्जित सर्व हक्क मला प्राप्त होतील, असें मला वाटलें होतें खरें; पण कांहीं कारणांमुळें ते हक्क मला प्राप्त झाले नाहींत आणि आतां ते होणें शक्यहि नाहीं. लहानपणापासून माझ्या मनांत फार उच्च आकांक्षा असत; पण ज्यांच्याकडून मदतीचीं अनेक आश्वासनें मला मिळालीं होतीं, त्यांच्याकडून वचनभंग झाल्यामुळें माझे सारे हेतु जागच्या जागीं राहिले आणि पुढील आयुष्यांत मला जे टक्केटोणपे खावे लागले, त्यामुळें आतां मी शुद्ध दैववादी बनून राहिलों आहें. केवळ याच कारणामुळें माझ्या बऱ्यावाईट स्थितिबद्दल मला आतां कांहींच वाटेनासें झालें आहे. हा वेळपर्यंतचा आयुष्यक्रम मला स्वतःच्या मनगटाच्या जोरावरच कंठावा लागला आहे. तरी मीं दुःखाबरोबर सुखहि पुष्कळ उपभोगिलें आहे आणि अनेक वेळां चांगल्या चैनीनें दिवस घालविले आहेत. एकंदर एकुणचाळीस वर्षांच्या अवधींत मी जितक्या चमत्कारिक प्रसंगांत सांपडलों, तितके प्रसंग सामान्य मनुष्याच्या वांट्यास बहुतकरून येत नसतील !

आमच्या घराण्याच्या चालीप्रमाणें मला लष्करी शिक्षण मिळालें होतें. हें शिक्षण पूर्ण झाल्यानंतर एका सुप्रसिद्ध विद्यालयांत मीं तीन वर्षें अभ्यास केला. हें शिक्षण मीं संपादन केल्यामुळें पुढें विश्वविद्यालयांतील शिक्षण घेण्याची पात्रता माझ्या अंगीं साहजिकच आली व त्याप्रमाणें पुढें एका जुन्या विश्वविद्यालयांत कांहीं काळ घालवून तत्त्वज्ञान आणि वैद्यक या विषयांत मीं डिग्री घेतली. या वेळीं माझें वय २२ वर्षांचें होतें आणि वयोमानानें पहातां ही प्रगति कांहीं लहानसहान ह्मणतां यावयाची नाहीं. ज्ञानसंपादनाची हौस मला लहानपणापासूनच होती आणि विशेषतः

भौतिक शास्त्रें आणि देशोदेशींच्या भाषा शिकण्याकडे माझ्या मनाचा जास्त कल होता. एका वेळीं सिंगाली आणि तामील या भाषांचें पोटापुरतें ज्ञान मीं अवघ्या तीन महिन्यांत मिळाविलें.

विद्यालयाचा क्रम पुरा करून मी घरीं आलों. स्वभावतः मी एककल्ली आणि हट्टी आहें; इतकेंच नव्हे, तर मी दुराग्रहीहि आहें. माझ्या घराण्यावर आणि तसेंच माझ्या देशावर अनेक प्रकारच्या आपत्ति कांहीं इतर देशांच्या खटपटीनें कोसळल्या आहेत, असा माझा लहानपणापासूनच समज करून देण्यांत आला होता. माझ्या घराण्यावर जीं अनेक संकटें ओढवलीं, त्यांचा पाढा विद्यालयांतून बाहेर पडल्याबरोबर मी वाचूं लागलों. या बडबडण्यांत कित्येक वेळां अधिकाऱ्यांवरहि मीं नानाप्रकारचे आरोप करण्यास कमी केलें नाहीं. त्यांच्याकडून अनेक वेळां मला समजूत मिळाली असतांहि माझी बडबड न थांबल्यामुळें सहजच मी त्यांना फार नावडता झालों. शेवटीं गोष्टीवरून गोष्ट वाढतां वाढतां इतका प्रसंग आला कीं, मला कांहीं दिवस लांब कोठें तरी पाठविणें बरें, असें माझ्या आप्तेष्टांस वाटलें. सध्यां माझ्या घराण्यांतील माझे आप्त व मी हे एकमेकांस अगदीं पारखे झालेले आहों आणि आतांपर्यंत ज्या कांहीं गोष्टी घडल्या, त्यांवरून झालें हें बरेंच झालें, असें मला वाटतें.

माझ्या कुटुंबाशीं माझा संबंध अशा रीतीनें तुटल्यानंतर जगांत कोठें तरी भटकण्याचा उपक्रम मीं सुरू केला. जगांतील जंगली मुलखांत मीं बराच प्रवास केला. या ठिकाणीं जें अनेक वस्तूंचें मीं निरीक्षण केलें, तें माझ्या भावी अयुष्यक्रमांत मला फार उपयोगी पडलें. कोणत्याहि देशांत गेलों, म्हणजे तेथल्या मूळच्या रहिवाशांशीं मी बराच संबंध ठेवीत असें. हे मूळचे रहिवासी विलक्षण संशयखोर असतात व विशेषतः कोणाहि युरोपियाला ते आपल्या पोटांत शिरूं देत नाहींत. तथापि अशा लोकांचाहि विश्वास संपादन करण्याची विद्या मला लवकरच साध्य झाली. ऑस्ट्रेलिया आणि न्यूझीलंड यांतील बहुतेक प्रदेशांत मीं प्रवास केला आणि हीं दोन्ही ठिकाणें मला फार आवडलीं. अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांच्या पश्चिम भागांत मी कधीं गेलों नाहीं; तथापि तेथील ज्या कांहीं गोष्टी माझ्या

कानावर आल्या, त्यांवरून तिकडची राहणी ऑस्ट्रेलियांतील राहणीप्रमाणेंच स्वच्छ आणि आरोग्यदायक असावी, असें मला वाटतें.

येथून पुढें दक्षिणमहासागरांतील बेटांत प्रवास करण्याचा मीं बेत केला; पण इतक्यांत दक्षिणअफ्रिकेंतील आकाश मेघांनीं व्याप्त होऊं लागलें. तेथें लवकरच तलवारींचा चकचकाट आणि तोफांचा गडगडाट होणार, अशीं चिन्हें दिसूं लागलीं. अशा परिस्थितींत मुद्दाम जाऊन पडण्याची गरज माझ्यासारख्या प्रवाशाला नव्हती; पण माझा स्वभाव असा कांहीं विलक्षण कीं, जरूर नसेल अशाच जागीं जाऊन तोंड खुपसावयाचें. या माझ्या स्वभावाला अनुसरून केपटाऊनला जाणारी पहिलीच बोट मीं पकडली. मी तेथें जाऊन पोहोंचल्यानंतर एक महिन्यानें युद्धाला सुरुवात झालीच. बोटींतून उतरल्यानंतर घोड्यावरून मीं खाणीच्या भागाकडे प्रवास केला. मनुष्याच्या आयुष्यांत कित्येक वेळां अशा कांहीं गोष्टी घडतात कीं, बाह्यतः त्या अगदीं क्षुल्लक दिसल्या, तरी त्यांमुळें त्याचा सारा आयुष्यक्रम बदलून जातो. अशाच प्रकारची एक गोष्ट येथें घडली. डूर्नक्लुफ नांवाच्या गांवीं एका सकाळीं मी पोहोंचलों. त्या वेळीं धुकें पडलें होतें आणि हवेंत गारठाहि बराच होता. माझ्या भावी आयुष्यक्रमाला नवें वळण लावणारी गोष्ट याच गांवीं घडली.

डूर्नक्लुफ हा पिशाच्यांच्या वस्तीचा गांव आहे, असें ह्मणावयास हरकत नाहीं. रखरखीत वाळूच्या मैदानांत थोड्याशा पत्र्यांच्या झोंपड्या बांधून तेथें बोअर लोकांनीं वस्ती केलेली आहे. मृतसमुद्राच्या काठीं वनस्पती देखील उगवत नाहींत, अशी त्याची ख्याति आहे. या बाबतींत हा गांव त्या समुद्राशीं खास साम्य करील. सूर्योदय होऊन एक तासभर झाला न झाला, तोंच अंगावर उन्हाची फोडणी बसूं लागावयाची आणि सूर्यास्तानंतर तासभरानें थंडीमुळें अंगाचा आंकडा वळावयाचा, अशी ही येथल्या हवेची स्थिति आहे. येथें सुमारें चारशें बोअर लोकांची वस्ती आहे. हे लोक अत्यंत आकुंचित वृत्तीचे आहेत. यांची कल्पनाप्रतिभा ह्मटली, तर ती गवतावर उडणाऱ्या नाकतोड्यांच्या कल्पनाशक्तीहून अधिक विस्तृत नाहीं. डूर्नक्लुफ गांवाचें हें चित्र झालें.

मी गांवांत शिरलों त्या वेळीं मी अगदीं त्रासून गेलों होतों. पोटांत सडकून भूक लागली होती, पावसानें भिजून चिंब झालों होतों आणि त्यांत त्या गांवचा देखावा पाहून माझें मस्तक अगदीं भणाणून गेलें होतें. पहावें तिकडे उदासपणा पसरलेला. जवळपास कोठें खानावळहि दिसेना, आणि लोक आदरातिथ्यांत इतके उदार कीं, त्यांच्या घरीं जन्मांत कावळ्याचें तोंडहि उष्टें व्हावयाचें नाहीं. मी म्हणजे मोठा सुस्वभावी आहें असें नाहीं; पण या साऱ्या प्रकारानें माझें मन अगदीं फाटून गेलें यांत नवल नाहीं. आतां कोणाला तरी चावावें कीं, गिळावें, असें मला होऊन गेलें. तसाच मी घोड्यावर बसून थोडासा रस्ता पुढें चालून गेलों, तों समोरच एक लठ्ठ बोअर एका बाराचवदा वर्षांच्या 'नेटीव' मुलाला चाबकाखालीं झोडपीत आहे, असें दिसलें. अफ्रिकेंतल्या रानटी प्रजेला सुसंस्कृत करावें, म्हणून बोअर लोकांनीं तेथें वस्ती केली; पण त्यांना सुसंस्कृत करण्यांत बायबलापेक्षां चवदावें रत्न अधिक उपयोगी पडतें, असा समज या बोअर मनुष्याचा असावा. मीं मध्यें पडून त्या मुलाला सोडविलें. त्याच्या पाठीचें अगदीं धिरडें होऊन गेलें होतें. त्याचें मूळचें नांव त्यानें मला सांगितलें; पण त्याचा उच्चार करणें माझ्या शक्तीच्या बाहेरचें असल्यामुळें मी त्याला 'किम्' हें नांव दिलें. हा मुलगा आफ्रिकेंतील बासोटो जातीचा आहे. त्याची माझ्यावर लवकरच भक्ति बसली आणि तो अद्यापीहि माझ्याबरोबर आहे. मीं त्याला जीवदान दिलें असा त्याचा समज झाला आहे आणि ह्या माझ्या उपकाराची फेड त्यानें आजवर अनेक प्रसंगीं केली आहे. पुढें थोड्याशा महिन्यांनीं माझ्या आयुष्याचा सारा क्रम बदलण्यास हाच 'किम्' न कळत कारणीभूत झाला. जें व्हावयाचें तें होतेंच, असा माझा समज असल्यामुळें मला असल्या गोष्टींचें फारसें नवल वाटेनासें झालें आहे.

मीं किमला स्वतःच्या नोकरींत ठेवलें आणि त्याच्या कामांत त्याला तरबेज केलें. थोड्या दिवसांनीं पोर्टमेटल या गांवीं आम्ही गेलों. या वेळीं बोअर युद्ध सुरू झालें होतें. या युद्धांत डॉक्टर या नात्यानें सैन्याच्या इस्पितळांत मीं नोकरी धरली. ज्या ठिकाणीं लढाईची फार

गर्दी असे, अशा जागीं आम्हांस जावें लागे. मॉडर नदीवरील लढाईत जे कित्येक घायाळ लोक शुश्रुषेसाठीं इस्पितळांत आले, त्यांत एक परदेशीय अधिकारी होता. असे पुष्कळ अधिकारी बाहेर देशांतून बोअर लोकांस मदत करण्यासाठीं आले होते. यांतल्याच एका अधिकाऱ्याला किम् यानें त्याची जखम बांधण्यासाठीं मजकडे आणलें. जखम बरीच काळजी करण्यासारखी होती, यामुळें त्या अधिकाऱ्याला वारंवार तपासणें मला भाग होतें. त्या अधिकाऱ्याच्या व माझ्या अनेक गप्पागोष्टीहि होत असत. कित्येक वेळां माझ्या तोंडून जी कांहीं माहिती न कळत बाहेर पडे, ती एकत्र जुळवून मी कोण, तें या गृहस्थानें बरोबर ताडलें. या गृहस्थांचें नांव फ्रिहर फॉं रिटझेन्स्टीन असें असून सैन्यांत त्यांचा मेजरचा हुद्दा होता. मी देशत्याग कां केला, याचीं खरीं कारणें ज्या थोड्याशा लोकांना माहीत आहेत, त्यांपैकींच हेहि एक गृहस्थ होते.

माझी व या गृहस्थांची जानपछान अधिक अधिक होऊं लागली व साहजिकच आमच्या गप्पागोष्टीहि अधिक अघळपघळ होऊं लागल्या. अशा गोष्टी चालतां चालतां एके दिवशीं ते मला म्हणाले, " तूं जर्मनीच्या एकाद्या पोलिटिकल खात्यांत नौकरी कां करीत नाहींस ? " माझें शिक्षण आणि माझा सामाजिक दर्जा हीं असल्या कामांत फार उपयोगीं पडतील असें त्यांचें मत दिसलें. दुसरें असें कीं, असल्या राजकीय उलाढालींत मला जें ज्ञान व वजन प्राप्त होईल, तें खाजगी रीतीनेंहि माझ्या उपयोगीं पडेल असें ते म्हणाले. माझे भाऊबंद जो माझा हक्क बळकावून बसले होते, तो त्यांजकडून हिसकावून घेण्यास मला ही नौकरी उपयोगीं पडेल, असें त्यांचें म्हणणें दिसलें. राजकीय उलाढालीच्या नौकरींत मोठ्या वजनदार लोकांशीं संबंध घडणार आणि त्याचा उपयोग मला खाजगी रीतीनें करून घेतां येईल, हें त्यांचें म्हणणें मला पटलें. जर्मनीच्या हेराची नौकरी मीं कां पत्करली, याचें हें मुख्य कारण आहे. काउन्टसाहेब जर थोडा अधिक काळ जगले असते, तर माझा हा मूळचा हेतु सिद्धीस गेला असता यांत संशय नाहीं; पण आफ्रिकेंत आमची गांठ पडल्यानंतर तीन वर्षांनीं ते एका शर्यतींत मृत्यु पावले आणि माझ्या

एका उत्तमोत्तम स्नेह्याच्या प्रेमाला मी मुकलों. ह्या काळांत ह्या हेराच्या धंद्यांत माझे पाय इतके खोल रोंवले गेले होते कीं, ते तेथून बाहेर काढणें मला शक्य नव्हतें. हा धंदा सोडावा असें अनेक वेळ माझ्या मनांत येई; तथापि त्यांतून माझे पाय बाहेर पडले नाहींत, इतकी गोष्ट खरी. पूर्वार्जित जिनगी मला प्राप्त करून देण्याविषयीं अनेकांनीं वचनें दिलीं होतीं; पण तींहि कोणीं पाळलीं नाहींत.

अशा रीतीनें काउन्ट रिटझेन्स्टीन यांचें व माझें संगन मत झालें व त्यांच्या कार्यांत मीहि त्यांना मदत करूं लागलों. या बोअर युद्धांत इंग्रजसेने-विषयीं पुष्कळ माहिती जर्मनीला मिळाली आणि तींतील कांहीं भाग अस्मादिकांनींच पुरविला आहे. माझ्या डाक्तरीच्या पेशामुळें मला कोठेंहि जाण्यास मज्जाव नसे आणि माझ्याबद्दल कोणी पूसतपासहि करीत नसे. यामुळें ब्रिटिश सैन्यांतील शिस्त, त्यांची शस्त्रास्त्रसामग्री आणि सैन्याचा दम यांजबद्दल बरीच अंतस्थ माहिती मीं इकडून तिकडून गोळा केली. ब्रिटिश वसाहतींतून येणारे ऑफिसर लोक बोलण्यांत बरेच ढिले असतात, असें माझ्या अनुभवास आलें. अनेक बाबींसंबंधीं अगदीं मोकळेपणानें ते आपलें जिव्हास्त्र चालवीत असत. ही सारी माहिती काउन्ट रिट-झेन्टस्टीन यांच्या जखमा बांधतांना त्यांना मी सांगत असें. एके दिवशीं ते मला म्हणाले, ‘ युद्ध संपल्यावर मला बर्लिन येथें भेटण्यास विसरूं नका, हं !’

ब्रिटिश वसाहतींतील ऑफिसरांकडून कांहीं अधिक माहिती मिळवावी या हेतूनें मींहि एके दिवशीं त्यांच्या वादविवादांत शिरून आपलें जिव्हायंत्र सुरू केलें; पण याचा परिणाम असा झाला कीं, एके दिवशीं लॉर्ड किचनर यांजकडून मला बोलावणें आलें. त्यांच्या तंबूंत जाऊन मी त्यांच्या समोर उभा राहिलों, तों ते एकदम तुसडेपणानें म्हणाले, “ डॉक्तर, क्यांप सोडून जाण्यास तुम्हांला चोवीस तासांचा अवधि दिला आहे. ”

माझ्या अंतःस्थ चळवळी लॉर्डसाहेबांच्या ध्यानीं आल्या, कीं, त्या वसाहतवाल्यांनीं त्यांचे कान फुंकले कोणास माहीत; पण या खारटुमच्या

सरदाराची वृत्ति मला माहीत असल्यामुळें त्यांनीं दिलेल्या मुदतींत सैन्याचा तळ मीं सोडला.

कांहीं दिवसांनीं काउन्टसाहेबांची प्रकृति चांगली सुधारल्यामुळें त्या युद्धांत पुनः बोअर लोकांच्या बाजूनें न लढण्याविषयीं वचन घेऊन त्यांस मुक्त करण्यांत आलें व ते केपटाऊन येथें आले आहेत, असें मला समजलें. ब्रिटिश लोकांनीं प्रिटोरिया घेतल्यानंतर थोड्या दिवसांनीं मीं अफ्रिका सोडली. त्या झोटिंग बादशाहींत राहण्याचा मला कंटाळाच आला होता. बराच काळ बर्लिन येथें रहावें या उद्देशानें मी त्या शहरीं आलों. या शहराची मला पूर्ण माहिती होती आणि शिक्षण घेत असतां बराच काळ तेथें राहिल्यानें त्या शहराबद्दल माझ्या मनांत प्रेमहि उत्पन्न झालें होतें. कसल्याहि गोष्टीची काळजी म्हणून करावयाची नाहीं, असा माझा स्वभाव असल्यामुळें मीं तेथें बरेच दिवस शुद्ध आळसांत घालाविले. वास्तविक पाहतां तेथें आल्याबरोबर काउन्ट रिटझेन्स्टीन यांची भेट घ्यावयास पाहिजे होती, पण बरेच दिवस आळसांत घालविल्यावर मी त्यांच्या घरीं त्यांना भेटावयासाठीं गेलों. त्या वेळीं काउन्टसाहेब अप्परगार्टन येथील शर्यतीस जाण्यासाठीं बाहेर जाण्याच्या तयारींत होते, असें दिसलें. हे मोठे पटाईत स्वार आहेत, आणि प्रत्येक शर्यतींत काउन्टसाहेब असावयाचेच, असा त्यांचा साऱ्या प्रशियांत लौकिक होता. त्यांनीं मला आपल्याबरोबर मैदानावर बोलाविलें आणि त्यांचा नौकर त्यांची गाडी आणण्यासाठीं गेला असतां, मधल्या वेळांत त्यांनीं ती पूर्वींची गोष्ट पुनः मजपाशीं काढली. जर्मनीच्या हेरखात्यांत शिरण्याविषयीं ते मला आग्रह करूं लागले.

ते म्हणाले, " आज किती तरी दिवस मी तुमची वाट पंहात आहें. नौकरींत शिरण्याचा तुमचा मार्ग मीं बराच निष्कंटकहि करून ठेवला आहे. त्या खात्यांतले एक दोन मुख्य अधिकारी आज मैदानावर भेटण्याचा संभव आहे. तुमची मर्जी असेल, तर तुमची व त्यांची आजच मुलाखत करून देतों. " मीं विचारलें, " मला कोणीं ओळखील असें

तुह्मांस वाटतें काय ? माझा खरा दर्जा कायम ठेवून नौकरींत शिरणें अशक्य आहे, ही गोष्ट आपणास ठाऊक आहेच. "

काउंट म्हणाले, " छे ! छे ! ती शंका देखील नको. तुह्मी खरोखर कोण आहां, हें फक्त एकाच व्यक्तीला सांगावें लागेल. "

ही एकच एवढी महत्त्वाची व्यक्ति कोण हें मला नंतर कळलें. मी ह्मणालों, " ठीक आहे. यत्न करून तरी पाहूं या. "

काउंटसाहेब स्वतःच गाडी हांकीत असत. त्यांनीं मला आपल्या शेजारींच बसावयास बोलाविलें. वाटेनें जातांना माझ्या खाजगी कामाबद्दल आह्मीं बरीच चर्चा केली. माझ्या खाजगी बाबतींत काउंटसाहेबानीं बरीच सहानुभूति दाखविली आणि त्यांच्या संभाषणानें नौकरी पत्करण्याकडे माझा कल अधिक अधिक होऊं लागला. आह्मी मैदानावर जातों, तोंच काउंटसाहेबांनीं भाकित केल्याप्रमाणें गोष्ट घडून आली. दोन विशिष्ट व्यक्तींची व काउंटसाहेबांची सलामी झाली. यांपैकीं एका गृहस्थाचें नांव क्यापृटन झूरसी फॉ स्यापृकेन असें असून दुसऱ्याचें नांव हर फॉ रिक्टर असें होतें. काउंटसाहेबांनीं या दोघांची व माझी ओळख करून दिली, तेव्हां माझें नांव डॉक्टर फॉ ग्रेव्हर असें सांगितलें. यानंतर प्रसंग पडेल तेव्हां याच नांवाचा विपर्यास मी ग्रेव्हज या इंग्रजी नांवांत करीत असे. माझ्याशीं थोडा वेळ गप्पागोष्टी करून क्यापृटन फॉ स्यापृकेन यांनीं मला आपल्या ऑफिसांत भेटण्यासाठीं बोलाविलें. हे आरमाराच्या बातमी खात्याचे मुख्य अधिकारी असून हें ऑफिस कोनिगरग्रेटझर या रस्त्यावर नं. ७० च्या घरांत होतें. शर्यती संपेपर्यंत या विषयाचा पुन्हा त्यांनीं उल्लेख केला नाहीं. हर फॉ रिक्टर यांनीं मात्र माझी बरीच चवकशी केली. मीं कोठें कोठें प्रवास केला आहे, आणि मला किती भाषा येतात, इत्यादि अनेक प्रश्न त्यांनीं मला केले. माझ्या उत्तरांनीं ते खुष झाले असावेत असें दिसलें. मधून मधून 'वाहवा, शाबास' असेहि उद्गार त्यांच्या तोंडून निघत, त्यावरून ते बरेच खुष झाले, असें मला दिसलें.

माझ्या नेहमींच्या पद्धतीस अनुसरून क्यापृटन् स्यापृकेनचे ऑफिसांत दुसरे दिवशीं मी गेलों नाहीं. तीन दिवसांनंतर क्यापृटनकडून एक गोड

भाषेंत लिहिलेलें पत्र मला आलें. त्यांत त्यांनीं मला शक्य तितक्या लवकर भेटण्यास बोलाविलें होतें. कांहीं महत्त्वाच्या कामाबद्दल माझ्याशीं बोलावयाचें आहे, असेंहि त्यांनीं कळाविलें होतें. पत्राप्रमाणें ऑफिसांत जाऊन मी हजर झालों. कोनिगरग्रेडझरस्ट्रासी नं. ७० हें घर इतर खात्यांच्या घराप्रमाणेंच विशिष्ट पद्धतीचें बांधलेलें आहे. जर्मनीच्या सरकारीखात्यांच्या इमारती बांधण्यांत शोभेपेक्षां टिकाऊपणाकडेच अधिक लक्ष दिलें असतें. शिस्त, सुव्यवस्थितपणा आणि टापटीप यांजबद्दल जर्मनीची ख्याति आहे, आणि तीच गोष्ट या खात्यालाहि लागू आहे. तसेंच इतर खात्यांप्रमाणें या खात्यावरहि नेहमीं खडा पहारा असतो. दरवाजावर एक द्वाररक्षक आणि एक कामिशनर म्हणून अधिकारी असतो. हा कामिशनर अगदीं निबोल्या असावयाचा. तुमच्या नांवाची चौकशी करून तुह्मांस ज्याला भेटावयाचें असेल, त्याला तुमच्या आगमनाची वर्दी कळाविणें हें याचें काम आहे. ही माहिती तो एका बुकांत नोंदून घेतो आणि ऑफिसांतील अपेक्षित गृहस्थास टेलिफोन करतो. त्याजकडून जबाब आला म्हणजे, तुह्मांस आंत जाण्यास परवानगी मिळते अथवा नकाराचा जबाब मिळतो. तुम्ही आंत जातांना तुमच्याबरोबर एक रक्षक दिला जातो व थेट आंतल्या दारांतून तुह्मी जाईपर्यंत तो तुमची पाठ सोडीत नाहीं. तुह्मी केवढेहि विख्यात पुरुष असलां, तरी या रक्षकाचें शुक्लकाष्ठ तुमच्या मागें असावयाचेंच. बाहेर पडतांनाहि या सार्‍या गोष्टी पुनः व्हावयाच्याच. तुह्मी ऑफिसांत किती वेळ राहिलां, याचीहि नोंद येथें केली जाते.

माझें नांव वर गेल्याबरोबर मला एकदम आंत बोलावण्यांत आलें. क्याप्टन फॉं ल्याप्केन यांच्या खाजगी खोलींत पोहोंचण्यापूर्वीं दुसर्‍या तीन खोल्या मला ओलांडून जाव्या लागल्या. या खोल्यांत खाजगी चिट-णिसांचीं ऑफिसें होतीं. क्याप्टनसाहेब आपल्या खोलींत आपल्या दर्जाचा दर्शक असा आरमारी पोषाक घालून बसले होते. जर्मनीच्या हेरखात्यांत सर्व अम्मलदारांना असाच आपल्या दर्जाचा पोषाक वापरावा लागतो आणि या खात्यांतील मुख्य अधिकारीहि लष्करी किंवा

आरमारी नौकरींतील असतात. त्यांचे चिटणीस व इतर कारकून मंडळी हे मात्र सामान्य नागारिकांपैकींच असतात, आणि असें असण्याचें एक विशेष कारणहि आहे. सर्व खात्यांतील प्रमुख अधिकारी हे जुन्या प्राशियन घराण्यांतून निवडलेले असतात. हीं सर्व घराणीं जमनिदारांचीं असून लष्करी नौकरी करण्यास बांधलेलीं असतात. नौकरीबद्दल बादशहाकडून त्यांस इनाम जमिनी असल्यामुळें अर्थातच हीं घराणीं अत्यंत राजनिष्ठ आहेत. हे लोक अत्यंत राजनिष्ठ असले, तथापि हेरखात्यांत जीं कांहीं अनुचित कर्मे अवश्य करावीं लागतात, तीं करण्यास ते नाराज असतात. एकादी विशिष्ट गोष्ट कशी करावी, याचा फक्त दर्शनी नकाशा मात्र ते तयार करून देतात. प्रत्यक्ष कार्य करून आपले हात ते मळवून घेत नाहींत. आतां फॉ झेंडेनसारखे कांहीं जुने लष्करी अधिकारी असल्या कामांत प्रत्यक्ष पडतात, ही गोष्ट खरी; पण असल्या माणसांना सामाजिक दर्जा कांहींच उरलेला नसतो, हेंहि लक्षांत ठेवलें पाहिजे. आरमारी अथवा सेनेंतील कोणताहि अधिकारी या हेरखात्यांत कधींहि काम करावयाचा नाहीं.

फॉ स्थापूकेन यांनीं माझें स्वागत मोठ्या चतुरतेनें केलें. आरमारांतल्या आणि लष्करांतल्या प्राशियन अधिकाऱ्यांत हा एक विशेष गुण आहे. कोणाचें स्वागत कसें करावें व कोणाशीं कसें बोलावें हें कौशल्य त्यांच्या अंगीं पूर्ण भरलेलें आहे. हा गुण इंग्रज अधिकाऱ्यांत सांपडत नाहीं. इंग्रज अधिकारी अधिक तुसडा असतो. यामुळें त्याला भेटावयास जाणारे लोक थोडेबहुत तरी नाखुष होऊन परत जातात.

मला बसावयास खुर्चा देऊन व आपल्या चिरूटाची पेटी माझ्यापुढें सरकावून क्या ्टन म्हणाले, " कसें काय डॉक्टरसाहेब, मग हेरखात्यांत शिरण्याचा तुह्मीं निश्चय कला ना ? ज्याला प्रवासाची आणि उलाढाल्या करण्याची आवड असेल, त्याला हा धंदा मानवेल हें मी खात्रीनें सांगतों. तुमची एकंदर तयारी आणि तुमचा पूर्वानुभव यांबद्दल पूर्ण विचार करतां हा आपला संबंध परस्परांस फायदेशीर होईल, याबद्दल मला संशय नाहीं."

कसल्या प्रकारची कामगरी मला करावी लागेल, असें मीं त्यांना

विचारलें, तेव्हां ते म्हणाले, " पण आधीं नौकरी करण्याचा तुमचा निश्चय झाला आहे कीं नाहीं, हें सांगा. कामाच्या समजुतीसंबंधीं मी तुह्मांस मग सांगेन. "

त्यांचें हें म्हणणें रास्त वाटून मीं उत्तर दिलें, " होय. माझी तयारी आहे; पण साऱ्या नीतीला गुंडाळून ठेवून एकादें अकर्म तुह्मी मला सांगाल; तर तें मात्र माझ्या हातून होणार नाहीं. " माझें भाषण ऐकून त्यांच्या चेहऱ्यावर हास्याची लहानशी लकेर झळकूं लागली. थोड्या वेळानें सरळ माझ्याकडे पाहून ते म्हणाले, " जीं शस्त्रें लोक आमच्या विरुद्ध वापरतात, त्यांचाच उपयोग आह्मीहि करतों. या बाबतींत अधिक चोखाळ-पणा करून आमचें चालावयाचें नाहीं. एकंदर देशाचे हिताहितसंबंध या बाबतींत अगोदर पाहिले पाहिजेत. हें मोठें कार्य साधतांना नीतीच्या खाजगी कल्पनांस वाव देतां उपयोगी नाहीं. आतां तुमच्या कामासंबंधीं ह्मणाल, तर आह्मांला जरूर लागेल ती माहिती पुरविणें, हें तुमचें पाहिलें कर्तव्य आहे. ती माहिती तुह्मी भल्या अथवा बुऱ्या कोणत्याहि मार्गानें मिळवा. आमचें लक्ष तुह्मीं दिलेल्या माहितीवर असतें. ती तुह्मीं कशी मिळविली, हें पहाण्याचें आमचें काम नाहीं. एकाद्या कामागिरीवर तुमची नेमणूक झाली, म्हणजे तिच्या संबंधीं जी कांहीं अगाऊ माहिती आह्मांला असेल ती तुह्मांस पुरविली जाईल. आमच्या एकंदर खात्याचें सहाय्यहि तुह्मांस मिळेल. पण एक गोष्ट मात्र पक्की लक्षांत ठेवा, कीं, एकाद्या पेंचांत तुह्मी सांपडला, तर त्यांतून तुह्मांस सोडविण्याचें सामर्थ्य आमच्या आंगीं नाहीं आणि तुह्मांला सोडविण्याची खटपटहि आम्ही करणार नाहीं. ही नौकरी बोलूनचालून सुळावरची पोळी आहे, हें विसरूं नका. कस-ल्याहि प्रकारच्या प्रसंगांत सरकारी मदत तुह्मांस मिळणार नाहीं, हें ध्यानांत ठेवूनच जें काय करणें असेल तें करा. "

क्याप्टनसाहेबांनीं दिलेली ही सूचना अक्षरशः खरी होती. याचा मला पुढें चांगलाच अनुभव आला. मला पगार किती मिळणार याचा खुलासा क्याप्टन् यांनीं आतांपर्यंत केला नव्हता. त्यासंबंधीं मीं प्रश्न विचारतां ते म्हणाले, " तें सारें तुमच्या नौकरीच्या दर्जावर अवलंबून

आहे. आरंभीं तुम्हांला नौकरींत दाखल केल्याबद्दल वर्षाचे सुमारें चार हंजार मार्क ( सुमारें तीन हजार रुपये ) मिळतील. तसेंच तुम्ही प्रत्यक्ष एकाद्या कामगिरीवर असलां किंवा नसलां तरी तुम्हांला चालू खर्चासाठीं रोज दहा मार्क मिळतील. याशिवाय कामगिरीचें जसें महत्त्व असेल, त्या मानानें प्रत्येक कामगिरीबद्दल कांहीं बक्षीसहि तुम्हांला मिळेल. कोठें बाहेर गांवीं एकाद्या कामगिरीवर गेल्यास रोजचा खर्च चाळीस मार्कांहून अधिक असतां उपयोगीं नाहीं. कामगिरीबद्दलच्या बक्षिसाची रक्कम महत्त्वाच्या मानानें आगाऊ ठरविली जाईल. आतां आणखी एक गोष्ट पक्की लक्षांत ठेवा. ती ही कीं, तुम्हांला जी कांहीं एकंदर रक्कम द्यावयाची, तिचा एक तृतीयांश पांच टक्के व्याजानें आमच्यापाशीं राहील."

त्यांची ही शेवटची सूचना ऐकून मी हंसत हंसत म्हणालों, "माझ्या पैशाची काळजी घ्यायला मी समर्थ आहें." क्याप्टन्साहेबांच्या चेहऱ्यावर हास्याची एक लहानशी लकेर मात्र दिसली. थोड्या वेळानें ते म्हणाले " तुम्ही समर्थ असाल, ही गोष्ट खरी; तथापि पुष्कळशा माणसांना तें साधत नाहीं, असा आमचा अनुभव आहे. दोन कारणांसाठीं आम्हीं हा नियम केला आहे. एक कारण असें कीं, त्यामुळें आमच्या माणसांवर आमचा ताबा पक्का राहतो. दुसरें असें कीं, या खात्यांतले पुष्कळसे लोक उडावू असतात, असें आमच्या अनुभवास आलें आहे. समजा कीं, एकाद्या कामगिरींत त्यांचें बरें वाईट झालें, तर त्यांच्या बायकापोरांची वाट काय ? हा पैसा त्यांच्या पदरीं पडतो."

या नियमाला शिव्या हांसडण्याची माझ्यावर पुढें पाळी आली ! कारण मला इंग्लंडांत धरलें, त्या वेळीं माझे तीस हजार मार्क जर्मन हेर खात्याकडे शिल्लक होते. इतक्या पैशावर मला पाणी सोडण्याची वेळ आली. असो. मी आतां काय काय उत्तर देणार, हें ऐकण्यासाठीं मोठ्या उत्सुकतेनें क्याप्टन् व्हापूकेन् माझ्याकडे पाहूं लागले. माझें मन घोटाळ्यांत पडलें होतें. पैशासंबंधीं विचार माझ्या मनांत नव्हता; पण माझ्यासारख्या थोर घराण्यांतल्या मनुष्यानें हेराच्या धंद्यांत पडावें कीं काय, या विचारांत

माझें मन डळमळत होतें. माझ्या मनांत खरा विचार काय चालला आहे, याचा अजमास क्याप्टनसाहेबांना नव्हता. पगार कमी म्हणून मी अनमान करीत आहें, असें त्यांना वाटलें. ते म्हणाले, " ही पगाराची रक्कम केवळ आरंभींचीच आहे. तुमची योग्यता वाढली व अधिक महत्त्वाच्या कामगिरीवर तुमची योजना होऊं लागली, म्हणजे तुमचा पगारहि अर्थात् वाढेलच. तें सारें तुमच्या योग्यतेवर अवलंबून आहे. " एवढें बोलून ते पुनः उत्सुकतेनें माझ्याकडे पाहूं लागले. मीं म्हटलें, " ठीक आहे. माझी कबुली आहे. "

आपली पसंती दर्शविण्यासाठीं हात पुढें करून ते म्हणाले, " तुम्हीं लवकरच निश्चय केला हें ठीक. माझा हाच शिरस्ता आहे. कोणतीहि गोष्ट एकदम करावयाची अथवा सोडावयाची. छान ! छान ! डॉक्तर-साहेब, अशी तडकाफडकीची मनाची वृत्ति मला फार आवडते. असो. आतां तुह्मांला कांहीं विषयांत अगोदर तरबेज केलें पाहिजे. उद्यांपासून तुमची तयारी आहे का ? "

" या क्षणापासून देखील माझी तयारी आहे. "

" वाः ! हें तर फारच छान; पण उद्यांसुद्धां कांहीं हरकत नाहीं. उद्यां सकाळीं दहा वाजतां येथें या. मग कांहीं ठराविक वेळ दररोज तुम्हांस खर्च करावा लागेल. " असें म्हणून त्यांनीं आपल्या एका चिटणीसाला हाक मारली आणि थोडक्यांत त्याला कांहीं तोंडीं हुकूम दिला. थोड्याच वेळांत तो गृहस्थ तीनशें मार्कांची हुंडी घेऊन आल्यावर क्याप्टन म्हणाले, " डॉक्टरसाहेब, हा आपला पहिल्या महिन्याचा चालू खर्च. नौकरींत दाखल केल्याबद्दलचें वर्षासन तुम्हांस केव्हांहि देण्यांत येईल. "

हुंडी खिशांत घालतां घालतां मीं म्हटलें, " क्याप्टनसाहेब, हा वेळपर्यंत आपणां दोघांची तोंडओळख सुद्धां नव्हती. मग माझ्याबद्दल तुमची इतकी खात्री कशी झाली ? "

पुनः त्यांचें तें विशिष्ट स्मित त्यांच्या चेहऱ्यावर दिसूं लागलें. ते म्हणाले, " या प्रश्नाचें उत्तर देण्याचें कांहीं कारण नाहीं. मला वरून असे हुकूम मिळतात, तशी मी अम्मल बजावणी मात्र करतों. "

त्या वेळीं मी अननुभवी तरुण होतों, आणि साऱ्या गोष्टी आपणास समजाव्या अशी प्रबल इच्छा माझ्या मनांत होती. या इच्छेला अनुसरून मीं म्हटलें, " तुमच्यावर कोण आहेत, आणि त्यांनीं तुम्हांला काय हुकूम दिला आहे ? "

हा प्रश्न विचारतांच हेर खात्यांतला पहिला धडा मला मिळाला. क्याप्टन्‌साहेबांच्या चेहऱ्यावरचा स्नेहाळूपणा एकदम मावळला. ते म्हणाले, " डॉक्तर, आतां मी काय सांगतों, हें पक्कें लक्षांत ठेवा व तें कधींहि विसरूं नका. अधिकाऱ्यांना कधींहि प्रश्न विचारूं नये. उगीच बडबड करूं नये. आपले विचार आपल्याच मनांत ठेवावेत. आमच्या या खात्याचे पुष्कळसे गुप्त कायदे आहेत, ही गोष्ट पुढें लवकरच तुमच्या प्रत्ययास येईल. "

माझ्या नोकरींतील हा पहिला धडा मी कधींहि विसरणार नाहीं.

---

## प्रकरण दुसरें.

## धंद्याची पूर्व तयारी.

:0:

युरोपियन राष्ट्रांतील राजकीय हेरांच्या हालचाली, त्यांचीं साधनें आणि त्यांचें साध्य यांजबद्दल सामान्य मनुष्यांस अगदीं पुसट कल्पना मात्र असते. राजकीय हेरांनीं केलेल्या कामगिऱ्यांसंबंधीं ज्या कांहीं लहानसहान गोष्टी किंवा कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या आहेत, त्यांनीं सामान्य मनुष्याचें मन बुचकळ्यांत मात्र पडतें. ह्या लेखकांना प्रत्यक्ष अनुभव कांहींच नसल्यामुळें ह्या धंद्याचें अस्पष्ट व गोंधळांत पाडणारें चित्र ते वाचकां-समोर उभें करतात. या धंद्याची स्पष्ट व न फुगविलेली अशी ही हकीगत आज प्रथमच प्रसिद्ध करण्यांत येत आहे. या धंद्यांत कसल्या प्रकारच्या स्त्री-पुरुषांचा अंतर्भाव होतो, यांत कसल्या प्रकारचें साहित्य लागतें आणि केवढा मोठा धोका असतो, इत्यादि अनेक बाबींचा खुलासा

मी स्पष्टपणें करणार आहें. अगदीं बायबलाच्या काळापासून तों नेपोलियन-पर्यंत सर्व राजेरजवाड्यांस, प्रधानांस आणि इतर खात्यांच्या अधिकाऱ्यांस खुल्या मार्गापेक्षां इतर अंतस्थ मार्गांनीं बाहेरील माहिती मिळविणें भाग झालें आहे. नेपोलियन बोनापार्ट यानें प्रथम शिस्तवार रीतीनें हेरखातें निर्माण केलें. बाहेरील माहिती आपणास मिळावी म्हणून गुप्त रीतीनें काम करणारीं स्त्री-पुरुषें नौकरींत ठेवण्याचा प्रघात जुन्या काळापासून चालत आला आहे. परकीय देशांत ठेवलेले वकील आणि कॉन्सल वगैरे इतर कामदार यांना सर्व प्रकारची माहिती मिळविणें शक्य नसतें. कारण हीं माणसें उघडपणें परराष्ट्रीय असल्यामुळें त्यांच्याशीं कोणीहि मोकळया मनानें बोलत नाहीं. अशा माणसांशीं बोलतांना स्वभावतःच फार सावधगिरी बाळगली जाते. दुसरें असें कीं, वकील अथवा कॉन्सल या जागाचा सरकारी दर्जा मोठा असल्यामुळें खुल्या राष्ट्रनीतीस अननुरूप अशी कोणतीहि कामगिरी त्यांनां करतां येत नाहीं. हल्लींच्या शास्त्रीय युगांत सर्व प्रकारची वाढ मोठ्या झपाट्यानें झाली आहे. हल्लीं कोणतीहि गोष्ट घडावयाची झाली, तरी ती पूर्वींपेक्षां किती तरी कमी वेळांत घडून येते. यामुळें परराष्ट्रांतील माहिती जितकी अचुक व जितक्या लवकर मिळेल तितकी हवी, असें झालें आहे. सध्यां युरोपची स्थिति सर्वत्र लष्करी तळ पडल्यासारखी झाली आहे. सर्व राष्ट्रें बहुधा सारख्याच तोलाचीं असून परस्परांबद्दल त्यांच्या मनांत थोडी फार तरी भीति वसत आहे. परस्पर असलेले हितसंबंध आणि एकमेकांचा अविश्वास या दोन कारणांमुळें जर्मनी, इंग्लंड, फ्रान्स आणि रशिया या चौकडीला कोट्यवधि रुपये युद्धसाहित्यावर खर्च करावे लागतात. आज जर्मनीनें एक बेडर जहाज बांधलें कीं, उद्यां इंग्लंड दोन बांधितें. इकडे फ्रान्सनें दहा नव्या पलटणी उभ्या केल्या कीं, जर्मनींत वीस नव्या पलटणी उभ्या होतात. अशा रीतीनें या शर्यतींत मागें न पडण्याची खबरदारी सर्व राष्ट्रें घेत आहेत, तथापि यंत्रकलेची वाढ, शस्त्रास्त्रांतील नवे शोध, विमानें इत्यादि अनेक साहित्या-मुळें या राष्ट्रांच्या युद्धसामग्रीच्या समतोलपणांत वारंवार बिघाड होत असतो. याच ठिकाणीं कित्येक माणसांची राजनीति आणि महत्त्वाकांक्षा हीं

सुद्धां आपलीं डोकीं खुपसतात. कारण दुसऱ्या कोणत्याहि राष्ट्रांच्या मागें आपण पडूं नये, इतकेंच नव्हे, तर आपल्या राष्ट्रानें या बाबतींत सर्वांवर अग्राडी मारावी, या करतां सर्व राष्ट्रांतील राजमंडळाची धडपड चालू आहे. यामुळें कोणतें राष्ट्र काय करीत आहे, याचा सुगावा काढण्यासाठीं हीं राष्ट्रें परस्परांवर बारीक नजर ठेवीत असतात. ही अंतस्थ माहिती मिळविणें असेल, तर शिस्तवार हेरखातें निर्माण करूनच ती मिळण्यासारखी आहे. या खात्यांतील स्त्री पुरुषांना विशिष्ट पद्धतीचें शिक्षण द्यावें लागतें. आणि तीं स्त्री-पुरुषेंहि निधड्या छातीचीं असलीं पाहिजेत. या धंद्यांत केव्हां कसलें संकट उद्भवेल याचा नियम नसतो.

संकटें तर नेहमींच उद्भवतात. कैदेंत जाण्याचा प्रसंग मला दोनदां आला. एकदां सर्व्हियांतील बेलग्रेड शहरीं आणि दुसऱ्या खेपेस इंग्लंडांत. पांच वेळेला मारामारीचे प्रसंग मजवर आले ! आणि त्यांच्या निशाण्या अद्यापि माझ्या शरीरावर आहेत. शेंकडों वेळां संकटांतून मी अचानक सुटलोंहि आहें. माझ्या सर्व कामगिऱ्या सफल झाल्या असें नाहीं. पुष्कळशा कामगिऱ्यांत मला अपयश आलें आणि या धंद्यांतलें अपयश म्हणजे यमाच्या दरबारांतलें वारंट. उदाहरणार्थः—सर्व्हियांत जो एक मोठा कट कित्येक दिवस चालू होता, त्याची अखेर १९०३ सालांतील तारीख ११ जून रोजीं झाली आणि त्यांत राजा, राणी, राजमंडळ व इतर राजकीय पुरुष यांचे बळी पडले. या भयंकर अत्याचाराच्या मुळाशीं कसल्या प्रकारचें राजकीय वातावरण पसरलें होतें, याचा अधिक तपशील सांगण्याचें कारण नाहीं. पण पुढें माझ्या सरकारने मला या बाबीची कांहीं माहिती मिळविण्यासाठीं बेलग्रेड येथें पाठविलें. या अत्याचाराचे मूळ प्रवर्तक कोण होते, ही माहिती आमच्या सरकारास हवी होती. यात कर्नल म्याशिन व सहाव्या पलटणींतील कित्येक अधिकारी यांचें प्रमुखत्वानें अंग होतें, असें पुढें दिसून आलें. राजाच्या रक्तानें हात माखविणाऱ्या या राक्षसांना रशियन सरकाराकडून पैशाचा पुरवठा होत असे. कारण ऑब्रोनोव्हिच घराणें आस्ट्रियाकडे ओढा दाखवूं लागल्यामुळें रशियाला तें अप्रिय व भीतिमूलक झालें होतें. राजाची मूर्खपणाची वागणूक

आणि ड्रागा राणीचें अनेक वेळां झालेलें अप्रासंगिक वर्तन इत्यादि कारणांनीं हें घराणें लोकांच्याहि मर्जीतून उतरलें होतें.

अशा स्थितींत बेलग्रेड येथें जाऊन आपलें नाक खुपसणें म्हणजे गांधील माशांचें पोळें उठविणेंच होय आणि हा अनुभव मला पुढें आलाच. लेफटेनेंट कर्नल निग्लीश यांच्या हुकुमावरून मला कैद करण्यात आलें. माझ्यावरचा आरोप ह्मणाल, तर इतकाच कीं, खोटा दाखला घेऊन मी सर्व्हियांत शिरलों. उचल आणि दे सुळीं अशी स्थिति या वेळीं सर्व्हियांत होती. खरें पाहिलें, तर माझ्या जवळ त्या वेळीं संशय घेण्याजोगे कसलेहि कागदपत्र नव्हते; पण त्या वेळच्या सरकारच्या विरुद्ध जे कांहीं लोक होते, त्यांच्या संगतींत मी आढळल्यावरून कसल्या तरी आरोपावरून एखाद्या सांगकाम्या कोर्टापुढें मला त्या सरकारानें उभे केलें होतें.

पेटीप्यारीशियन नांवाच्या एका उपाहार गृहांत मी बसलों होतों. मजबरोबर लेफ्टनंट निकोलव्हिच आणि क्रास्टोक नांवाचे एक बेलग्रेड येथील व्यापारी बसले होते. इतक्यांत सोजिरांची पार्टी घेऊन ऑफिसर आंत आले आणि आह्मांस आमच्या खुर्च्यांवरून ओढून किल्ल्याकडे घेऊन गेले ! दुसऱ्या दिवशीं सकाळीं आह्मां तिघांस तीन कर्नलांच्या कोर्टापुढें वेगवेगळे उभें करण्यांत आलें. या कोर्टानें आह्मांस कोणताहि प्रश्न विचारला नाहीं.

कोर्ट मला म्हणालें, " बंडखोरांच्या संगतींत असतांना तुला कैद करण्यांत आलें आहे. आमच्या देशांत प्रवास करण्यास मोकळीक असल्याबद्दलचा जो दाखला तुजजवळ आहे, तो तुझा स्वतःचा नाहीं. सूर्यास्ताच्या वेळीं गोळी घालून तुला मारण्यांत यावें, अशी शिक्षा कोर्ट फर्मावित आहे. "

खरोखर ही सारी थट्टा असावी, असा माझा प्रथम समज झाला. नंतर मला भिवाविण्यासाठीं हा कांहीं डाव केला असेल असेंहि मला वाटलें; पण माझ्या डोक्यांतला हा थट्टेचा भाग लवकरच मावळला. ' कोर्टा ' च्या गालोवराल तीं उंच उंच हाडें, त्यांचे बारीक झालेले डोळे

आणि अगदीं थोडे केंस असलेलीं सुळसुळीत डोकीं, असा हा कोर्टाच उठाव पाहून आतां आपलींहि अस्त्रें फेंकण्याची वेळ आली आहे, असें मला वाटलें. माझ्या पोटांत चाललेली धाकधूक बाहेर दिसूं न देतां मी शांतपणें ह्मणालों, " युद्ध खात्याचे प्रधान एम् झोलारोविच यांस कौंट वेरिंग्रेड हे आदरपूर्वक आपला सलाम पाठवीत आहेत, असें त्यांस कळविण्यांत यावें."

माझें हें भाषण ऐकून ते तिघे कर्नल एकमेकांकडे चमत्कारिक मुद्रेनें पाहूं लागले. नंतर मधल्या कर्नलनें बऱ्याचशा प्रश्नांचा गोळीबार माझ्यावर झाडला. त्यांपैकीं एकाचेंहि उत्तर न देतां मी नुसती तिरस्काराची मुद्रा धारण केली होती. शेवटीं मी ह्मणालों, " मला जें सांगावयाचें होतें, तें मी सांगून चुकलों आहें."

कोर्टांतून मला माझ्या कोठडींत परत नेण्यांत आलें. दुपारीं चार वाजण्याच्या सुमारास त्या तिघांपैकीं एक कर्नल मजकडे आले आणि मला म्हणाले, " तुमचा निरोप पाठविला गेला नाहीं. कारण माझ्या जोडीदारांना तसें करणें बरें वाटलें नाहीं. झोलारेविच यांच्याशीं माझें नातें आहे. तेव्हां त्यांना निरोप पाठविण्याइतकें सबळ कारण तुम्ही दाखवित असाल, तर तुमचा निरोप मी त्यांना कळवीन."

मीं माझें कारण त्याला सांगितलें. तें त्याला इतकें सबळ वाटलें कीं, झोलारेविच यांच्याकडे जाण्यासाठीं तो तावडतोब उठला. माझ्या कोठडींतून बाहेर पडतांना या कर्नलचा चेहरा पिठासारखा पांढरा झाला होता. आपलें काय होणार, याबद्दल फारशी फिकीर या वेळीं माझ्या चित्तांत नव्हती; पण संध्याकाळीं साडेसाताच्या सुमारास जेव्हां दोन सोजीर संगिनीसह आणि आपल्या गोळीबाराच्या तोस्दानासह माझ्य खोलींत आले आणि याशिवाय दुसरे दहा सशस्त्र सोजीर व एक ऑफिसर बाहेरील मैदानांत उभे असलेले मीं पाहिले, तेव्हां मात्र माझ्या अंगांतील सारें रक्त गोठून गेलें. आमच्यावर होणाऱ्या गोळीबाराची ही तयारी आहे, असें माझ्या तेव्हांच लक्षांत आलें. माझा निरोप योग्य स्थळीं पोंहोंचला असला, तर मला कांहीं धोका नाहीं, याबद्दल माझी

खात्री होती; पण वेळ पडली झोटिंग बादशाहीची. अनेक कारणांनीं माझा निरोप पोंहोंचण्यास दिरंगाई होणें या वेळीं अगदीं शक्य होतें.

त्या सोजिरांनीं आपल्या मध्यभागीं मला घातलें आणि किल्ल्याच्या पश्चिम भागाकडे असलेल्या एका टेंकडीकडे मला नेलें. एका जुन्या काळच्या मठाचा मोडकातोडका भाग एका बाजूला मला दिसत होता. आजूबाजूला कांहीं जुन्या थडग्यांचे धोंडेहि विखुरलेले होते. अशा या जागेंतून आमची रवानगी यमाच्या राजधानीकडे होत होती. एका दगडी भिंतीजवळ आल्यानंतर आह्मी सर्व उभे राहिलों. ऑफिसरानें एक सरकारी कागद खिशांतून बाहेर काढला आणि तो वाचण्यास आरंभ केला. ही सारी चर्पटपंजरी सर्व्हियन भाषेंत लिहिलेली होती.

हा वेळपर्यंत कोणी कोणाशीं एक शब्द देखील बोलत नव्हतें. ऑफिसराचें वाचन संपल्यानतर मीं त्याला मोठ्या विनयानें म्हटलें, " मी जातीचा सर्ब नाहीं. यामुळें तुम्ही काय वाचलें, तें मला समजलें नाहीं. याकरितां जर्मन किंवा फ्रेंच यांसारख्या एखाद्या सुधारलेल्या भाषेंत तुमच्या कागदांतला मतलब मला सांगितला, तर मजवर मोठे उपकार होतील. " माझें भाषण ऐकून तो थोडा दचकल्यासारखा दिसला. मी सर्ब आहें, असा त्याचा समज होता. कोणी तरी भयंकर चूक करीत आहे, व या चुकीचें प्रायश्चित त्यास मिळाल्यावांचून राहणार नाहीं, अशा अर्थाचीं कांहीं वाक्यें जर्मन आणि फ्रेंच भाषेंत मीं ठांसून बोललो. त्या दोन्ही भाषा त्याला समजत होत्या. माझें जरबीचें भाषण ऐकून तो ऑफिसर मनांतल्या मनांत खूप चरकला; तथापि तसाच धीर धरून तो ह्मणाला, " मला मिळालेल्या हुकुमाप्रमाणें कामगिरी बजावणें, मला भाग आहे. " युद्धखात्याच्या प्रधानाला मीं निरोप पाठविला असल्याचें त्याला सांगीतलें. भाषण लांबवून कसा तरी वेळ काढण्याचा माझा उद्देश होता, हें त्याच्या लक्षांत आलें पण तोहि फारसा घाईत दिसला नाहीं. पांच मिनिटें झालीं. आणखी दहाहि वर झालीं. त्यानें खिशांतून आपलें घड्याळ काढलें. त्या वेळीं आठाला पांच मिनिटें कमी होतीं. घड्याळ परत खिशांत घालून तो ह्मणाला, " आतां मला अधिक थांबतां येत

नाहीं." त्यानें एका सार्जेटला हाक मारली. सार्जेटनें मला भिंतीशीं टेंकून उभें केलें आणि डोळे बांधण्यासाठीं एक हातरुमाल माझ्यापुढें केला. मला हातरुमालाची जरूर नव्हती. त्या ऑफिसरनें कांहीं हुकुमाचे शब्द उच्चारतांच बारा मॉसर बंदुकांचीं घाणेरडीं कृष्णमुखें माझ्याकडे पाहूं लागलीं.

मला त्या वेळीं काय वाटलें, हें मला सांगतां येत नाहीं. खरी गोष्ट सांगावयाची म्हणजे मला अमुक वाटलें, असें स्पष्टपणें कांहींच सांगतां येत नाहीं. मला इतकेंच आठवतें कीं, दुसऱ्या रांगेंतल्या तिसऱ्या सोजिराला आपली बंदुक चांगली रोखतां येत नव्हती. त्यानें प्रथम माझ्या छातीच्या मध्यभागीं नेम धरला होता. नंतर त्यानें माझ्या नाकाकडे रोंख धरला. या शिपायाचा मला मोठा राग आला. अशा स्थितींत आम्ही किती वेळ उभे राहिलों होतों याची मला कल्पना नाहीं. पुढें मला इतकेंच आठवतें कीं, शस्त्रें जमीनीवर ठेवल्याचा खडखड असा आवाज झाला आणि दोन ऑफिसर रागावून एकमेकांकडे कांहींसे हातवारे करीत आहेत; असेंहि दिसलें. नंतर तीन ऑफिसर माझ्याकडे आले आणि त्यांपैकीं एकानें दारूची बाटली उघडून माझ्या तोंडाशीं धरली. त्या वेळीं तिची मला फार आवश्यकता होती; पण ती बाटली हातांनीं मीं दूर लोटली. इतका सारा वेळ छातीवर आडवे हात ठेवून मी उभा होतों. "ही भागूबाई नाहीं." असेंहि कोणी पुटपुटल्याचें मला आठवतें; पण जर माझी स्थिति त्याला कळती, तर—

असल्या प्रकारचा अनुभव मला घ्यावा लागेल असें जर मला पूर्वीं समजतें, आणि ज्या गोष्टी मला पुढें कळल्या त्या पूर्वींच कळल्या असत्या, तर या नौकरींत मी पडलों असतों कीं, नाहीं, हें मला सांगतां येत नाहीं. असो. आतां ही बाजूची कथा सोडून क्याप्टन ब्याप्केन यांना त्यांच्या ऑफिसांत ज्या दिवशीं भेटावयास मी गेलों, त्या दिवसापर्यंत मागें जाऊं या. क्याप्टनसाहेबांबरोबर नौकरीची व्यवस्था करून मी आपल्या आश्रमांत परत आलों व तेथें पडल्यापडल्या अनेक प्रकारचे विचार माझ्या मनांत घोळूं लागले.

केवळ पैशासाठीं अथवा कांहीं अचाट कामगिरीच्या हौसेसाठीं मी या भानगडींत पडलों नव्हतों. जन्मास येऊन पैसा मिळविणें हेंच सार्थक्य आहे, असें मला कधींच वाटलें नाहीं, आणि यापुढें वाटणारहि नाहीं. खाऊनपिऊन सुखासमाधानानें राहतां येईल, अशी माझी स्थिति होती. आणि जगांतील विलक्षण गोष्टी करण्याच्या हौसेसंबंधीं म्हणाल, तर बोअर युद्धांत ही माझी हौस पुरी भागली होती. छट ! असल्या गोष्टीसाठीं कांहीं मीं नौकरी पत्करली नव्हती. माझें खरें कारण वेगळेंच होतें. माझ्या पूर्वार्जित हक्कांतून ज्यांनीं मला हुसकून लावलें होतें, त्यांजवर मात करतां आली तर पहावी, असा माझा उद्देश होता. ही गोष्ट मला साध्य होईल याबद्दल कौंट रिटझेन्स्टीन यांची पक्की खात्री होती. अशा रीतीनें अनेक प्रकारचे विचार चित्तांत घोळवीत मी आपल्या खोलींत पडलों होतों. त्या वेळीं भविष्य जाणण्याची दृष्टि जर मला असती, तर या हेराच्या धंद्यांत मी कधींहि पडलों नसतों; पण वयाच्या ३९ साव्या वर्षीं जें शहाणपण मला अनुभवानें मिळालें, तें चोविसाव्या वर्षीं मजपाशीं नव्हते, याबद्दल आश्चर्य वाटावयास नको.

आपला भविष्यकाळ या पुढें सुखाचा जाणार, असे मांडे मनांत खात-खात दुसऱ्या दिवशीं सकाळीं मी लवकरच उठलों व क्याप्टन टयाप्केन यांच्या ऑफिसांत गेलों. बरोबर दहा वाजतां मी आरमारी खात्यांत जाऊन हजर झालों आणि पूर्वींप्रमाणेंच दरवाजाजवळील सारे सस्कार उरकून क्याप्टन टयाप्केन याचे खाजगी चिटणीस हर्र फॉ स्टयामर यांजपुढें जाऊन उभा राहिलों. हर्र स्टयामर हे फार वस्ताद आणि हिशोबी गृहस्थ आहेत. प्रत्येक गोष्टींत आपला नफातोटा पाहण्याची बनियाबुद्धि त्यांजपाशीं भरपूर आहे. हे मोठे मनमिळाऊ, गोड स्वभावाचे आणि अघळपघळ बोलणारे आहेत. स्वतःच्या हेतूंचा थांग लागूं न देतां लोकांच्या पोटांत शिरून त्यांजकडून अधिक माहिती मिळविण्याची विद्या यांना पुरी अवगत झाली आहे. हेरखात्यांतल्या यच्चयावत बाबींची तपशीलवार जंत्री यांच्या अगदीं जिभेवर असते. या बाबतींत हे गृहस्थ म्हणजे हेरखात्याचा जिवंत

विश्वकोशच होत. तसेंच हेरखात्यांत नवे चेले तयार करण्याच्या कामीं हे अगदीं बिनतोड गुरु आहेत.

फॉ स्व्यामर यांच्या आफिसांत मी जातांच, ते मला ह्मणाले, "आजपासून यापुढें तुह्मी सदोदित आमच्या हाकेस हजर झालें पाहिजे. आतां सर्वस्वी तुह्मी आमचेच झालां आहां, असें समजा. रोज दुपारीं बरोबर बारा वाजतां मी सांगेन त्या नंबराच्या टेलीफोनवर तुह्मी हजीरी देत जा. आम्ही ह्मणूं त्या वेळेस तुमच्याशीं आह्मांला बोलतां येईल, अशी व्यवस्था सदोदित राहिली पाहिजे. पुढील नियमहि पक्के लक्षांत ठेवा. तुह्मांला कोणत्या कामगिरीवर पाठविलें आहे, याबद्दल चकार शब्दहि बाहेर फुटूं नये. खात्याच्या मुख्य अधिकाऱ्याशिवाय अथवा ज्या कोणास तुमच्याकडे पाठविण्यांत येईल, त्या गृहस्थाखेरीज दुसऱ्या कोणत्याहि खालच्या दर्जाच्या अमलदाराशीं तुह्मीं संभाषण करूं नये. जवळ कसलेंहि टिपण बाळगूं नये. अथवा दुसरे कसलेहि कागदपत्र जवळ असूं नयेत. हेरखात्यांतल्या दुसऱ्या नौकराजवळ आपल्या कामासंबंधीं कधींहि बोलूं नये. दुसऱ्या कोणत्याहि नौकराशीं फार सलगी करणें हें आमच्या नियमाच्या अगदीं विरुद्ध आहे. कोणतेहि मादक पेय कधींहि पिऊं नये. कोणत्याहि प्रकारच्या स्त्रियांशीं संबंध ठेवूं नये. यापुढें आमच्याशीं तुमचा संबंध नांवानें न होतां एका विशिष्ट नंबरानें होत जाईल. कामगिरीचे रिपोर्ट करण्याची वेळ येईल तेव्हां हा नंबर कळवावा. तारा अथवा टेलीफोन करणें शक्य तोंपर्यंत टाळीत जावें. अगदीं निकडीचें काम असेल, तर तसें करीत जा; पण त्या वेळीं तुह्मांला दिलेल्या संकेत भाषेचा उपयोग करीत जा."

अशाच प्रकारें आणखीहि पुष्कळशा बारीकसारीक सूचना त्यांनीं मला दिल्या. त्या देतांना या खात्याच्या एकंदर पद्धतीचाआढवा त्यांनीं मला सांगितला होता. हें बाकीचें लांबलचक भाषण सामान्य वाचकांस कंटाळवाणें होण्याचा संभव असल्यामुळें येथें देत नाहीं. त्या दिवशीं दुपारचा सारा वेळ मीं या ऑफिसांत काढला. मी बाहेर पडलों त्या वेळीं फॉ टचाप्केन यांजकडून बोलावणें येऊन आपली आपल्या पहिल्या कामगिरीवर लवकरच रवानगी होणार, अशा आशेंत मी चूर झालों होतों पण

माझी ही आशा मनांतल्या मनांतच जिरली. माझी पहिली कामगिरी मला मिळण्यापूर्वी पांच महिने मला वाट पहावी लागली. इतके महिने वाट पाहून अखेरीस जी कामगिरी मिळाली, ती सुद्धां अगदीं फुसकी. हे पांच महिने माझें शिक्षण चालू होतें. दिवसांमागें दिवस आणि आठवड्यांमागें आठवडे या नोकरीला लागणाऱ्या अवश्य विषयांचें शिक्षण मला देण्यांत येत होतें.

या शिक्षणात सामान्यतः चार विषय येतात. भूनिरीक्षण, त्रिकोणमिति, युद्धनौकाबंधन आणि चित्रकला. माझी ज्या ज्या कामगिऱ्यांवर नेमणूक झाली होती, त्याच्या स्वरूपावरून या शिक्षणाचें महत्त्व वाचकांस कळून येईल. माझे सारे शिक्षक आपापल्या कलेंत अत्यंत तरबेज होते. एखाद्या हेराला फ्रान्समधल्या व्हर्डूनसारख्या किल्ल्याची परिस्थिति, त्याची शस्त्रास्त्रसामग्री इत्यादिकांचें निरीक्षण करण्याकरितां पाठविलें, तर लांबीरुंदीचें मापन, उंची, कोण व भोंवतालच्या जमीनीची ठेवण इत्यादि गोष्टींचा अदाज बरोबर करतां आला पाहिजे. ज्याला या गोष्टींचें अगदीं सशास्त्र शिक्षण मिळालें असेल, असाच मनुष्य हे काम बरोबर करूं शकेल. भूनिरीक्षणाचें शास्त्र त्याच्या जिव्हाग्रीं असलें पाहिजे. त्रिकोण मितीच्या सहाय्यानें सर्व हिशेब त्याला बरोबर व जलद करतां आले पाहिजेत. तसेंच मनांत ठरविलेले हे सारे अंदाज कागदावर स्पष्ट करून दाखविण्याइतकी रेखाविद्याहि त्याच्या जवळ असली पाहिजे. पोर्टआर्थर किल्ल्याची पहाणी करण्यासाठीं मला पाठविण्यांत आलें होतें, त्या वेळीं हें शिक्षण मला फार उपयोगीं पडलें.

हीच गोष्ट युद्धनौका बांधण्याच्या कलेलाहि लागू आहे. टारपेडो बोट आणि टारपेडो डिस्ट्रायर ( विनाशिका ) यांतला फरक सामान्यतः नौकरींत शिरण्यापूर्वीं मला माहीत होता; तथापि निरनिराळ्या जातींची बांधणी आणि त्यांतील सर्व प्रकारच्या यंत्रांच्या रचना इत्यादि तपशिलाचें खास वर्णन मला देतां येत नव्हतें. लेफ्टनंट-क्याप्टन कर्टस्टिफन्स् हें या विद्येंतले माझे गुरु होते. टारपेडोच्या विद्येंत हे गृहस्थ जर्मन आरमारी खात्यांत पहिल्या प्रतीचे निष्णात म्हणून गणले जातात. एक महिना यांच्या हातीं शिक्षण घेतल्यानंतर मला टारपेडो ( आगमासा )

च्या निरनिराळ्या जाती, पाणबुड्या बोटी, पाणसुरुंग इत्यादिकांचें बरोबर वर्णन देतां येऊं लागलें. आगमासा पाण्यांत सोडला ह्मणजे, जो विशिष्ट प्रकारचा आवाज तो करतो, त्यावरून तो व्हाइटहेड जातीचा आहे कीं, ब्रेनन जातीचा आहे, हें सुद्धां मला सांगतां येऊं लागलें.

त्याचप्रमाणें प्रत्येक जातीच्या आरमारी तोफेंतील यंत्ररचनेचेंहि शिक्षण मला देण्यांत आलें होतें. युद्धांत लागणाऱ्या जिनसांचे डझनोगणती नमुने मला दाखविण्यांत येऊन त्यांच्या स्वरूपाची फोड केली जात असे. जगांत जितक्या युद्धनौका आहेत, तितक्या साऱ्यांच्या प्रतिमा माझ्या पहाण्यांत आल्या होत्या. बातमीखात्याच्या एका खोलींत निरनिराळ्या जातींच्या युद्धनौकांचीं आकाशचित्रें (सिलहुट) टांगून ठेवलेलीं होतीं. एकसारखें या चित्रांकडे पहात मला कित्येक दिवस बसविण्यांत आलें होतें. गलबत समुद्रांतून चालूं लागलें म्हणजे आकाशाच्या पोकळींत त्याची जी छाया क्षितिजावर लांबून दिसते, तिला आकाशचित्र ( सिलहुट ) असें म्हणतात. या निरीक्षणात शेवटीं मी इतका तरबेज झालों कीं, नुसत्या दृष्टिक्षेपाबरोबर दर्यांत दूरवर चाललेलें गलबत, ब्याटलशिप, क्रूझर, कीं डिस्ट्रायर आहे, हें मला सांगतां येऊं लागलें. तसेंच तें इंग्रज, फ्रेंच, रशियन किंवा अमेरिकन बांधणीचें आहे, हें सुद्धां मी बिनचूक सांगूं लागलो. इंग्लंडांत मला एका कामगिरीवर पाठविलें होतें, त्या वेळीं ब्रिटिश जहाजांच्या आकाशचित्रांची पुन्हां एकवार मजकडून उजळणी करून घेण्यांत आली होती. कारण फार दूर अंतरावरून सुद्धां चाललेल्या गलबताची जात मला ओळखतां यावी, अशी आवश्यकता माझ्या या कामगिरींत होती. जगांतील सारे आरमारी कामदार, त्यांचे निरनिराळ्या दर्जाचे आरमारी पोषाख, नौकेवरील इतर माणसांची संख्या, त्यांची निशाणसंकेताची भाषा आणि त्यांचे इतर प्रकारचे संकेत, या साऱ्यांची तपशिलवार माहिती मला देण्यांत आली होती. एका पुस्तकांत जगांतील सर्व आरमारी पोषाकांचीं आणि खुणांच्या निशाणांचीं रंगीत चित्रें काढलेलीं होतीं. या सर्व चित्रांचा अभ्यास मला करावा लागला. यांत शेवटीं मी इतका तरबेज झालों, कीं नुसती नजर फेंकण्याबरोबर हा अमुक दर्जाचा

ऑफिसर आहे, असें मला बिनचूक सांगतां येऊं लागलें. अशा रीतीनें जगांतील प्रमुख राष्ट्रांच्या आरमारांची सर्व माहिती मला देण्यांत आली होती. हीच गोष्ट सर्व निशाणांच्या अभ्यासासहि लागू होती. या चित्रांच्या अभ्यास करण्यांत मीं रात्रिच्या रात्री घालविल्या आहेत. माझ्या शिक्षणाचे नेमलेले तास म्हटले म्हणजे सकाळीं दहापासून बारा आणि दुपारीं दोन-पासून सहापर्यंत होते; पण या ठरलेल्या वेळांत अभ्यासाचा सारा क्रम सपणे अशक्य होतें व मी तर माझ्या पहिल्या कामगिरीवर जाण्यास अत्यत आतुर झालों होतों, यामुळें अभ्यासावर मीं बराचसा घोड्या मारला होता. माझें सारें शिक्षण बर्लिन येथें झालें असें नाहीं. माझा कांहीं अभ्यास बर्लिन येथें कोनिगरग्राडझर रस्त्यावर आणि कांहीं झूघॉस नांवाच्या युद्धखात्याच्या मोठ्या संग्रहालयांत झाला, तथापि पुष्कळ वेळां कील आणि वुइलियमसहेवन येथील सरकारी प्रचंड गोद्यांतहि मला जावें लागलें. नौकाबंधन विद्येंतील यंत्ररचनेची तपशीलवार माहिती मला येथें देण्यांत आली. एकाद्या तोफेचे, आगमाशाचे अथवा [illegible] निरनिराळ्या जागीं पडलेले भाग पाहून ते कसे जोडावयाचे, व त्यांचा उपयोग काय इत्यादि गोष्टींची सुबुद्ध चर्चा मला करतां येई-पर्यंत मला येथून रजा मिळाली नाहीं.

अशा रीतीनें जर्मनींतील निरनिराळ्या निष्णात गुरूंच्या हाताखालीं शिक्षण घेत असतां जर्मन युद्धखात्याजवळ किती पूर्ण व तपशीलवार माहिती भरलेली आहे, आणि या खात्याची एकंदर रचना किती निर्व्यंग व परिपूर्ण आहे, हे पाहण्याची मला संधि प्राप्त झाली. खरोखर म्हटलें तर मीं आपली दृष्टि आपल्या रेखीव शिक्षणाच्या बाहेर बरीच लांबविली होती. जर्मन युद्धखात्यांत जी गुप्त माहिती गोळा करून ठेवलेली आहे, ती जमा करण्यास किती श्रम, वेळ आणि पैसा लागला असेल हें पाहिलें आणि तसेंच जर्मन साम्राज्यांत युद्धशास्त्र किती पूर्णत्वास गेलें आहे, याचा विचार केला, म्हणजे मन आश्चर्यानें अगदीं भांबावून जातें. असो. यासंबंधीं अधिक माहिती पुढें एकादे वेळीं मी सांगेन.

माझ्या चौकस स्वभावामुळें ज्या विषयांचें शिक्षण मला मिळत असे, त्या व्यतिरिक्त बऱ्याचशा इतर गोष्टीहि मला कळल्या. या खात्याच्या एकंदर रचनेचा विचार मी करूं लागलों. परदेशांत हेर पाठवून तेथील गुप्त गोष्टींची माहिती मिळवावी यासाठीं जीं हेरखातीं निर्माण केलीं गेलीं आहेत, त्यांतील सामान्य रहस्य थोडक्यांत सांगतों.

यूरोपांत या खात्याच्या चार प्रकारच्या पद्धति अस्तित्वांत आहेत. केवळ पद्धतशीर रीतीनें काम करण्यासंबधीं पाहिलें तर जर्मन पद्धतीचा नंबर सर्वांत वर लागेल व त्यानंतर अनुक्रमानें रशियन, फ्रेन्च आणि इंग्लिश असे नंबर लागतील. हिंदुस्थान आणि आशियांतील इतर ब्रिटिश प्रदेश यांतील ब्रिटिश हेरखातें उत्तम प्रतीचे आहे व या संबंधांत ब्रिटिश राष्ट्र युरोपांतील चळवळींत अलीकडेच पडूं लागलें आहे. याशिवाय इंटरन्याशनल सिक्रेट सर्व्हिस ब्यूरो या नांवाची एक निमखाजगी संस्था बेल्जम देशांत आहे. ही संस्था योग्य रक्कम मिळाल्यास वाटेल त्या राष्ट्राला विश्वसनीय माहिती मिळवून देण्यास तयार असते. बाह्य देशांतील यांत्रिक रहस्यांची माहिती काढण्याचें काम बहुधा या संस्थेकडे सोंपाविलें जातें. एकादें राष्ट्र नवी तोफ तयार करीत असलें अथवा कोठें बारीक सारीक तटबंदी होत असली, तर त्यासबंधाची माहिती मिळविण्याचें काम बहुधा या संस्थेकडे सोंपविलें जातें. ही संस्था कोणत्याहि विशिष्ट राष्ट्राकारितां नसून जो कोणी पैसा देईल त्याचें काम ती करीत असते. तिचें मुख्य ठाणें ब्रुसेल्स् येथें आहे. किरकोळ कामाशिवाय प्रसंगीं एखाद्या महत्त्वाच्या कामगिरीकरितां यासंस्थेचा उपयोग करून घेतला जातो. उदाहरणार्थः—

एकाद्या राष्ट्रानें परकीय राष्ट्रांतली माहिती मिळविण्यासाठीं जे हेर नेहमींच्या नोकरींत ठेवलेले असतात, त्यांशिवाय इतरांकडून माहिती मिळविण्याचा प्रसग फारसा येत नाहीं; पण असाहि एक प्रसंग ब्रुसेल्स येथील रशियन हेरांवर थोड्या वर्षांपूर्वीं आला होता. स्विझरलंडांत मांट्रो येथें कांहीं बंडखोर लोकांनीं एक प्रकारची लहानशी वसाहत केली होती यांतील पुढाऱ्यांचीं नांवें व ते कोण व कोठले राहणारे इत्यादि बाबींची माहिती सेन्ट पिटर्सबर्ग ( पेट्रोग्राड ) येथील मुख्य अधिकाऱ्यास हवी

होती. या कामावर थेरेसा प्रिव्हो या नांवाच्या एका फ्रेंच स्त्रीची नेमणूक झाली होती. थेरेसा अगदीं तरुण आणि मोठी चतुर होती. तिच्याच बरोबर काम करण्यास तिचा " भाऊ " ह्मणून चार्लस प्रेव्हो या नांवाच्यां गृहस्थास नेमलें होते.

रशियांतून पळून आलेल्या या बंडखोरांचा प्रमुख कोण आहे, याची माहिती रशियन अधिकाऱ्यास पाहिजे होती. जिनीव्हा सरोवराच्या कांठीं ही मंडळी रहात असे. यांच्या म्होरक्याचें नांव गोलुकॉफ्स्की असें होतें. याला बावीस वर्षांचा एक मुलगा असून तो थोडासा भोळा होता. यामुळेच तरुण आणि सुंदर थेरेसा बाईचा उपयोग करून घेण्यांत आला होता. ही स्त्री ब्रुसेल्स येथील इंटरन्याशनल संस्थेंत काम करीत होती.

या स्त्रीनें जिनीव्हा येथें जाऊन कानडा देशांतील एका लखपतीची आपण मुलगी आहों अशी अफवा पसरावी, असें ब्रुसेलच्या संस्थेनें ठरविलें. आरंभींच्या खर्चासाठीं तिजबरोबर पांच हजार फ्रँक म्हणजे सुमारे तीन हजार रुपये देण्यांत आले होते. ही रकम व चार्लस् यांस बरोबर घेऊन मांट्रोच्या ठाण्यावर या बाईनें हल्ला केला. वृद्ध गोलुकॉफ्स्कीच्या तरुण मुलावर आपले मोठें प्रेम जडलें आहे, असा बाहणा तिनें केला. दिवसच्या दिवस ती या तरुणाच्या संगतींत घालवीत असे. शेवटीं या दोघांचें लग्न ठरलें. नवऱ्यामुलीचा 'भाऊ' चार्लस् प्रेव्हो हाहि म्हाताऱ्या गोलुकॉफ्स्कीबरोबर गुळचट गप्पा मारण्यांत गुग असे. ही गोष्ट जिनीव्हा येथील लोकांना अद्यापिहि आठवत असेल.

या नंतर नेहमींच्या चालीप्रमाणें कानडाच्या लखपतीच्या या मुलीनें गोलुकॉफ्स्की, त्याचें कुटुंब व त्याचे सारे आप्तइष्ट यांना केळवणास बोलाविलें. या समारंभाकरतां नवऱ्या मुलीनें पाण्यासारखा पैसा खर्च केला होता. ' आणखी पैसा पाठवा ' अशा अर्थाचे शब्द वाहून नेतां नेतां बिचाऱ्या ताराहि वांकल्या असतील. गोलुकॉफ्स्कीचे चिरंजीव आपल्या भावी पत्नीसंबंधींच्या चिंतनांत गुंग होऊन गेले होते. आपल्या भावी पतीच्या सर्व मित्रांनीं ( सर्व बंडखोरांनीं ) या समारंभास हजर राहिलेंच पाहिजे, अशी अत्यंत आग्रहाची विनंति तिनें वृद्धया गोलु-

कॉफ्स्कीला केली होती. त्यांच्या नांवाच्या निमंत्रण चिठ्या तिनें स्वतः लिहावयाचा बेत केला; पण त्यांच्या नांवांचीं स्पेलिंगें आपणास समजावयाचीं नाहींत असा बहाणा करून भोळ्या आणि उल्लु बनलेल्या तरुण गोलुकॉफ्स्कीकडून एकंदर मंडळीची याद तिनें तयार करून घेतली. तिच्या भावी पतिराजांनीं मोठ्या आनंदानें सारीं नांवें एका कागदावर लिहून तो कागद तिच्या स्वाधीन केला. पिटर्सबर्गच्या अधिकाऱ्यांनाहि याच यादीची जरूर होती.

केळवणाचा दिवस उगवला. थेरेसा एकाद्या परीप्रमाणें नटली होती. जमलेल्या मंडळीपैकीं बुड्ढे लोक सुद्धां तिजकडे टकमका पाहूं लागले. म्हाताऱ्या गोलुकॉफ्स्कीचा आनंद तर गगनांत मावेना. असली सुंदर आणि त्यांतून श्रीमंत मुलगी त्याची सून होणार, याहून अधिक मोठें दैव तें कोणतें !

सर्व मंडळी भोजनाच्या टेबलाभोंवतीं बसली. बर्फांत ठेवून थंडगार केलेल्या नानाप्रकारच्या चिजांचें पहिलें वाढप झालें. इतक्यांत थेरेसा मुर्केत आणि हंसत म्हणाली; " साऱ्या मंडळीला आतां मला चकित करून सोडावयाचें आहे. माझ्या साऱ्या आयुष्यांत असा दिवस फिरून उगवावयाचा नाहीं. त्याच्या स्मरणार्थ माझ्या या जानदोस्तांचा ग्रुप ( एकत्र घेतलेला फोटो ) माझ्या जवळ रहावा अशी माझी इच्छा आहे. आजच्या प्रसंगाचा असा ग्रुप म्हणजे हजारों रत्नांपेक्षां मला अधिक किंमतवान् वाटतो. " काय असेल तें असो; पण त्या मंडळीला ही कल्पना पसंत पडली नाहीं. अशा मंडळीला फोटो काढणें, हें साहजिकच भयंकर वाटतें. थेरेसा म्हणाली, " फोटोच्या साऱ्या प्रती माझे श्वशुर गोलुकॉफ्स्की यांच्यापाशींच रहावयाच्या आहेत." तिजकडून असें आश्वासन मिळाल्यानंतर मंडळी फोटोसाठीं तयार झाली. बाहेरच्या हिरव्यागार पटांगणांत सर्व मंडळीचा ग्रुप जमला. फोटोग्राफरनें आपलें काम केलें. सर्व मंडळी अगदीं पूर्ण आनंदांत होती. फोटोच्या प्रती तयार झाल्याबरोबर त्या थेरेसाच्या हातांत पडल्या. त्याच रात्रीं थेरेसा व तिचा 'भाऊ' यांनीं मांट्रो शहर सोडलें. तरुण गोलुकॉफ्स्कीच्या हातची सर्व बंडखोरांची

यादी आणि त्यांचे फोटो दुसऱ्या दिवशीं इंटरन्याशनल संस्थेंत येऊन दाखल झाले. या कामगिरीबद्दल थेरेसाचा खिसाहि चांगलाच गरम करण्यांत आला. आपणास भेटलेल्या या तरुण रशियनाचे तिनें किती तरी आभार मानले असतील !

ब्रुसेल्सच्या संस्थेंतहि कित्येक वेळां कशा महत्त्वाच्या कामगिऱ्या बजावल्या जातात, याचें हें एक उदाहरण आहे. जर्मन हेरखात्याच्या लष्करी, आरमारी आणि व्यक्तिविषयक अशा तीन निरनिराळ्या शाखा आहेत. यांपैकीं प्रत्येकावर एकेक मुख्य अधिकारी असून त्याच्या हाताखालीं कित्येक बायका आणि पुरुष काम करीत आहेत. जर्मनीच्या हेरखात्यांत उणीपुरीं मीं बारा वर्षं नोकरी केली. लष्करी आणि आरमारी शाखा बर्लीन येथील जनरल स्टाफच्या ताब्यांत आहेत. बर्लीनचा जनरल स्टाफ ही एक जगांतील अत्यंत नमुनेदार संस्था आहे. राजकीय आणि व्यक्तिविषयक शाखा ह्या जर्मनीच्या परराष्ट्रीय खात्याच्या ताब्यांत आहेत. त्यांचें काम खुद्द बादशाहा किंवा त्यांचा हुजूर कामदार यांपैकीं कोणी तरी पहात असतो. सैन्यांचीं शस्त्रास्त्रें, तटबंदी व किल्ल्यांची पाहणी, तसेंच नानाप्रकारचे नवे शोध इत्यादिकांबद्दल गुप्त माहिती मिळविण्याचें काम लष्करी आणि आरमारी खात्याकडे असून राजेरजवाड्यांच्या भेटी व प्रधान मंडळांचीं खलबतें इत्यादिकांतील रहस्यें जाणण्याचें काम राजकीय शाखेकडे आहे. याशिवाय जें व्यक्तिविषयक म्हणून एक खातें आहे, तें हुजूर कामदारांच्या ताब्यांत असून त्याचा उपयोग खुद्द बादशाहा स्वतःच्या व्यक्तिविषयक कामगिरीकडे करून घेतो. या शाखेंत नोकरी मिळणें ही जर्मन हेरखात्यांतल्या बढतीची परमावधि होय, असें समजलें जातें.

या खात्यांत सर्व प्रकारचे पुरुष आणि बायका यांचा समावेश होतो. यांत राजघराण्यांतील पुरुष, सरदार घराण्यांतील पुरुष, वकील आणि डॉक्टर आहेत. नट आणि नटी आहेत. तसेंच कमअस्सल वर्तुणकीच्या स्त्रियाहि आहेत. यांशिवाय हॉटेलांतील वाढपे, आचारी, हमाल इत्यादिकांचा उपयोग प्रसंगाप्रमाणें केला जातो तो वेगळाच. एखाद्या आगबोटीवर

तुमचा तात्पुरता मित्र बनलेला एखादा मनुष्य किंवा एखाद्या हाटेलांत तुमच्या बरोबर चहा पिणारी एखादी नवयुवती हीं एकाद्या राष्ट्राच्या हेर खात्यांतीलहि माणसें असण्याचा संभव आहे. मोठमोठे गवय्ये, आणि सुप्रसिद्ध नर्तकी व नटी–विशेषतः रशियन किंवा ऑस्ट्रियन असल्या तर–बहुधा या खात्यापैकीं असावयाच्या. यांपैकींच एक सुंदर रशियन नर्तकी पन्नास हजार रुबलच्या ( सुमारें पाऊण लाख रुपये ) वर्षासनावर या खात्यांत नौकरीस ठेवली होती. या बाईसाहेब जर्मनींत प्रवास करीत; तेव्हां त्यांजभोंवतीं सरकारी गुप्त पहारा असे. हा पहारा बाईसाहेबांच्या संरक्षणासाठीं होता कीं, जर्मन सरकारच्या स्वतःच्या संरक्षणासाठीं होता, हें कोणीं सांगावें ? बर्लिन मधील प्याले डि डान्स ( नाचखाना ) येथे जो प्रकार घडला, त्याची आठवण अद्यापीहि बाईसाहेबांस असेल, किंवा तें आठवत नसलें तर एका वर्षप्रतिपदेच्या दिवशीं संध्याकाळीं त्यांची सुदर सोन्याच्या तारेची पिशवी त्यांस कशी परत मिळाली—हरवली नव्हे हो–परत मिळाली, हे तरी त्यांस आठवत असेल. या पिशवीनें बाईसाहेबांना बरेंच घोटाळ्यांत आणलें होतें. कांहीं वेळ ही पिशवी हेरखात्यांतील एका मनुष्याच्या हात चलाखीनें थोडा वेळ अदृश्य होऊन बाईसाहेबांस पुनः ‘ परत मिळाली. ’ ही गोष्ट अशीः—

या पिशवींत काय चिजा भरल्या आहेत, याची माहिती जर्मन हेरखात्याच्या व्यक्तिविषयक शाखेला हवी होती. पॉट्स्डयाम येथील शिबंदीपैकीं एका लष्करी ऑफिसराशीं बाईसाहेबांचें बरेंच प्रेम जडले होतें. लष्कराला दारू गोळा पुरविणाऱ्या खात्यांत हा अम्मलदार काम करीत होता. असल्या प्रकारच्या स्त्रियांशीं कोणत्याहि लष्करी अम्मलदारानें संबंध ठेवल्याचें दिसलें, तर तो अम्मलदार या खात्याच्या ताबडतोब नजरेस येतो. विशेषतः तो अम्मलदार दारूगोळ्याच्या खात्यांपैकीं असला, तर या खात्याची नजर त्याकडे अधिकच करडी जाते. आपल्या चालू कथानकांतील बाईसाहेबांना पॉट्स्डयाम येथील त्या अम्मलदारानें एक सुंदर सोन्याची पिशवी नुकतीच नजर केली होती. या भेटीबरोबरच त्यानें एक पत्रहि दिलें होतें. तें पत्र त्या पिशवींत न ठेवण्याइतका चाणाक्षपणा बाई-

साहेबांच्या डोक्यांत राहिला नाहीं. बाईसाहेब, तुह्मी येथें साफ घसरलां ! अहो, असल्या नाजुक चिजा ठेवावयाला योग्य जागा म्हटली, म्हणजे जाकिटाचा आंतला खिसा किंवा पायमोजे.

या पिशवीच्या पायीं बाईसाहेब बऱ्याच मोठ्या गोत्यांत आल्या. वर्ष-प्रतिपदेचा दिवस. बाईसाहेब नाचखान्यांत मेजवानी झोडीत होत्या. त्याच दिवशीं पलीकडच्या दुसऱ्या एका टेबलाशीं मी बसलों होतों. तेथून सारा प्रकार माझ्या नजरेस पडला. त्या दिवशीं घडलेल्या नाटकाच्या पोटांत खरें रहस्य काय होतें आणि त्याचे सूत्रधार कोण होते, याचा उलगडा मला मागाहून झाला.

ती सोन्याची पिशवी जवळच टेबलावर पडली होती. त्या पिशवीची जागा ध्यानांत आणून एका वाढप्यानें जवळचा दारूचा ग्लास धक्का मारून पालथा केला. दारूचा ओघळ बाईसाहेबांकडे जाऊं लागला, ह्मणून त्या एकदम उठून उभ्या राहिल्या आणि थोड्या पलीकडे झाल्या. त्यांचें लक्ष दुसरीकडे गुतलें आहे, असें पाहून हातांतील फडक्याने दारूचा ओघळ टिपून घेण्याच्या मिषानें त्या वाढप्यानें ती पिशवी चट्कन उचलली आणि तो अदृश्य झाला. आत गेल्याबरोबर त्यानें ती पिशवी उघडली आणि त्या अम्मलदाराचें तें पत्र आपल्या खिशांत कोंबलें. हा सारा प्रकार घडण्यास फार तर दोन मिनिटांचा अवधि लागला असेल. वाढपी बाहेर येऊन ह्मणाला, " बाईसाहेब, घाईघाईत ही आपली पिशवी मीं उचलली याबद्दल मी आपली क्षमा मागतों. " बाईसाहेब थोड्याशा दचकल्या; पण पिशवी हातांत घेऊन ती त्यांनीं उघडली व पत्राचा तपास केला. पत्र आंत नाहीं असें पाहून थोडा वेळ त्या अगदीं गांगरून गेल्या; तथापि बाईसाहेब फार चतुर खऱ्या ! वाढप्याकडे पिशवी एकदम भिरकावून त्या ह्मणाल्या, " छे छे ! ती माझी नाहीं. ती मीं कधीं डोळ्यांनीं पाहिली सुद्धां नाहीं. ती कोणाची आहे, हें तूंच शोधून काढ. "

बाईसाहेब, आपण शक्कल तर खूप लढविली. एवढ्या मौल्यवान् जिनसेवर आपण पाणी सोडलें खरें; पण जर्मन सरहद्दीपलीकडे झालेली आपली उचलबांगडी मात्र आपणांस टाळतां आली नाहीं.

एकाद्या हेरावर सोंपविलेल्या कामगिरीच्या स्वरूपाप्रमाणें त्याला आवश्यक असणारी विद्याहि निरनिराळ्या स्वरूपाची आहे. आचारी, वाढपे, हमाल इत्यादि लोकांबद्दल फारसा विचार करण्याचें आपणास कारण नाहीं. कारण त्यांची योजना कोणत्याहि कामगिरीवर स्वतंत्रपणें होत नाहीं. कोणाच्या तरी हाताखालीं एखाद्या क्षुल्लक कामगिरीवर यांची योजना होत असते. महत्त्वाच्या कामगिऱ्या ज्याच्याकडे सोंपविल्या जातात, अशा हेराला चांगली बुद्धि, योजकता आणि वाक्पाटव यांची जोड अवश्य पाहिजे. अनेक भाषांचें ज्ञानहि त्याला अवश्य पाहिजे. त्याचप्रमाणें समयसूचकता आणि माणसांची पारख हेहि गुण त्याच्या अंगीं अवश्य असले पाहिजेत. स्त्री हेराच्या अंगीं मोहकपणा, योजकता, सौंदर्य आणि हावभाव हीं असलीं पाहिजेत. याच गुणाबरोबर एकाद्या आजीबाईचा लौकिक अनुभवहि तिच्याजवळ असावा लागतो. हेरांना निरनिराळ्या कामगिरीप्रमाणें पगाराचें प्रमाणहि चढतें उतरतें असतें; तथापि एकंदरीनें पगार साधारणच. कामगिरीवर असतां त्यानें चार दोन पैसे अधिकउणें खर्च केले, तर त्याबद्दल त्याला जबाब विचारला जात नाहीं. या खात्यांत पैशाचा खर्च ही मोठीशी बाब नसते. रिव्हीएरा गांवाकडील एका कामगिरींत चवदा दिवसांत सुमारें पंधरा हजार रुपये मीं खर्च केले. माझ्या अखेरच्या दिवसांत मला साडेसात हजार रुपयांचें वर्षासन मिळत होतें. याशिवाय कामगिरीवर नसतां पंधरा रुपये रोजप्रमाणें बैठा खर्च मिळत असे. कामगिरीवर गेलों म्हणजे रोजचा खर्च पंचेचाळीस रुपयांप्रमाणें मिळत असे. याखेरीज बक्षिसी ह्मणून कामगिरीच्या स्वरूपाप्रमाणें आलाहिदा रकमा मिळतात, त्या वेगळ्याच. एका वेळीं एका कामगिरीबद्दल मला स्वतःला तेवीस हजार रुपये मिळाले !

ही नौकरी म्हणजे सुळावरची पोळी आहे, हें पूर्वीं एक वेळ मीं सांगितलेंच आहे. नेमलेल्या कामगिरींत यश आलें, तर उखळ पांढरें होण्यास वेळ नाहीं; पण फसगत झाली, तर डोळे पांढरे होण्यासहि उशीर नाहीं. तुह्मी कोठें पेंचांत सांपडलां, तर सरकारीरीत्या तुह्माला कसलीहि मदत मिळावयाची नाहीं, आणि ज्यांच्या हातांत तुह्मी सांपडतां त्यांज-

कडून तर क्षमेची आशाहि नको. ज्यांना अनेक प्रकारचे उपद्याप करण्याची हौस असेल, तसेंच स्वतःच्या प्रकृतिस्वास्थ्याबद्दल जे फारशी फिकीर करीत नसतील, अथवा ठराविक नीतितत्त्वांची ज्यांना अडचण वाटत नसेल, अशा लोकांना हा धंदा फार चित्ताकर्षक वाटेल, यांत शंका नाहीं. भित्र्या लोकांनीं मात्र केवळ पोटासाठीं या धंद्यांत केव्हांहि पडूं नये अशी मी शिफारस करतों. कित्येक वेळां या धंद्यांत शारीरिक आणि मानसिक कष्ट प्रमाणापलीकडे सोसावे लागतात. या धंद्यांत पडणारे लोक एवढ्या निधड्या छातीचे असतात कीं, त्यांना माणसाचीच काय, पण दैत्याची देखील भीति वाटावयाची नाहीं. या धंद्यांत पडणाऱ्या माणसांच्या आयुष्याची दोरी बहुधा आंखुड होण्याचा संभव अधिक असतो. त्यांच्या मनोरज्जूला जो ताण बसत असतो, त्याची थोडी जरी कल्पना तुम्हांस करतां आली, तर माझें म्हणणे तुम्हांस खचित पटेल. कामगिरीवर असतां अहोरात्र विचारांची चालना चित्तात असावयाची. बहुतकरून मदत कोणाचीहि मिळावयाची नाहीं; आणि ज्यांच्याशीं झगडावयाचें, ते लोक बहुधा मोठे सत्ताधारी असावयाचे. कित्येक वेळां कामगिरी अगदीं हातातोंडाशीं आली असतां, एकादा अचानक प्रसंग येऊन ती पालथी व्हावयाची. जगांतल्या अत्यंत तीव्र आणि सूक्ष्मदर्शी बुद्धीच्या लोकांबरोबर नेहमीं हातघाईचे प्रसंग यावयाचे. या साऱ्या अडचणींशीं झगडून काम करीत असतां एकादी क्षुल्लक चूक झाली, तर हाताला कडीतोड्यांची भेट तावडतोब व्हावयाची. एवढेंच नव्हे, तर प्रसंगीं मानहि जावयाची. अशा परिस्थितींत आयुष्याची दोरी आंखुड झाली तर नवल नाहीं, ही गोष्ट कोणासहि पटेल.

धैर्याचे केवळ खांब अशीं अनेक स्त्री-पुरुषें या धंद्यांत अल्पायु झाल्याचें मला माहीत आहे. हा धंदाच असा आहे, कीं यांत शरीर झिजल्यावांचून राहणेंच शक्य नाहीं. याखेरीज आयुष्य कमी होण्याचे दुसरेहि कांहीं मार्ग आहेत. कित्येक स्त्रिया आणि पुरुष या धंद्यांत अकल्पित रीतीनें नाहींशीं झालीं आहेत. हीं माणसें एकाएकीं अदृश्य झालीं असा लोकांचा

समज करून दिलेला असतो. त्यांच्या या नाहींसें होण्याशीं केवळ परकीयांचाच संबंध असतो असेंहि नाहीं. हीं दोनच उदाहरणें पहाः—

व्होलगा ब्रुडर या नांवाची एक स्त्री या धंद्यांत होती. तिला जर्मनीकडून आणि ब्रुसेल्स येथील इटरन्याशनल संस्थेकडून कामगिऱ्या मिळत असत. ' रशियन सरहद्दीजवळील पूर्वप्रशियांतील मेमेल या गांवीं व्होलगा ब्रुडर या नांवाच्या स्त्रीनें आत्महत्त्या केली ' असा मजकूर युरोपीय वर्तमानपत्रांत कांहीं वर्षांपूर्वीं प्रसिद्ध झाला होता. या बाबतींतील खरी हकीकत अशीः—एका रशियन किल्ल्याच्या बांधणीची माहिती मिळविण्याच्या कामगिरीवर या ब्रुडर बाईची नेमणूक झाली होती. अपेक्षित माहिती तिनें मिळविली; पण एका रशियन लष्करी अंमलदाराच्या मोहजालांत ती सांपडली असून सारे कागदपत्र ती त्याच्या हवालीं करणार आहे, असा सुगावा बर्लिन येथें लागला. तसेंच परकीय राष्ट्रांच्या दुसऱ्या चार हेरांशींहि तिचें बरेंच सूत जमलें होतें. ही गोष्ट अर्थातच जर्मन हेरखात्याच्या नियमाविरुद्ध होती. यानंतर रशियन अमलदारासंबंधाची हकीकत ड्यान्सीग येथील आलेल्या रिपोर्टावरून कळली. पुढें थोड्याच वेळांत व्होलगा ब्रुडरनें 'आत्महत्त्या' केली! तिजवर विषप्रयोग करण्यांत आला.

दुसरी गोष्टः--लेफ्टनट फॉं झ्यास्ट्रोव्ह या नावाचा एक जुना लष्करी अंमलदार जर्मन हेरखात्यांत नौकरीस होता. तो एका द्वंद्वयुद्धांत प्राणास मुकला. कांहीं रशियन हेरांबरोबर तो खलबतें करीत असतो, असा संशय मुख्य अधिकाऱ्यांस आला. प्रत्यक्ष पुरावा मुळींच नव्हता. या मनुष्याला अनेक रहस्यांची बित्त बातमी असल्यामुळें तुरुगांत टाकण्याची सोय नव्हती. तो त्या वेळीं लष्करी नौकरींत नसल्यामुळें उघड रीतीनें कोर्टांत चवकशी झाल्याखेरीज त्याला तुरुंगांत टाकणें जर्मन कायद्याच्या विरुद्ध होतें. तो लष्करांत नौकरीला असता, तर गुप्त लष्करी कोर्टांत त्याची वाट लावणें शक्य झालें असतें; पण तो एका जुन्या खानदानी घराण्यांतला असल्यामुळें, आणि बऱ्याचशा रहस्यांचा संग्रह त्याजपाशीं असल्यामुळें, उचल आणि दे फांशीं असेंहि करणें शक्य नव्हतें. या सर्व कारणांमुळें बिचाऱ्यावर द्वंद्वयुद्ध करण्याचा प्रसंग आला. पहिल्या द्वंद्वांत त्याची

सरशी होऊन त्यानें आपल्या प्रतिपक्ष्याला ठार मारलें. येथेंच थांबण्या-इतके मुख्य अधिकारी कांहीं भोळे नव्हते. बिचाऱ्या झ्यास्ट्रोव्हवर दुसऱ्या द्वंद्वाचा प्रसंग आला आणि अर्ध्या तासाच्या अवधींत झ्यास्ट्रोव्हचें प्रेत जमिनीवर पडलें.

वरील हकीकती वाचून पुष्कळांस मोठें आश्चर्य वाटेल; पण मी निक्षून सांगतों कीं, आमचेच मुख्य अधिकारी आह्मांस पाण्यांत पाहूं लागतात. एकादा हेर फार चाणाक्ष असला, अथवा त्याला बरींच गुह्यें माहीत असलीं, तर त्याला जगांत राहूं देणें अधिकाऱ्यांना अनिष्ट वाटतें, आतां कांहीं महत्त्वाचे कागदपत्र त्याच्या ताब्यांत असले, आणि ते फुटण्याची भीति अधिकाऱ्यास असली, तर मात्र गोष्ट वेगळी. त्याच्या वाटेस जाण्यास अधिकाऱ्यांना छातीच होत नाहीं. माझ्यावरहि असले प्रसंग येण्याचे अलीकडेच बंद झालें.

---

## प्रकरण तिसरें.

## माझा पूर्वेकडील प्रवास.

सिंगापूर येथें जाणाऱ्या वेयर्न नांवाच्या एका जर्मन बोटीवर स्वस्थपणें विडी ओढीत व कांहीं तरी विचार करीत मी एका आराम खुर्चीवर पडलों होतों. ब्यारन हुराकी नांवाच्या एका जपानी गृहस्थाबरोबर बोटीवर माझी बरीच ओळख झाली. बोटीच्या वरच्या उघड्या मजल्या-वर आराम खुर्चीवर पडून विड्या ओढण्याचा आमचा परिपाठ असे. या परिपाठाप्रमाणें ब्यारन हुराकी लवकरच येतील असा माझा अजमास होता; इतक्यांत दुसऱ्या सैबेरियन पलटणीचे दोन अम्मलदार झुकत झुकत माझ्या बाजूला आले. त्यांच्या हावभावांवरून व बोलण्याचालण्या-च्या एकंदर पद्धतींवरून ते सुरादेवीच्या मंदिरांतून नुकतेच बाहेर पडले असावेत, असें उघड दिसत होतें. तथापि माझ्या सुखासमाधानांत

त्यांच्याकडून व्यत्यय येत नव्हता तोंपर्यंत त्यांच्याकडे लक्ष देण्याचें मला कारण नव्हतें; पण असा व्यत्यय येण्यास लवकरच सुरुवात झाली. मी बोटीच्या ज्या भागांत बसलों होतों, तो भाग स्वस्थपणें पडून विश्रांति घेण्यासाठीं व वाचनासारख्या थंड करमणुकीसाठीं राखून ठेवलेला होता, ही गोष्ट या अम्मलदारांनाहि ठाऊक नसेल, असें नाहीं. तथापि ते मोठमोठ्यानें ओरडून बोलत होते. थोड्या वेळानें ते मजजवळ येऊन पोहोंचले. त्यांपैकीं एकजण ब्यारनसाहेबांच्या खुर्चीवर लवडला, व त्यानें मोठमोठ्याने ओरडून पलीकडे गेलेल्या आपल्या सोबत्यास हांका मारण्यास सुरुवात केली. या त्याच्या वर्तुणकीचा मला अतिशय त्रास होऊं लागला. इतक्यांत ब्यारनसाहेब स्वतः आले आणि मोठ्या सभ्यपणानें आपल्या खुर्चीवरून उठण्याची विनंति त्यांनीं त्या अम्मलदाराला केली. सुरादेवीच्या अंमलांत पूर्णपणे गेलेला तो अम्मलदार ब्यारन हुराकी यांजकडे डोळे फाडून पाहूं लागला आणि पडल्या पडल्या मोठ्याने ओरडून म्हणाला, " अहो मेहेरबान, सगळ्या जगाची मालकी कांहीं अद्यापि आपणास मिळालेली नाहीं. आपण येथून चालते व्हा पाहू. " त्याचे हें भाषण ऐकून माझें चित्त अगदीं भडकून गेलें. लष्करी जर्मन भाषेंत मीं त्याला खुर्ची सोडून जाण्यास सांगितलें. रशियन अम्मलदारांपैकीं शेकडा ऐशीं लोकांना लष्करी जर्मन भाषेचें ज्ञान आहे. रशियन अम्मलदार नुसत्या तोंडाच्या भाषेनें कधींहि शुद्धीवर यावयाचे नाहींत; पण आपल्या वर्तुणुकीनें हातघाईचा प्रसंग येईल, अशी त्यांची खात्री झाली, म्हणजे त्याचा शिरजोरपणा उतरण्यास वेळ लागत नाहीं. असा प्रसंग येईल, अशी त्या अम्मलदाराची खात्री मीं करून देतांच, तो निमुटपणें उठून दुसरीकडे चालता झाला.

तो उठून गेल्यावर ब्यारन हुराकी त्या खुर्चीवर आडवे झाले. त्या वेळीं त्यांच्या चेहऱ्यावर मंदस्मिताची एक लकेर उमटली होती; तथापि त्यांच्या डोळ्यांत जें चमत्कारिक पाणी त्या वेळीं खेळत होतें, तें पाहून माझें चित्त थोडेसें अस्वस्थ झाल्यावांचून मात्र राहिलें नाहीं. ब्यारनसाहेब ज्युजुत्सुच्या ( जपानी पेंच ) कलेंत मोठे प्रवीण होते. बोटीवरल्या एका

दांडग्या खलाशाला त्यांनीं अगदीं लीलेनें लांबवर झुगारून दिल्याचें मला आठवत होतें. या खलाशाला एका चांगल्या पुष्ट बैलाइतकें बळ होतें. ब्यारनसाहेबांच्या आंगीं अशी शक्ति असतांहि त्या अम्मलदारांशीं त्यांनीं जी अगदीं सौम्यपणाची वागणूक केली, ती पाहून मीं त्यांना म्हटलें, " ब्यारनसाहेब, त्या जंगली मनुष्याला अर्ध्या बोटीपर्यंत पलीकडे तुम्ही कसें झुगारून दिलें नाहीं, याचें मला मोठें नवल वाटतें.

त्यांनीं दिलेला जबाब मी कधींहि विसरणार नाहीं.

" मुळाशीं कांहीं मुद्दा असल्याशिवाय आम्ही सामुराय ( जपानी क्षत्रिय ) कधींहि हातघाईवर येत नाहीं. अद्यापि वेळ आली नाहीं. "

या वेळीं सुद्धां त्यांच्या डोळयांत तें पाणी दिसलें, त्यामुळें मला कसें-सेंच झालें.

जर्मन हेरखात्यांत माझा प्रवेश झाल्यानंतर ही पहिलीच महत्त्वाची कामगिरी मला मिळाली होती. या कामागिरीनिमित्त मी बर्लीन येथून सिंगापुरला जात होतों. स्ट्रेट्ससेटलमेंटामध्ये नवी तटबंदी आणि नव्या गोद्या बांधण्याचें काम सुरू झालें होतें. या कामासबंधीं सर्व प्रकारची माहिती, त्या जागेचे फोटोग्राफ आणि बांध कामाची आंखणी याबद्दल-ची सर्व प्रकारची माहिती मिळविण्याचा हुकूम आमच्या बातमी खात्या-कडून मला देण्यांत आला होता.

बंदर सोडतांना बेयर्न बोटीवर थोडीबहुत गर्दी होतीच. पूर्वेच्या बाजूकडील युद्धाचे ढग क्षितीजावर डोकाऊं लागले होते. बोटीवरील उतारू बरेच जपानी लोक दिसत होते. त्यांच्या सरकारनें पुढील कार्या-साठीं त्यांना स्वदेशीं परत बोलाविलें होतें असें मला मागाहून कळलें. पोर्ट सैय्यद बंदरावर बरेच रशियन लोकहि बोटींत चढले. यांत कांहीं लष्करी अम्मलदार असून ते पोर्ट आर्थर, डालनी व व्लाडिओस्टाक या बंदरीं जावयाचे होते. ज्या दोन मानवकुलांचें तुंबळ युद्ध लवकरच सुरू होणार होतें, त्या दोन कुलांचे नमुने मला येथें पाहावयास मिळाले. या दोन नमुन्यांचा अभ्यास करणें मला फार मौजेचें वाटलें.

यानंतर राशियन लोकांसंबंधीं मला जें कांहीं ज्ञान झालें, त्यामुळें माझ्या अनेक वर्षांच्या अनुभवांत आणखी भर पडली. या वेळेपासून ब्यारनहुराकी हे मजपाशीं थोड्या निराळ्या तऱ्हेनें वागूं लागल्याचें माझ्या अनुभवास येऊं लागलें. जपानी लोकांच्या चालीरीति, त्यांचीं ध्येयें आणि त्यांच्या आकांक्षा इत्यादि अनेक प्रकारच्या गोष्टींबद्दल ते आपण होऊन माझ्याशीं बोलूं लागले. त्यांनीं दिलेला कीमोनो ( जपानी झगा ) अंगांत घालून अनेक प्रकारच्या विषयांवर मनमुराद संभाषण करीत आम्हीं रात्रीच्या रात्री त्या आगबोटीवर घालविल्या. ते दिवस उष्म्याचे असल्यामुळें रात्रींहि उकाडा फार होत असे, आणि अशा-प्रकारच्या गप्पा सांगण्यास मला कोणी भेटला नसता, तर बोटीवरचा प्रवास मला फार त्रासदायक व कंटाळवाणा झाला असता. ब्यारन हुराकीच्या बरोबर संभाषण करतांना जपानी लोकांची दानत आणि त्यांचे भावी उद्देश यांचें जें कांहीं ज्ञान मला त्या वेळीं प्राप्त झालें, त्याचा मला पुढें फार उपयोग झाला. ब्यारनसाहेब आपल्या देशांत सांप्रत मोठ्या हुद्यावर आहेत. मजविषयींचा त्यांचा स्नेहभाव अद्यापीहि कायम आहे, अशी मला आशा आहे. चेरी फुलांचा एक गुच्छ प्रतिवर्षीं त्यांज-कडून मला येत असतो. परस्पर स्नेहभाव वृद्धिंगत होत आहे, असा आशय दाखविण्याची जपानी लोकांची ही एक पद्धत आहे.

कोणाशींहि अधिक स्नेह करणें, हें हेराच्या धंद्यांत पडलेल्या मनुष्याला बरें वाटत नाहीं; तथापि बरोबरच्या प्रवाशांशीं संभाषण करून अनेक प्रकारची माहिती करून घेण्यास मात्र तो चुकत नाहीं. माझ्या नेहमींच्या चालीस अनुसरून अनेक जपानी प्रवाशांशीं मीं ओळखी करून घेतल्या आहेत. त्यांतल्यात्यांत ब्यारन हुराकी यांचें माझें बरेंच मेतकुट जमलें. ब्यारन हुराकी चांगले विद्वान् आहेत अशी माझी खात्री झाली.

त्यांचें भाषण अलंकारिक नसे; तथापि अनेक शास्त्रीय किंवा तात्त्विक वादविवादांत स्वतःची बाजू शांतपणें सांवरून धरण्याची हातोटी त्यांना साधली होती. त्यांचें ज्ञान खोल होतें; पण याची साक्ष पटविण्याची त्यांना अशी कांहीं खुबी साधली होती, कीं त्यांत अहंकाराची किंवा लब्धप्रतिष्ठित-

पणाची यत्किंचितहि छटा उमटत नसे. जितके जपानी गृहस्थ मला भेटले, त्या सार्‍यांत हा गुण थोड्याबहुत प्रमाणानें असल्याचें माझ्या अनुभवास आलें. अशा प्रकारें अनेक विषयांवर गप्पा छाटीत असतां राजकीय विषय मध्येच घुसडण्याचा यत्न मीं एकदोन वेळां केला; पण उत्तरादाखल ब्यारनसाहेब नुसतें हसरें तोंड मात्र करीत. या हंसण्याचा काय अर्थ करावा, हें मोठें गुढ होतें आणि तें मला केव्हांहि उकलतां आलें नाहीं. अशामुळें त्या त्या प्रसंगीं मी अधिक बुचकळ्यांत मात्र पडत असें. पौर्वात्यांच्या मनाच्या खोलींत बुडी मारण्याचा अद्याप मला अभ्यास नव्हता. बेयर्न जहाजावर मला जो कांहीं अनुभव आला, त्यावरून माझी अशी खात्री झाली कीं, पौर्वात्यांच्या मनाचा ठाव काढण्यास पाश्चात्त्यांच्या पद्धती आणि युक्ती यांचा यत्किंचितहि उपयोग होत नाहीं. एकाद्या बाबतींत पौर्वात्यांनीं जर मुखस्तभपणा स्वीकारला, तर त्यांच्या तोंडचें कुलूप काढणें पाश्चात्त्यांस शक्य नाहीं. आतां एकाद्या पाश्चात्याविषयीं प्रेमभाव उत्पन्न झाला, तर मात्र त्याजपाशीं ते आपलें मन उघडे करतील. जपानी लोक ठेंगणे आणि शरीराने लहान बांध्याचे आहेत. कोणाहि दोन जपानी माणसांचें वजन एका रशियनाबरोबर होईल. स्वभावतः जपानी लोक शांत, मुखस्तभ आणि गोड स्वभावाचे आहेत. रशियन लोक शरीरानें धिप्पाड, मजबूत बांध्याचे, प्रत्येक गोष्टींत आपलें नाक खुपसणारे आणि दारुबाज असल्याचें मला आढळून आलें. त्यांचें तोंड घंटेप्रमाणे सदोदित वाजत असावयाचें. भाषणाची पद्धति उद्धट आणि अरेरावीची. जपानी लोकांबद्दल तर त्यांच्या मनांत विलक्षण तिरस्कार दिसत होता. भावी युद्धासंबंधीं ते अगदीं तुच्छता दर्शवीत असत आणि जपानी लोकांविषयीं बोलतांना छोटेखानी माकडाच्या जातीचीं मनुष्यें असा उल्लेख करीत. आमच्या जहाजावर जपानी आणि रशियन असे दोन्ही नमुने होते, ही गोष्ट मला फार फायद्याची झाली. पौर्वात्यांबद्दल ब्यारन हुराकी यांजपासून ज्या ज्ञानाचा लाभ मला झाला होता, त्याचा उपयोग मला सिंगापूर येथें झाला. आणि रशियनांपासून

जें ज्ञान मीं मिळविलें होतें, तें पोर्ट आर्थर येथें माझ्या फार उपयोगीं पडलें. पण हा पुढचा कथाभाग आधींच कशाला सांगा ?

सिंगापूर येथे आल्यानंतर हॉटेल डी ला पाय येथें मीं आपलें बिऱ्हाड ठेवलें. मी एक सामान्य प्रतीचा प्रवासी आहें, असा समज करून देण्याजोगीं मीं आपली वर्तणूक ठेवली होती. तसेंच उष्ण कटिबंधांतील वनस्पतीच्या अभ्यासाकरतां मी सिंगापूर येथें आलों असून शिकारीचा नादहि मला थोडाबहुत आहे, असें मीं भासविलें. हळुहळू तेथील इंग्रजी लष्करी अम्मलदाराबरोबर माझ्या ओळखी झाल्या, व त्यांजबरोबर त्यांच्या क्लबांतहि मी जाऊं येऊं लागलों. सिंगापूर येथें जी नवी आरमारी गोदी बांधण्याचें काम चाललें होतें, तिजबद्दल थोडीशी माहिती मला या द्वारानें मिळाली; पण ती फारच अपुरी आणि केवळ कागदी माहिती होती. असल्या तुटपुंजी माहितीचा मला फारसा उपयोग नव्हता. प्रत्यक्ष काम काय चाललें आहे, याची माहिती मला हवी होती, आणि ती मिळविण्यासाठीं तेथील नेटिव्ह कारकुनांची ओळख करून घेणें अवश्य दिसलें. पूर्व दिशेकडे सर्व इंग्रजी राज्यांत खालच्या प्रतीच्या कारकुनींच्या नेटिवांशीं आपला परिचय वाढविला पाहिजे, असा बेत मीं केला खरा, पण तसें करणें सोपें नसून प्रसगीं तें भयावहहि आहे, अशी माझी लवकरच खात्री झाली. माझ्या कामांत मला यश मिळविणे असेल, तर एखाद्या उच्च दर्जाच्या नेटिवाची ओळख करून घेतली पाहिजे, व त्याचें वजन कारकुनावर पडेल अशा स्थितींतला तो असला पाहिजे, अशी माझी खात्री झाली. अनेक छोट्या छोट्या संस्थानिकांपैकीं एखादा जर माझ्या जाळ्यांत सांपडेल, तर माझें काम हटकून साध्य होईल, असें मला वाटलें.

एका क्लबांत माझी ही आशा सफळ होईल, असा रंग दिसत होता. एक तरुण संस्थानिक—अर्थात् त्याचें नांव सांगणें इष्ट नाहीं—कांहीं पेंचांत आला होता. आणि ब्रिटिश सरकारनें त्याचें उत्पन्न कांहीं काळ बंद केलें. माझें घोडें पुढें ढकलण्यास ही एक चांगली संधि मिळाली. हे तरुण संस्थानिक महाराज कोणत्या ठिकाणीं जात येत असतात याचा

शोध करून त्या त्या ठिकाणीं जाण्याचा मीं परिपाठ सुरू ठेवला. एके दिवशीं मरीन हॉटेलच्या सज्जांत राजेसाहेब उभे असतां मीं त्यांच्या जवळ जाऊन काड्यांची पेटी मागितली, आणि एक कागदी विडी त्यांच्या पुढें केली. माझी ही वागणूक तेथल्या युरोपियन लोकांच्या सामान्य सामाजिक पद्धतीच्या अगदीं विरुद्ध होती. पौर्वात्याशीं बरोबरीच्या नात्यानें वागणें हें स्वतःस कमीपणा आणणारें आहे, असा समज पूर्वेकडील युरोपियन लोकांत आहे. असल्या प्रकारची युरोपियनांची वागणूक नेटिवांस आवडत नाहीं व तिजबद्दल मनांतून त्यांस फार राग येतो. युरोपियन पद्धतीचें शिक्षण ज्यांस मिळालें आहे व युरोपियन चालीरीतीचा ज्यांनीं अंशतः अंगिकार केला आहे,. अशा नेटीव लोकांस तर असल्या वागणुकीचा अत्यंत राग येतो. युरोपियनांनीं आपणांस कमी दर्जाचें लेखावें या गोष्टीची त्यांना फार चीड आहे. हीच गोष्ट आमच्या तरुण व तरतरीत राजेसाहेबांसहि लागू होती. त्यांच्या व्हिस्कीच्या आमंत्रणाचा मीं स्वीकार केला, आणि पुढे हळुहळू त्यांच्या बंगल्यावर जेवावयासहि जाऊं लागलों. भेटीनें भेट वाढतच गेली आणि परस्परांचा परिचयहि दृढ होत गेला. पौर्वात्यांच्या चालीप्रमाणे राजेसाहेब चैनीला लालचावलेले होते, आणि तशांत उत्पन्न बंद झालेलें. यामुळें ते वारंवार पैशाच्या अडचणींत येत. अशा स्थितींत या दृष्टीनेहि मी त्यांच्या थोडासा उपयोगीं पडलों. हळुहळू सरकारबद्दलहि असतोषाचें बीजारोपण त्यांच्या मनांत मीं करून दिलें. अशा रीतीनें सावधगिरीनें माझ्या कामाला योग्य अशी त्यांची मनोभूमिका मीं तयार केली. कारकून मंडळीवर राजेसाहेबांचें चांगले वजन होतें. त्यांच्या मार्फत स्ट्रेटस्‌सेटलमेंट (सिंगापूर) मध्यें इग्लंडची जी नवी आरमारी गोदी तयार होत होती, तिजबद्दलचे सर्व रेखा नकाशे, अंदाज व फोटोग्राफ मला मिळाले.

या सुमारास राजेसाहेबांच्या व माझ्या मधील मैत्रीबद्दल हळुहळू कुजबुज होण्यास आरंभ झाला, आणि आपलें जाळें आंवरण्याचा मीं बेत केला. जर्मनीला जाणाऱ्या साशेन नांवाच्या आगबोटीचें तिकीट मीं घेतलें. बोट निघण्यास एका आठवड्याचा अवधि होता. याच सुमारास प्रिन्स

रीजंट लिओपोल या नांवाची बोट कोलंबो बंदरांत येणार होती. आस्ट्रे-लियांतून निघून युरोपाकडे जात असतां वाटेंतलें कोलंबो बंदर ती करणार होती. साशेन बोटीचें कोलंबोपुढचें तिकीट बदलून तें मीं या बोटीचें केलें. असें करण्यांत सिलोन बेटांत आठ दहा दिवस मुक्काम करण्याची मला संधी मिळणार होती. पूर्वीं एक वेळ या भागांत मीं प्रवास केला होता, त्या वेळचे कांहीं माझ्या ओळखीचे गृहस्थ येथें होते. कोलंबो येथें ग्यालिफेस हॉटेलांत मी उतरलों. येथे अलॅन म्याग्रेगॉर या नांवाचे एक गृहस्थ भेटले. हे गृहस्थ क्यांडी आणि नेवाराइलाया येथील लिप्टनच्या इस्टेटीचे म्यानेजर आहेत. माझ्या पूर्वींच्या प्रवासांत यांजबरोबर माझी ओळख झाली होती. अनेक वेळां आम्हीं जोडीने शिकार केली होती व ब्रिज या नांवांचा पत्त्यांचा खेळहि खेळलों होतो. त्यांच्या सगतींत सात आठ दिवस रहावें व कांहीं दिवस चित्त्यांच्या मागे लागून अरण्यवास करावा असा मीं बेत केला. म्याग्रेगारसाहेबाचे त्या वेळचे जान दोस्त हे एक राष्ट्रीय हेर आहेत ही गोष्ट साहेब मजकुरांना कळल्यानंतर त्यांचा चेहरा कसा झाला असेल, हें जाणण्याची मला फार हौस आहे !

जाऊं द्या हो म्याग्रेगारसाहेब ! माझ्या संबंधीं आश्चर्यानें थक्क होऊन जाणारे दुसरे अनेक जोडीदार तुह्मांला मिळतील. मग तुह्मांला एकटें एकटें वाटण्याचें काय कारण आहे ?

म्याग्रेगारबरोबर शिकारीला जाण्याच्या मी अगदीं तयारींत असतां हॉटेलचा म्यानेजर बिलपिटर्स ह्यानें एक तारेचा लखोटा आणून माझ्या हातीं दिला. या तारेंतील मजकुरानें माझे सारे बेत जागच्याजागींच राहिले ही तार क्यापटन फॉ स्थापकेन यांजकडून आलेली असून ती सांकेतिक भाषेंत होती. स्थापकेन यांच्या हुकुमाप्रमाणें मी पुनः बोटीवर चढलों; पण ती बोट जर्मनीकडे जाणारी नसून पोर्टआर्थरकडे जाणारी होती. पोर्ट-आर्थर येथील किल्ल्यांचें चालू असलेलें काम कितपत पुरें झालें आहे, व तेथील एकंदर परिस्थिति कशी काय आहे, हें पाहण्याचा हुकूम मला झाला होता. हा हुकूम पाहून मला खरोखर फार आश्चर्य वाटलें. रशिया आणि जपान यांजमधील युद्धांत जर्मनीचे कसले हितसंबंध गुंतले असा-

वेत, हें माझ्या लक्षांत येईना. तसेंच पोर्टआर्थरसारख्या जागीं जाण्याचें कामहि माझ्या पसंतीजोगें नव्हतें. रशियन लोक फार संशयी असावेत असा माझा समज होता. यामुळें पोर्टआर्थरला जाणें मला मोठ्या धोक्याचें वाटलें; पण रशियन लोकांसंबधीं जो माझा पहिला अजमास होता, तो प्रत्यक्ष अनुभवानें खोटा ठरला.

वनस्पतिशास्त्राचा व सृष्टीच्या इतिहासाचा शोधक या पांघरुणाखालीं या भागांत प्रवास करण्याचें मीं आरंभिलें. मी वैद्यकाचा अभ्यास केला असल्यामुळे हें नवें पांघरूण मला अगदींच विशोभित नव्हतें. डॉ. फ्रान्झ फॉ क्यानिट्झ असें नांव वाचकांना यापुढें कोठें आढळलें, तर ते डॉक्टरसाहेब म्हणजे अस्मादिकच हें वाचकांनीं लक्षांत ठेवावें. रशिया आणि जपान यांजमधील युद्ध टळत नाहीं, याबद्दल बहुतेक सर्वांची खात्री होऊन चुकली होती. विशेषतः जर्मन सरकारची तर पक्कीच खात्री होती. फक्त रशियाला मात्र या भावी युद्धाची खबर नव्हती ! हें युद्ध कसें उपस्थित झाले याजबद्दलचा थोडासा पूर्वेतिहास सांगतों.

इ. स. १८९५ सालीं चीन व जपान यांमध्यें जें युद्ध झालें, त्यांत चीनचा जपाननें पराभव करून त्याजकडून पोर्टआर्थरचे बंदर मिळविले. त्यानतर फ्रान्स आणि जर्मनी यांच्या पाठिंब्यानें रशियानें दिलेल्या दपटशा मुळें तें बंदर सोडणे जपानला भाग पडलें. या दपटशाच्या गडबडीतून इंग्लंड मात्र वेगळे राहिलें हे लक्षांत ठेवण्यासारखे आहे. पोर्टआर्थरचें बंदर जपाननें आपल्या ताब्यांत ठेवल्यास जगाच्या पूर्वेकडील भागांत अखंड शांतता नांदणार नाही, असें रशियानें आपल्या [illegible] खलित्यांत म्हटलें होते. हा अपमान जपानच्या हृदयात शल्यासारखा झोंबला. असल्या प्रकारचे अपमान आशियांतील लोक विसरत नाहींत, आणि प्रसगीं त्याचा योग्य वचपा काढल्यावांचूनहि ते रहावयाचे नाहींत. अशा योग्य संधीची वाट जपान पहात होता. बॉक्झर बंडाच्या वेळचें रशियाचें दुटप्पी वर्तन आणि त्या वेळीं पोर्टआर्थरमध्यें त्यांनीं केलेला प्रवेश या गोष्टींवरून त्या वेळीं जें बीज पेरलें गेलें, त्याचें फळ म्हणजे हें रूसोजपानी युद्ध.

पोर्टआर्थर येथें येऊन हॉटेल-ल-युरोप या नांवाच्या खानावळींत मीं

तळ दिला, आणि माझ्या वनस्पतिशास्त्राच्या अभ्यासाला उपयोगी पडेल, अशी सामग्री बरोबर घेऊन मी पोर्टआर्थरच्या टेंकड्याभोंवतीं हिंडू लागलों. जागजागीं चाललेल्या कामावर असंख्य चिनी आणि चंगवूसी लोक पाहून मला मोठें नवल वाटलें. ह्यांत सर्वच चिनी होते असें नसून जपानी मजुराचीहि त्यांत बरीच भेसळ होती. जवळ जवळ शेंकडा दहा इतके जपानी मजूरहि मला त्यांत आढळले. पूर्वेकडील निरनिराळ्या जातींच्या लोकांच्या चेहरेपट्टया पाहण्याचा अभ्यास ज्यांनी केला असेल, त्याला या असंख्य मजुरांतून जपानी चेहरे हुडकून काढणें फारसें कठिण नव्हतें. खुद्द रशियनलोकांच्या धडधडीत डोळ्यासमोर अशा रीतीनें शेकडों जपानी लोक पोर्टआर्थरच्या तटबंदीभोंवतीं वावरत होते. खुद्द गडाच्या तटबंदीवर जपानी कारागीर काम करीत होते, अशी माहिती बेयर्न जहाजावर ब्यारन हुराकी यांनीं मला दिली होती. ही बातमी अक्षरशः खरी असल्याचा प्रत्यक्ष प्रत्यय मला या वेळीं आला. हेच जपानी लोक जपानी तोफखान्याच्या फार उपयोगीं पडले. किल्ल्यांतील मर्मस्थानें जपानी तोफखान्याच्या हातीं अचानक पडलीं. या कारागिरांखेरीज दुसरेहि कित्येक जपानी लोक रशियन लष्करी अम्मलदारांकडे नौकरीस राहिले होते. लायोटीशान रेलवेवर आणि पीजन बंदरावर हमालाच्या रूपानें शेकडों जपानी लोक वावरत होते. थोडक्यांत इतकेंच सांगावयाचें कीं, रशियन सरकारचें हें मर्मस्थान जपानी भुंग्यांनीं अगोदरच पोंखरून ठेविलें होते.

जपानी सैन्यास पोर्टआर्थरचा किल्ला इतक्या लवकर सर करतां आला याचीं अनेक कारणें आहेत. मुख्यतः तेथील रशियन अम्मलदार अत्यंत निष्काळजी होते. परिस्थितीचें ज्ञान त्यांना बिलकूल नव्हतें. बुटबैंगण जपानी लोक आपणावर हल्ला करण्यास धजावतील, अशी शंका सुद्धां त्यांस येत नव्हती. पोर्टआर्थरची तटबंदी पूर्णावस्थेस पोहोंचली नव्हती. ही गोष्ट खरी; तथापि ती होती त्या स्थितींत सुद्धां शत्रूच्या हल्ल्यास लवकर दाद देणारी नव्हती. तटबंदीची आंखणी सर्व बाजूनीं फार प्रचंड प्रमाणावर केली होती; तथापि कांहींना कांहीं भाग अपूर्ण स्थितींत असलेले मला सर्वत्र आढळून आले. वनस्पतीचे नमुने हुडकण्याच्या मिषानें मी डालनी

बंदराच्या दक्षिण व पश्चिम भागांत फिरत असतां क्यांगटॉंग द्विपकल्प च्या जवळील डोंगरी किल्ले अत्यंत अपूर्ण स्थितींत असलेले मला आढळले तसेंच पोर्टआर्थर आणि डालनी यांमधील रेलवेचा फाटाहि शत्रूचा हल्ल निवारण करण्याजोगा सुरक्षित नव्हता.

चाललेल्या कामावर अम्मलदारांची चांगलीशी नजर नव्हती. स प्रकारचें काम गोगलगायीच्या चालीने चाललें होतें. कोणाला कोठें जाण्यास आडकाठी नसल्यामुळें मी हव्या त्या भागांत प्रवेश करीत असे तथापि मला कोणी एका शब्दानेंहि हटकलें नाहीं. लष्करी अम्मलदा आणि सोजीर या लोकांत मी खुशाल मिसळत असें. सोजिरासाठीं व्होडक दारूवर थोडेसे पैसे खर्च केल्यामुळें, मी सर्वांचा प्रिय होऊन बसल होतों. त्याचप्रमाणें अम्मलदाराचाहि मी आवडता होतों. पोर्टआर्थ येथील सामानाचा पुरवठा अगदीं खराब होता, ही गोष्ट मला त्यांजकडू कळली. अनेक मासल्यांपैकीं एकच मासला सांगतों. चौदा लक्ष वी हजार पौंड कणकीपैकीं निम्मी कणिक आंबून गेली होती. यामुळें पोर्ट आर्थरच्या शिबंदीत अनेक रोगांनीं आपलें ठाणें दिलें होतें. युद्ध सुर झाल्यानंतर केवळ घाणेरड्या अन्नाला बळी पडल्यामुळें पंचेचाळीस टक्के लोक निकामी झाले होते. पांच लक्ष पौंड मेज धान्य किडून गेलें होतें आणि सात लक्ष पौंड गोमांस सडलें होतें. दोन गोष्टींचा मात्र पुरवठ पोर्टआर्थरमध्यें भरपूर होता. त्या दोन गोष्टी ह्मणजे दारू आणि बायका

जगांतलीं अनेक दारूबाज ठिकाणें मीं पाहिलीं आहेत, तरी या ठि काणीं जो दारूचा संग्रह मी पाहिला, तितका मोठा दारूचा आणि तसें च बदफैली बायकांचा संग्रह साऱ्या जगांत मला कोठें आढळून आल नाहीं ! बहुतेक प्रत्येक लष्करी अम्मलदाराचा एकक खाजगी झनाना होता कित्येक सैबेरीयन अम्मलदार आपल्या नव्या पिस्तुलांचा गोळीबार शिकत असतां त्यासाठीं दारूनें भरलेल्या बाटल्यांचा उपयोग त्यांनीं केलेला मी पाहिला आहे. अशा वेळीं ती जागा गुडघा गुडघा दारूनें अक्षरशः भरली जात असे. तसेंच येथें जुगारखानेंहि जागोजाग पसरलेले होते. दारूबाजीनें आपला अम्मल येथें इतका करडा बसविला होता कीं, अड-

मिरल टोगोचा पहिला आरमारी हल्ला बंदरावर झाला त्या दिवशीं रशियन आरमारापैकीं निम्याहून अधिक लोक दारू पिऊन मुरद्यासारखे गांवांत पडले होते. त्या दिवशीं एका रशियन साधूची पुण्यातिथि होती, ती त्यांनीं अशा रीतीनें पाळली !

पाणसुरुंग, सर्चलाईट, इत्यादि बंदराच्या संरक्षणाच्या ज्या तजविजी असतात, त्या साऱ्या अगदीं वाईट स्थितींत असल्याचें मला आढळून आलें. बंदरांतील पाणसुरुंगांना बत्ती देण्याचीं किनाऱ्यावरील विद्युत्गृहें मीं तपासलीं. तेथेंहि हाच निष्काळजीपणाचा प्रकार सर्वत्र दिसून आला. पाणसुरुंग कोठें आहेत, हें दर्शविणारे बोयरे पाण्याच्या पृष्ठभागावर तरंगत असल्यामुळें गुप्त सुरुंग कोठें आहेत, हें ते साऱ्या जगाला ओरडून सांगत होते. पाणसुरुग पेरण्याचें काम इतक्या कुशलतेनें ( ? ) केलें होतें कीं, प्रत्येक पांच पाणसुरुंगांपैकीं तीन सुरुंग जपानी आरमारांनीं बाहेर काढून फोडले. अडमिरल टोगोनें बंदरावर एकंदर पांच हल्ले चढविले आणि यांतलि कित्येक ३६ तासांइतके लांब मुदतीचे असतांहि एका हात्सुसे जहाजाखेरीज दुसरें कोणतेंहि जहाज पाणसुरुंगानें किंवा आगमाशानें दगावलें नाहीं. या एकाच गोष्टीनें पाणसुरुग पेरण्याची शिताफी दिसून आली !

पोर्टआर्थरच्या गडाभोंवतीं फिरून तेथील एकंदर वस्तुस्थितीची मीं पहाणी केली, तों किल्ल्याच्या आजूबाजूची जमीन भुसभुशीत राखट मातीची आहे, असें मला आढळून आलें. २०३ मिटरची टेंकडी जपानी सैन्यानें फारसे श्रम न करितां सर केली, याचें मला फारसें नवल वाटलें नाहीं. लष्करी दृष्टीनें पाहतां रशियन सैन्यानें तेथें चांगल्या प्रकारची मजबुती केली होती; पण भोंवतालची जमीन शत्रूला अनुकूल अशी असल्यामुळें रशियनांच्या तयारीचा व्हावा तसा उपयोग झाला नाहीं. जमीन भुसभुशीत असल्यामुळें मोठ्या तोफांचे कुलपी गोळे न फुटतांच जमिनींत घुसून बसत. यामुळें तटबंदीशीं समांतर चर खणून किल्ल्याच्या दिशेनें सपासप पुढें पाऊल टाकणें जपानी सैन्यास सुकर झालें. तेथील जमीनीचा हा विशिष्टपणा जपानी लोकांच्याहि लक्षांत आला होता आणि

त्यांना त्याचा उपयोगहि चांगला करून घेतला. १७४ आणि १३१ मिटर टेकड्यांवरील तटबंदी अपूर्ण स्थितींत असल्याचें मला आढळून आलें. किल्ल्याची तटबंदी पुरी करण्यासाठीं तेथील गडकरी जनरल स्मर्नाफ हे जीवापाड धडपडत होते; पण मुख्य सेनापति जनरल कॉनड्रा-चिंको यांच्याशीं त्यांच्या नित्य कटकटी चालत असल्यामुळें त्यांच्या साऱ्या खटपटी फुकट गेल्या. पोर्टआर्थरच्या तटबंदीसाठीं जो अलोट पैसा रशियन सरकारनें वेगळा काढून ठेवला होता, त्याचा प्रामाणिकपणें उपयोग झाला असता, तर तो किल्ला खरोखर अभेद्य बनला असता; पण या पैशापैकीं साठ टक्के कोणत्या खाड्यांत गडप झाले, याचा मागमूस कोणासहि लागला नाहीं. माझें हें म्हणणें तुम्हांला अतिशयोक्तीचें वाटण्यासारखें आहे; पण त्या वेळची पोर्टआर्थरची स्थिति कोणींहि नजरेनें पाहिली असती, तर त्यानेंहि हेंच मत खास दिलें असतें.

एकंदरीनें तेथले रशियन अम्मलदार गचाळ होते, असें मीं म्हटलें खरें; तथापि सारेच अम्मलदार व्यसनी व दुराचारी होते असें नाहीं. यांत कित्येक माणसें दानतीनें चोख आणि कर्तव्यदक्ष अशींहि होतीं. पोर्टआर्थरची भयंकर स्थिति त्यांच्या लक्षांत आली होती; पण ही गोष्ट त्यांच्या इतकी आंगवळणीं पडून गेली होती, कीं, त्या गोष्टीनें त्यांनीं आपली झोंपमोड होऊं दिली नाहीं. शोधकबत्ती ( सर्च लाईट ) चीं ठाणीं सुद्धां अगदीं दैन्यवाण्या स्थितींत असल्याचें मला आढळून आलें. जपानी आरमाराचा दुसरा हल्ला बंदरावर आला, त्या रात्रीं शोधकबत्त्या नादुरुस्त झाल्यामुळें बंदरांत अमावास्येचा काळोख पसरला होता. हा काळोख अर्थातच शत्रूला उपकारक झाला. यानंतर भयंकर खर्च करून आणि विलक्षण अडचणी सोसून या बत्त्या दुरुस्त करण्यांत आल्या होत्या; पण घराला आग लागल्यावर विहीर खणून काय उपयोग ? शोधक बत्त्यांचीं ठाणीं आणि त्यांच्यासाठीं वीज उत्पन्न करण्याचा कारखाना यांच्या बरोबर जागा मजुरदार हेरांच्या मार्फत जपानी तोफखान्यांच्या हातीं आगाऊ पडल्यामुळें त्यांनीं त्या जागांची नुसती चाळण करून सोडली. जपानी गोलंदाजांची निशाणबाजी अचाट आहे, असा मोठा

गवगवा त्या वेळीं झाला होता; पण या निशाणबाजीच्या मुळाशीं काय होतें, याचा विचार केला ह्मणजे जपानी गोलंदाजांचें फारसें कौतुक करावयाला नको. माऱ्यांच्या जागांचीं सर्व अंतरें आणि त्यांची उंची वगैरे सर्व प्रकारची माहिती त्यांच्या हातीं आधींच पडली होती.

सामान्यपणें रशियन अम्मलदार वर्ग निष्काळजी आणि विचारशून्य होता, तरी तेथल्या रशियन शिबंदींतील शिपायी गडी चांगले होते, या बद्दल मात्र वाद नाहीं. ते मोठे विलक्षण तेजदार होते असें नाहीं, तथापि ते विश्वासू आणि आज्ञाधारक होते, यांत मात्र शंका नाहीं. कसाहि प्रसंग आला, तरी रशियन सेना बेदील होऊन कधींहि सैरावैरा पळत सुटावयाची नाहीं. अखेरच्या मनुष्यापर्यंत जागच्याजागीं लढत राहून सारी पलटण आपले देह धारातीर्थीं अर्पण करील; पण पळत सुटणार नाहीं. अम्मलदारासंबंधीं पहातां ते तेजस्वी, पुढें सरकण्यास उद्युक्त आणि निधड्या छातीचे असे होते; पण विषयासक्ति, हलगर्जीपणा, भावी युद्धाच्या स्वरूपाबद्दल बेफिकिरी आणि शत्रूच्या तयारीबद्दल अनादर या सर्व दुर्गुणांनीं त्यांचे चांगले गुण मातीमोल झाले.

पोर्टआर्थर येथील वरिष्ठ अम्मलदारांपैकीं दारूगोळ्याच्या खजिन्यावरील मुख्य अम्मलदार कर्नल रीस हे मात्र ह्या अम्मलदारांच्या नियमास अपवाद होते. किल्ल्याचे मुख्य गडकरी जनरल स्टोसेल यांजपासून तों तहत खालच्या शिपायांपर्यंत लष्करी अम्मलदारांची स्थिति कशी होती, हे मीं वर सांगितलेंच आहे. कर्नल रीस यांच्या लक्षांत मात्र ही भयंकर स्थिति आलेली होती. पुष्कळ वेळां मी त्यांच्याशीं शिळोप्याच्या गोष्टी सांगत बसत असें त्या वेळीं दारूगोळ्याचा पुरवठा उद्वेगजनक स्थितीत आहे, असे उद्गार ते मजपाशीं काढीत असत. या एकदर परिस्थितीसंबंधीं अधिक काळजी कां घेण्यांत येत नाहीं ? असा प्रश्न मी करतां ते म्हणाले, " काय करावें ? सरकार स्वारी ( झार ) येथून फार लांबच्या पल्ल्यावर आहे. "

दारूच्या भोतांत जें ठरलेलें वजन असावयाचें, त्याहून कमी वजनाचे भोत पुरविण्यांत आले होते. अर्थात् पैशाची आकारणी मात्र पुऱ्या वज-

नाची होत असे. दारूगोळ्याचीं पोतीं ज्या गाडीच्या डब्यांतून यावयाचीं, त्या डब्यांत वरचे दोन थर मात्र दारूगोळ्याचे असून त्यांच्या खालीं बाकी सारीं पोतीं वाळूचीं असावयाचीं. वाळूचा उपयोग फुटणाऱ्या गोळ्यापासून संरक्षण करण्यासाठीं असतो. अशा रीतीनें दारूगोळ्याऐवजीं वाळू पदरांत पडून त्याऐवजीं दारूच्या किंमतीचा पैसा लष्करी कंत्राटदारांच्या खिशांत पडत असे. सेनापति स्टोसेल यांच्याशीं माझी दोनदां मुलाखत झाली. हे मोठे चतुर सेनानी असावेत असा माझा ग्रह दोन्ही वेळां झाला नाहीं. बांध्यानें हे जनरल बुलरसारखे होते. हे अंतःकरणाचे खुले आणि निधड्या छातीचेहि होते; पण लष्करी कौशल्य यांच्या डोक्यांत फारसें असावें, असें मला वाटलें नाहीं.

पोर्टआर्थर येथें जे कांहीं रशियन लोक मला भेटले, त्या सर्वांत व्हेरेस्टशागिन हेच काय ते लक्ष वेधून घेण्यासारखे मला आढळले. युद्धाचीं चित्रें रंगविण्यांत यांच्या तोडीचा चित्रकार विरळा. त्यांनीं मला एक वेळ आपला ‘ स्नेही ’ म्हटलें याचा मला मोठा अभिमान वाटतो. ते एकदां हिंवतापानें आजारी असतां मी त्यांच्या थोडासा उपयोगी पडलों. या कारणानें त्यांची माझी प्रथम ओळख झाली. पुढें साहित्य संगीत इत्यादि गोष्टींबद्दल आमचीं मतें जुळतीं झाल्यामुळें हा परिचय दृढ होत गेला. पुष्कळ लेखक, कलापंडित व राजमंत्री मला आजपर्यंत भेटले; पण खोल विचार, आणि खरी गाळीव विद्वत्ता या बाबतींत या चित्रकाराची बरोबरी करणारा मला फारसा कोणी आढळला नाहीं.

पोर्टआर्थर बंदराच्या समुद्रकांठीं असलेल्या एका घराच्या सज्जांत आम्ही एके दिवशीं बसलों होतों. रात्र अगदीं शांत होती. आकाश अगदीं निरभ्र होतें. स्तब्धता सर्वत्र भरून राहिली होती. चांदणें पिठासारखें पडलें होतें. आम्ही बसलों होतों तेथून सर्व बंदर दिसत होतें. रशियन आरमारांतील राक्षसी गलबतांच्या छाया क्षितिजावर दिसत होत्या. आम्ही त्या वेळीं त्या भागाच्या इतिहासाची चर्चा करीत व विड्या ओढीत स्वस्थ बसलों होतों. जुन्या मांचू व तार्तार घराण्यांनीं जगाच्या इतिहासांत कसल्या प्रकारच्या गोष्टी नमूद करून ठेवल्या आहेत, व यापुढेंहि

या भागांत काय प्रकार घडण्याचा संभव आहे, अशा प्रकारच्या अनेक विषयांवर आमचें संभाषण चालू होतें. त्या वेळीं या विषयासंबंधीं व्हेरेस्टशागीन यांजपाशीं ऐतिहासिक ज्ञानाचा केवढा मोठा सांठा होता, हें मला कळून आलें.

अखेरीस रात्र बरीच झाली असें पाहून मी त्यांना ह्मणालों, " आज बराच वेळ मीं तुह्मांला त्रास दिला, " तेव्हां ते एकदम माझ्याकडे वळून व आपला हात माझ्या खांद्यावर ठेवून ह्मणाले, " छे ! छे ! डॉक्टरसाहेब, आज तुह्मीं माझ्यावर फार उपकार केले आहेत. आज माझी वृत्ति बावरल्यासारखी झाली आहे. या सुंदर टेंकड्या, लवकरच आगीच्या खायी बनून जातील, असें मला आज डोळ्यापुढें दिसूं लागलें आहे. आणि त्यांत रशियाचें नुकसान होईल; पण तें पाहण्यास मी कांहीं जगणार नाहीं. " हें शेवटचें वाक्य ते स्वतःशींच पुटपुटत असल्यासारखें दिसलें. थोड्या वेळानें ते आपल्या आरामखुर्चीवर एकदम उठून बसले आणि त्यांनीं आपलें आंग झाडल्यासारखें केलें. ते एकदम ह्मणाले, " डॉक्टर, मनुष्याला भावी गोष्टी कधीं कधीं आगाऊ कळतात, यावर तुमचा विश्वास आहे काय ? मृत्यु मला येथें लवकरच गांठील असें मला खचित वाटतें. "

त्यांचें हें भाषण ऐकून माझें शरीर थोडेंसें थरारलें. माझ्या मनांत त्या वेळीं काय आलें, तें शब्दांनीं सांगतां येण्यासारखें नाहीं. सामान्य गोष्टींनीं भांबावून जाण्याइतक्या कच्च्या दिलाचा मी नाहीं. मी मनाचा मोठासा कोंवळा नाहीं, अथवा असल्या प्रकारच्या गोष्टींवर विश्वास ठेवण्याइतका भोळाहि पण नाहीं; तथापि माझ्या आयुष्यक्रमांत एकदोन गोष्टी अशा घडून आल्या कीं, त्यांच्या कार्य–कारणसंबंधीं कसलीहि सामान्य उपपत्ति उपयोगीं पडत नाहीं. व्हेरेस्टशागीन यांचें भाषण ऐकून मीहि थोडा भांबावल्यासारखा झालों; तथापि थोड्या वेळानें मीं आपलें चित्त आंवरलें आणि त्यांना ह्मटलें, " तुमच्या अंगांत तापाची कसर अजून थोडीशी राहिली आहे. त्यांतून औषध थोडें अधिक कडक पडल्यामुळें त्याचाहि परिणाम तुमच्या चित्तावर झाला आहे, यामुळें असे भलभलते

विचार तुमच्या चित्तांत येत असतील. " माझें भाषण ऐकून ते उठून उभे राहिले आणि हंसून म्हणाले, " तुह्मी अश्विनीकुमार पडलां, तेव्हां तुमचें ह्मणणें खरें म्हटलेंच पाहिजे. "

तेथून बाहेर जाण्यापूर्वीं त्यांनीं मला पोर्ट आर्थरच्या देखाव्याचें एक लहानसें चित्र दिलें. मला जीं कांहीं थोडींशीं चांगलीं माणसें भेटलीं त्यांपैकीं एकाची स्मृति ह्मणून तें चित्र मीं जवळ बाळगलें आहे. अस्मादिकांशीं ज्यांची ज्यांची गांठ पडली, त्यांपैकीं जे थोडेसे निर्लेप ह्मणून सुटले, त्यांतच हे चित्रकार होते.

व्हेरेस्टशागीन यांचें भविष्य खरें झालें. पुढें सहा आठवड्यांनीं ॲडमिरल मॅकरॉफ यांच्या जहाजानें पोर्ट आर्थरच्या तोंडाशीं आंतील सर्व माणसांसह जी जलसमाधि घेतली, त्यांत व्हेरेस्टशागीन हे एक होते.

पोर्ट आर्थर येथें मी आणखी पांच आठवडे राहिलों. ॲडमिरल टोगो यांनीं पोर्ट आर्थर बंदरावर जो रात्रीचा पहिला छापा घातला त्याच्या आधीं बरोबर एक आठवडा मला जर्मनीहून तार आली. ही तार अर्थातच सांकेतिक भाषेंत होती. पोर्ट आर्थर बंदरांत अडकून पडण्याची वेळ लवकरच येईल, याकरतां तुह्मी ताबडतोब तेथून बाहेर पडा, असा हुकूम मला या तारेनें मिळाला होता. बर्लीन येथील बातमीखात्यास या हल्ल्याची अगाऊ माहिती होती. पण पोर्ट आर्थर येथें याबद्दल नुसती गुणगुण देखील कळली नव्हती, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. तसेंच हा हल्ला होण्यापूर्वीं कित्येक तास न्यूयॉर्क येथील सराफकट्ट्यावर रशियन नोटींच्या भावात अठरा दोकड्यांची घट झाली होती, हेंहि लक्षांत ठेवण्यासारखें आहे. वाशिंगटन येथील जर्मन वकिलातींतून ही बातमी बाहेर फुटली होती. मी पोर्ट अर्थर येथून बाहेर पडल्यानंतर बरोबर सात दिवसांनीं टोगो यांनीं रात्रीचा हल्ला चढवून झारविच, रेटव्हिझान् आणि पॅलाडा या तीन रशियन जहाजांस समुद्राचा तळ दाखविला.

युरोपला निघून जाण्यापूर्वीं मी प्रथम कियोचौला गेलों. कियोचौ हें चिनांतील एक जर्मन ठाणें आहे. ( होतें. ) माझ्या एकंदर कामगिरीसंबंधीं तपशीलवार हकीकत तेथून मीं तारेनें आपल्या सरकारास कळविली.

यानंतर सहा महिन्यांनीं जर्मनींतील बऱ्याच मोठमोठ्या लष्करी अम्मलदारांची व माझी मुलाखत झाली त्या वेळीं मीं पुरविलेली माहिती व त्यावरून मीं काढलेलीं अनुमानें हीं अगदीं बरोबर उतरलीं याबद्दल त्यांनीं माझें अभिनंदन केलें.

पोर्टआर्थर येथें मला कां पाठविण्यांत आलें होतें, याचीं कारणें मला मागाहून कळलीं. पोर्टआर्थर येथें व त्या बाजूच्या एकंदर भागात रशियाचीं स्वसंरक्षणाचीं साधनें कितपत जय्यत स्थितींत होतीं, त्याचा अंदाज जर्मनीला काढावयाचा होता.

या अंदाजाचीं कारणें अशीं:—

पहिल्या नेपोलियनच्या काळानंतर जर्मनीला जर कोणत्या एकाद्या राष्ट्राची भीति वाटत असेल, तर तें राष्ट्र रशिया हेंच होय. रशियाशीं उघडपणें तंटा उपस्थित करणें जर्मनीला धोक्याचें वाटतें. १९०६ सालीं रुसो जपानी युद्धात रशियाची जी तंगडमोड झाली, तीमुळें बाल्कनद्वीपकल्पांतील त्याच्या वजनास उतरती कळा लागली. त्याचप्रमाणें बाल्कनयुद्धांत रशियाची नीति अयशस्वी झाल्यामुळें त्याचें तेथील महत्त्व इतकें कमी झालें कीं, कित्येक वर्षेपर्यंत तें पुन्हां सांवरलें जाणार नाहीं. आपल्या बातमीखात्याच्या द्वारें जर्मनीला रुसोजपानी युद्धाचें भविष्य आगाऊच कळून चुकलें होतें. तेवढ्यानें सावध होऊन बाल्कन संस्थानांतील रशियाच्या महत्त्वाचें पूर्ण उच्चाटन करण्याचा उपक्रम जर्मनीनें सुरू केला.

रुसोजपानी युद्धांत झालेल्या पराभवानें रशियाच्या सामर्थ्याचें केंद्रस्थान बदललें. यामुळें बाल्कनसंस्थानांत आणि तुर्की राज्यांत ढवळाढवळ करण्याची संधी जर्मनी आणि आस्ट्रिया या राष्ट्रांस मिळाली. अशा संधीसाठीं हीं राष्ट्रें टपूनच बसलीं होतीं. रुसोजपानी युद्धांत रशियाची सरशी होईल, असें जर्मनीला वाटलें असतें, तर बाल्कन संस्थानांच्या नकाशांचे रंग आणखी कांहीं निराळ्याच पद्धतीनें पालटले असते. असो. याचा आणखी उल्लेख पुढें येईलच.

## प्रकरण चवथें.

# तुर्की राज्यांत.

माझा पूर्वेकडील प्रवास संपून तारीख १० मार्च १९०५ रोजीं मी बर्लिन येथें परत आलों. यानंतर चार महिने विशेष महत्त्वाचें असें कांहीं घडलें नाहीं. या चार महिन्यांत मला ज्या कामागिऱ्या सांगण्यांत आल्या, त्यांत महत्त्वाची व मनोवेधक अशी एकहि नाहीं.

यानंतर तारीख ५ जुलै रोजीं कॅपटन् फॉ त्यापकेन् यांजकडून मला तांतडीचें बोलावणें आलें. त्याप्रमाणें कोनिगरग्रयाडझर स्ट्रासी नं० ७० येथें मी एकदम जाऊन हजर झालों. मी एकदम कॅपटन साहेबांच्या ऑफिसांत शिरलों आणि त्यांजकडे मीं पाहिलें, तेव्हां ते बऱ्याच गडबडींत होते असें दिसलें.

" डॉक्टरसाहेब, तुमची आमची संगति आतां तुटणार याचें मला फार वाईट वाटतें. यापुढें वुइलहेल्मस्ट्रासीच्या तैनातींत तुम्हांला देण्याचा हुकूम मला झाला आहे. मला खरोखर फार राग आला आहे. आमच्या खात्यांतून तुह्मांला तिकडे द्यावें हें मला बरें वाटत नाहीं. पण करणार काय ? आलेल्या हुकुमाची बजावणी करणें मला भाग आहे. "

या त्यांच्या भाषणावर मीहि आपलें दुःख प्रदर्शित केलें.

" डॉक्टर, यांत तुमचें हितच आहे. वुइलहेल्मस्ट्रासीची नजर आमच्या माणसांवर फार करून जात नाहीं. माझ्याकडील माणसांची बदली ते आपणाकडील तैनातीवर फारशी कधीं करीत नाहींत; पण तुमच्या चांगल्या कामगिरीमुळें त्यांचें लक्ष तुमच्याकडे वेधलें आहे. तथापि तुह्मी आम्हांला कांहीं कायमचेंच सोडणार नाहीं अशी मला आशा आहे. कधीं मधीं आमची आठवण ठेवा, इतकीच मी तुम्हांला विनंति करतों. हर स्टयामर हे तुमच्या बरोबर जाऊन तुम्हांला तेथें रुजू करतील. सलाम. तुमची भरभराट होवो. "

मोठ्या प्रेमानें क्यापटन् साहेबांचें व माझें हस्तांदोलन झालें, आणि

अशा रीतीनें आरमारी बातमीखात्याचा व माझा संबंध तुटला. स्टामर आणि मी असे दोघे बाहेर पडल्यावर आम्हीं एक मोटारगाडी बोलावली. आणि वुइलहेल्मस्ट्रासीवर जाऊन हजर झालों. दरवाजावर पूर्वीच्या प्रसंगाप्रमाणें सर्व सोहळा झाल्यावर द्वाररक्षकानें एका खोलींत आम्हांला बसविलें व तो अदृश्य झाला. येथें मला कसल्या प्रकारची कामगिरी मिळणार, हें जाणण्याची मला मोठी उत्कंठा लागली होती. पण स्ट्यामर यास या बाबतींत मीं कसलाहि प्रश्न विचारला नाहीं. या खात्यांत काम करूं लागल्यापासून मला प्रथमच मिळालेला, प्रश्न न विचारण्याचा धडा मीं आतांपर्यंत चांगला गिरविला होता. थोड्याच वेळांत उंच, अंगानें साधारण बारीक व थोडेसे सांवळ्या वर्णाचे असे एक गृहस्थ आंत आले. पक्क्या सुलतानी थाटाचा प्राशियन अम्मलदार कसा असतो, हें या गृहस्थांच्या वागणुकीवरून कळण्यासारखे होतें. ते जलदीनें पावलें टाकीत खोलींत शिरले आणि आम्हीं दिलेल्या सलामीचा स्वीकार थोडीशी मान हलवून त्यांनीं केला. नंतर स्ट्यामर याजकडे बघून ते ह्मणाले,

" काय स्ट्यामर, काय खबर आहे ? "

" हे डॉ. ग्रेव्हज्. मेहेरबान. "

" असें काय ? ठीक आहे. स्ट्यामर, क्यापटन् स्यापकेन् यांना माझे सलाम कळवा. "

सलाम करून हर स्ट्यामर बाहेर पडले. या नव्या मेहेरबान साहेबांनीं मला दुसऱ्या एका आंतल्या खोलींत नेलें. त्या ठिकाणीं बसलेल्या एका चिटणविसाने या मेहेरबानांचें नांव व हुद्दा हीं मला कळविलीं. त्यांचे नांव ग्राफ बोथो फॉ वेडेल असें असून ते बादशहाचे प्रिव्हीकौन्सीलर होते.

अस्सें ! एकंदरींत कौंट वेडेल म्हणतात, ते हे ! आजपर्यंत कौंट साहेबांची बरीच कीर्ति मीं ऐकली होती; पण त्यांचें प्रथम दर्शन आजच मला झालें. खुद्द बादशहांचे हे सल्लामसतलगार असून हेरखात्याच्या राजकीय विभागाचे हे मुख्य अम्मलदार होते. हे गृहस्थ म्हणजे बादशहाचा उजवा हात असा त्यांचा लौकिक होता. आतां एकंदरींत मोठी मजा होणार यांत कांहीं शंका नाहीं. मला कामगिरी तरी कसली मिळणार ?

अशा प्रकारच्या विचारतरंगांत मी वाहवत असतां कौंट साहेबांकडून मला एकदम बोलावणें आलें, आणि खुद्दांच्या खोलींत आमचा प्रवेश झाला.

मी आंत गेल्यावर कौंट यांनीं एका खुर्चीकडे बोट करून मला बसण्यास सांगितलें. वेडेल यांनीं बराच वेळपर्यंत आणि अत्यंत सूक्ष्मपणें अस्मादिकांची मर्ति न्याहाळून पाहिली आणि संतोषाचें चिन्ह त्यांच्या चेहऱ्यावर उमटलें.

" डॉक्टर, तुमचें वय काय ? "

माझें वय थोडें असल्यामुळें वयाचा प्रश्न कोणी विचारल्याबरोबर मला मोठी चीड येते.

" पंचवीस, मेहेरबान. "

" अगदींच पोरवय. अगदींच कोंवळा ! " थोडा वेळ थांबून त्यांनीं पुनः एकवार टक लावून माझ्याकडे पाहिलें.

" असो. तुह्मी लहान असलां, तरी तुमचें काम संतोषकारक आहे, अशी खबर आह्मांला मिळाली आहे. सामान्यतः तुमच्या वयाच्या माणसांना असावी, त्याहून तुमची बुद्धि आणि सारासार विचारशक्ति हीं अधिक योग्यतेचीं आहेत. "

मीं आभारदर्शक सलाम केला.

कौंट वेडेल म्हणाले, " आजपासून तुमची नौकरी आमच्या शाखेंत रुजू करण्यांत आली आहे. फार महत्त्वाच्या अशा कांहीं कामगिऱ्या तुम्हांस सांगण्यांत येतील. त्यासंबंधीं तुह्मांला जी कांहीं माहिती लागेल, त्याबद्दलचे सारे हुकूम खुद्द माझ्याकडून तुह्माला मिळतील. कोणत्याहि बाबीबद्दलचा रिपोर्ट तुह्मांला कळाविणें असेल, तेव्हां तो थेट माझ्याकडे करीत जा. कोणताहि अम्मलदार अथवा दुसरा कोणीहि मनुष्य केवढ्याहि मोठ्या दर्जाचा असला तरी माझ्या स्पष्ट परवानगीशिवाय त्याची भेट घेण्याची तुह्मांला मनाई आहे, समजलां ?

" होय साहेब. "

कौंट आणखी म्हणाले, " तुह्माला लागेल तो पैसा आमच्या चिट-

णिसाकडून घेत जा. दिलेल्या पैशाचा हिशोब तुह्मांला दरमहा रुजू करावा लागेल. कामगिरीवर जाण्यास तुह्मी केव्हां तयार व्हाल ? "

" दोन तासांत तयारी करूं शकेन " असा मी जबाब दिला.

कौंट म्हणाले, " ठीक आहे. जितक्या लवकर तुह्मी तयार व्हाल तितकें चांगलें. आतां जी कामगिरी तुह्मांला मी सांगणार आहें ती अशी. तुह्मी एकदम कान्स्टान्टीनोपलला जा आणि फ्रेंच व रशियन सरकाराकडून तेथच्या कोणत्या सरकारी अम्मदारांना तैनात मिळते याचा शोध करा. तसेंच मुलकी व लष्करी अम्मलदारांचें कोणत्या स्त्रियांशीं विशेष संघटन आहे, याचाहि शोध करा. विशेषेंकरून या स्त्रिया कोणत्या देशांतून आल्या आहेत, याचा शोध काढण्यास विसरूं नका. येथून कांहीं ओळखीचीं पत्रें मी तुह्मांला देणार नाहीं. कारण त्यामुळें तुमच्याबद्दल तेथें संशय मात्र उत्पन्न होईल. तेथले लोक फार लुच्चे आहेत, याकरतां फार संभाळून आणि धिरे धिरे तुमचा उद्योग तुम्हांला केला पाहिजे. त्या देशांत कोणतेहि काम झटपटीनें व्हावयाचें नाहीं हें तुह्मांला ठाऊक आहेच. "

यानंतर कांहीं वेळ दुसऱ्या कांहीं बारीकसारीक मुद्यांवर आमचें संभाषण झाल्यावर कौंट म्हणाले, " आजपासून तुमचा सरकारी नंबर १७३४ आहे, हें ध्यानांत ठेवा. खुद्द माझ्याकडे जे रिपोर्ट तुह्मी पाठवाल, त्यावर १७ ही सही असावी आणि जे दुसरे रिपोर्ट आमच्या ऑफिसाकडे येतील, त्यावर ३४ ही सही करीत जा. "

माझ्या प्रवासाच्या तयारीकरतां लागणाऱ्या खर्चाची रक्कम कौंटसाहेबांच्या एका चिटणिसाकडून मीं घेतली आणि मी आपल्या खोलींत परत येऊन पुढील कामगिरीची तयारी कशा प्रकारें करावी, याचा विचार करूं लागलों. क्यापटन् स्थापकेन यांच्या ऑफिसांतून माझी बदली झाली, ही गोष्ट मला एका अर्थी बरी वाटली. कारण वुइलहेलमस्ट्रासींत माझी नेमणूक झाल्यामुळें मुत्सद्दी मंडळाच्या पाताळयंत्रांतील विशेष महत्त्वाचे भाग मला पहावयाला सांपडतील असें मला वाटलें. वुइलहेल्मस्ट्रासींतलि अंमलदार माझ्या कामासंबंधानें खुष झाले आहेत, असें स्थापकेन यांज-

कडून मला कळलें होतें. पोर्टआर्थर येथे जी कामगिरी मीं बजावली तिजमुळें एका खाजगी नाजुक कामगिरीवर माझी नेमणूक झाली होती. ती गोष्ट अशीः—

आपल्या सर्व लष्करी अंमलदारांवर जर्मनीची सक्त नजर असते. त्यांतील एकादा अंमलदार आपल्या उत्पन्नाहून अधिक उधळपट्टी करतोसें दिसलें कीं, त्याची ताबडतोब शहानिशा करण्यांत येते. स्प्यांडॉ येथिल शिबंदीपैकीं एक लष्करी अंमलदार पुष्कळ पैसा उधळतो असें आमच्या गुप्तखात्याच्या नजरेस आले, तेव्हां त्याजबद्दल चौकशी करण्याचे कामीं माझी नेमणुक झाली होती. स्प्यांडॉ येथील बंदुकींच्या कारखान्यांत या अंमलदाराची नेमणूक होती. त्याच्या उधळपट्टीला लागणारा पैसा इतर राष्ट्रांना लष्करी रहस्य सांगून तो मिळवीत असेल असा साहजिकच संशय आला.

हा संशय निराधार असून आंत कांहीं वेगळाच नाजुक प्रकार आहे, असें मला आढळून आलें. परकीय राष्ट्रांच्या बाबतींत या अम्मलदाराची वर्तणूक अगदीं निष्कलंक होती, असे मला दिसलें. त्याला जी प्राप्ती होत होती तिचा उगम एका राजकुळांतून झाला होता. एका राजघराण्यांतील एक मुलगी त्याच्यावर आसक्त झाली होती आणि तिजकडून त्याला पुष्कळ पैसा मिळत असे. ती मुलगी एका सन्माननीय घराण्यांतील होती, त्या अर्थी क्यापटन् स्यापकेन्‌कडे जाणाऱ्या रिपोर्टांत तिच्या नांवाचा उल्लेख करणें मला युक्त वाटलें नाहीं. आतां रिपोर्ट कसा करावा याची मला मोठी पंचाइत येऊन पडली. शेवटीं सदहू अम्मलदारानें कोणत्याहि प्रकारचा देशद्रोह केला नाहीं, एवढ्याच [illegible] रिपोर्ट मीं स्यापकेन् यांजकडे पाठविला, व याशिवाय दुसरा एक खाजगी रिपोर्ट एकदम वरिष्ठ अम्मलदाराकडे मीं पाठविला व त्यांत या नाजुक गोष्टीचा उल्लेख मीं केला होता. यामुळें त्या राजकन्येच्या नांवाचा बभ्रा खालच्या अम्मलदारांत न होतां सर्व काम सुरळीतपणें पार पडलें. या कामगिरींत जी सारासार विचारशक्ति मीं दाखविली, तीमुळें वुइलहेल्मस्ट्रासींत माझ्याबद्दल चांगला ग्रह उत्पन्न झाला असावा, असा माझा खास तर्क आहे.

मिटलस्ट्रासीच्या रस्त्यावर एका बाजूच्या घरांत मीं रहावयासाठीं जागा घेतली होती. साऊथ आफ्रिकेंतून मीं बरोबर आणलेला झुलू जातीचा छोकरा किम् हा आतां चांगला वाढला होता. तोच माझी सर्व व्यवस्था पहात असे. मी कोण आणि मी उद्योगधंदा काय करतों इत्यादि गोष्टींची फाजील चवकशी माझ्या शेजाऱ्यापाजाऱ्यांनीं करूं नये ह्मणून मी साउथ आफ्रिकेंतला एक मोठा जमीनदार असून प्रकृतीच्या स्वास्थ्यासाठीं युरोपांत आलों आहें, अशी हकीकत चोहींकडे मीं पसरून दिली होती. कित्येक वेळां महिनेच्या महिने आमची स्वारी अस्तंगत व्हावयाची आणि कित्येक वेळां महिनेच्या महिने मिटलस्ट्रासी वरील बिऱ्हाडांत माशा मारीत पडावयाची. असल्या या परस्परविरोधी वर्तनाचा मेळ लोकांच्या दृष्टीनें बसविणें मला इष्ट होतें. याकरतां ही साउथ आफ्रिकन् जमीनदाराची कहाणी मला रचावी लागली. प्रकृतिस्वास्थ्यासाठीं हवा खाण्याच्या ठिकाणीं मी मधून मधून जाऊन रहात असतों, असा समज मीं करून दिला.

कान्स्टान्टिनोपल येथें ज्या कामगिरीवर माझी योजना झाली होती, ती कामगिरी फार नाजुक स्वरूपाची होती. तेथे बराच काळ राहणें मला अवश्य होतें. तेथें कोणत्या धंद्याच्या मिषानें रहावें, याबद्दल मला मोठा विचार पडला. देशोदेश पहाणारा प्रवासी या नात्यानें रहावें, असा विचार प्रथम माझ्या मनांत आला; पण प्रवाशाचें हें सोंग माझ्या उद्देशाला अगदींच विरुद्ध असल्यामुळें त्याबद्दल अधिक विचार करण्याचें प्रयोजन उरलें नाहीं. केवळ देशोदेशींच्या मौजा पहात फिरणारा प्रवासी कोणत्याहि एकाच ठिकाणीं फार दिवस रहात नाहीं आणि मला तर तेथें तीन चार महिने मुक्काम करावयाचा होता. प्रवाशाच्या सोंगाची याप्रमाणें वाट लागल्यावर दुसऱ्या कसल्या धंद्याचें सोंग पांघरावें याचा विचार मी करूं लागलों. एकाद्या विषयाचा विद्यार्थी ह्मणून तेथें रहावें, तर तशा स्थितीलाहि अनुकूल अशा कांहीं योजना कान्टान्टिनोपल येथें नाहींत. पोर्टआर्थर येथें मी वनस्पतिशोधक ह्मणून राहिलों होतों. हाच आपला 'शोध' तुर्की राजधानींतहि चालवावा, असें एक वेळ मला वाटलें; पण हाहि

धंदा जमण्याचा रंग दिसेना. कसल्या तरी जिनसांचे व्यापारी बनावें, तर तेंहि माझ्या हातून पोषक नव्हतें. व्यापारी बनावयाचें म्हणजे तेथल्या पुष्कळशा व्यापाऱ्यांच्या ओळखीपाळखी केल्या पाहिजेत. या ओळखी करण्यांत काळाचा व्यय फार होणार आणि आमचें खरें कार्य लांबणीवर पडणार. अशा रीतीनें विचार करतां करतां शेवटीं हकीम बनण्याचा मीं निश्चय केला. तुर्क आणि अरब लोकांत हकीम हा फार आदरणीय आणि पूज्य मानला जातो. याप्रमाणें पुढील सोंग निश्चित केल्याबरोबर मीं एकदम आपल्या खात्याकडे टेलीफोन केला आणि कान्टान्टिनोपल येथील जर्मन व पेरा हॉस्पीटल या दवाखान्यांच्या मुख्याला ओळखीचीं पत्रें घेण्याची व्यवस्था केली. वरील इस्पितळें ज्या संस्थेमार्फत चाललीं होतीं, ती संस्था बर्लिन येथेंच होती. मीं मागितलेलीं पत्रें त्या संस्थेच्या अधिकाऱ्यांकडून मला मिळालीं. उष्ण कटिबंधांतील आणि आशियाखंडांतील विशिष्ट रोगांचा अभ्यास करण्याकरितां कान्स्टांटिनोपल येथें मी जात असून मला सर्व प्रकारचें सहाय्य करावें असा मजकूर त्या पत्रांत होता. माझीं शस्त्रक्रियेचीं हत्यारे व इतर वैद्यकीय आयुधेंहि बरोबर घेण्याच्या सामानांत बांधण्याविषयीं मीं क्रिम याला सांगितलें, व त्याच रात्रीं कान्स्टान्टिनोपल-कडे जाणाऱ्या खास गाडीनें बर्लिन शहर सोडण्याचा मीं बेत केला. या वेळीं क्रिम यास मीं बरोबर घेतलें होतें. माझ्या पुढील बेताला क्रिमचें चांगलें सहाय्य होण्यासारखें होतें. थोड्या वेळानें काउन्ट वेडेल याज-कडून कांहीं पैसे व सीलबंद पत्रे घेऊन एक मनुष्य आला. कान्स्टान्टि-नोपल येथें जे जर्मन अधिकारी जर्मनसरकाराकडून उघडपणें नेमण्यांत आले होते, त्यांच्याशीं कोणत्याहि प्रकारचा संबंध ठेवूं नये, असें वेडेल यांनीं मला निक्षून बजावलें होतें. अस्मादिकांसारख्या मुरलेल्या मनु-ष्याला असली सूचना करण्याचे श्रम वेडेल यांनीं घेण्याचें कांहीं कारण नव्हतें. पौर्वात्य लोक किती आंतल्या गांठीचे व सुतानें स्वर्गाला जाणारे असतात, याची ओळख मला चांगली होती. तेव्हां माझ्या उद्देशा-बद्दल यत्किंचित्‌हि शंका लोकांच्या मनांत येईल असें वर्तन कान्स्टान्टि-नोपल येथें करण्याइतका दुधखुळा मी खास नव्हतों. पौर्वात्य स्वभावाचें

मला फार खोल ज्ञान आहे अशी मला मोठी घमेंड आहे. काउन्ट वेडेल यांनीं एक हजार मार्क-सुमारें आठशें रुपये रोख दिले होते. आणि याशिवाय कान्स्टान्टिनोपल येथील आटोमन बँकेवर पांच हजार रुपयाची हुंडी माझ्या नांवची दिली होती.

या खेपेला मीं किम याला बरोबर घेतलें, याबद्दल वाचकांना बरेंच आश्चर्य वाटेल; पण कान्स्टान्टिनोपल येथें त्याचा उपयोग मला अतिशय होईल, अशी माझी पक्की खात्री होती. कारण कीमला त्याच्या स्वतःच्या देशांतल्या सगळ्या काफिर भाषा येत असून शिवाय त्याला आरबी भाषेचेंहि ज्ञान होतें. आरबी भाषेचें ज्ञान असलेल्या कोणत्याहि शिद्दी मुलाला कान्स्टान्टिनोपलमधली कोणतीहि गोष्ट कळणें अशक्य नाहीं. कान्स्टान्टिनोपल येथें काळ्या वर्णांतील साऱ्या जातींचा मोठा भरणा आहे. घरींदारीं नौकरीच्या पेशानें राहिलेल्या सजातीय लोकांपासून कीमला जी माहिती मिळण्याजोगी होती, ती माहिती एखाद्या युरोपियनाला मिळविणें शक्य नव्हतें.

कोणत्याहि प्रकारची अडचण वाटेंत न येतां मी कान्स्टान्टिनोपलला पोहोंचलों आणि रु उस्माल अह्ली नांवच्या भागांत असलेल्या ब्रासरीकोर नांवाच्या एका मध्यमशा हाटेलांत आह्मीं आपला तळ दिला. या ठिकाणी बहुधा सामान्य प्रतीचे लोक उतरत असत. आपणाकडे कोणाचें विशेषसें लक्ष वेधूं नये ह्मणून मीं ही योजना केली होती. एखाद्या मोठ्या दरबारी हाटेलांत मी उतरलों असतों तर ती गोष्ट फुकट चर्चेला कारण झाली असती. हा गृहस्थ कोण ? तो मोठा पैसेवाला दिसतो ! हा पैसा याचा स्वतःचाच आहे, कीं तो दुसऱ्या कोठून आणतो ? याचा हा स्वतःचा पैसा नसेल, तर हा कोणाच्या पैशावर एवढी चैन करतो ? असल्या प्रकारच्या अनेक प्रश्नांची चर्चा गांवांत सुरू झाली असती. स्वतःबद्दल असल्या प्रकारच्या कुशंका तुर्की लोकांच्या मनांत उत्पन्न होऊं देणें हें नेहमींच फार अनिष्ट आहे. यापूर्वीं कान्स्टान्टिनोपल येथें मी केव्हांच गेलों नव्हतों. याकरतां शहराच्या नकाशाची ओळख करून घेण्यांत पहिला आठवडा मीं घालविला. निरनिराळ्या राष्ट्रांच्या वकिलातींची

ठिकाणें व मोठ्या दरबारी अधिकाऱ्यांचीं रहातीं घरें यांची माहिती मिळविणें मला अवश्य होतें. या उद्योगांत एक आठवडा खर्च केल्यानंतर एका नव्या जागीं मीं आपलें बिऱ्हाड नेलें. दरबारी लोकांचा रहावयाचा जो मोहोल्ला होता, त्याच्या मध्यभागींच माझ्या नव्या बिऱ्हाडाची जागा होती. येथें बिऱ्हाड आणल्यानंतर तुर्की अम्मलदारांच्या रखेल्या कोठें रहातात याचा शोध मीं चालविला. कान्स्टान्टिनोपल येथें आल्यानतर दुसऱ्याच दिवशीं जर्मन आणि पेरा इस्पितळांत मीं आपलीं ओळखपत्रें हजर केलीं आणि तपासनीस या नात्यानें तेथल्या नोंदबुकांत मीं आपलें नांव दाखल करून घेतलें. या नतर प्रत्येक दिवशीं थोडा थोडा वेळ मी या इस्पितळात घालवीत असें. असें करण्यांत मीं ऊन किंवा पाऊस यांचाहि विचार केला नाहीं, आणि आपला नियम चुकविला नाहीं. दिवसांतून निदान एकदां आणि कधीं कधीं दोनदां या इस्पितळांची वारी करून तेथील बुकावर मी सह्या करीत असें. डॉक्टर फ्रान्झ फॉ ग्रेव्हज ही सही या इस्पितळांच्या नोंदबुकांत किमानपक्ष शभर वेळां तरी सांपडेल. वाचकहो, आतां तुह्मीच सागा पाहूं कीं, मीं आपलें वैद्यकीय शोधाचे काम बरोबर केलें कीं नाहीं ? माझा सह्यांचा आंकडाच ही गोष्ट सिद्ध करण्यास पुरेसा आहे !

थोड्या दिवसांनीं पेरा इस्पितळाच्या जवळ मीं एक खोली भाड्यानें घेतली आणि मध्यम स्थितींतील खाऊन पिऊन सुखी अशा तुर्काला साजेशा पद्धतीनें ती सजविली. मीं घेतलेल्या सोंगाची बतावणी योग्य रीतीनें करण्यास अशी गोष्ट करणें अवश्य होतें. येथें मीं श्रीमंतीचा आव घातला असता, तर शंका आणि कुशंकांचा नुसता सुळसुळाट झाला असता. फाजील चवकस व संशयखोर असे लोक येथल्याइतके दुसरे कोठेंहि तुम्हांस आढळावयाचे नाहींत. पोर्ट सय्यद येथें साऱ्या जगांतला हलकटपणा व दुष्टपणा भरला आहे, असें किप्लींग ह्मणतो. त्याचें हें ह्मणणें बरोबर आहे; पण तो इस्तंबूल येथें कधींच गेला नसावा असें मला वाटतें. इस्तंबूल येथें जगांतल्या साऱ्या जातींच्या बाजरबुणग्यांचे मिश्रण भरलें आहे. जगांतल्या साऱ्या जाती आणि पोटजाती यांचे मासले येथें पहावयास सांप-

डतात. या साऱ्या जातींचे नमुने येथें आपल्या मूळच्या रूपांत दिसतात, इतकेंच नव्हे तर त्यांच्या एकमेकांच्या मिश्रणानें आणखीहि अत्यत विकृत अशा मानव जाती येथें निर्माण झालेल्या आहेत. मानव जातींची ही खिचडी इतकी अपूर्व आहे कीं, कोणत्याहि मानवशास्त्रज्ञास तिचें वर्गीकरण करणें शक्य नाहीं. उदाहरणार्थः-अल्बोनियांतला एक दरवडेखोर हा स्वतः ग्रीक बाप आणि न्युबियन सिद्दी आई याच्यापासून निर्माण झालेला असतो. हा एका अरब स्त्रीशीं लग्न लावतो. या अरब स्त्रीचें मूळ एकाद्या फ्रेंचाच्या रक्तांत सांपडते. आतां हा दरोडेखोर नवरा आणि ही अरब स्त्री यांजपासून झालेली संतति कोणत्या वंशाची म्हणावी ? द्या उत्तर पाहू! अशा स्थितींत आणि अशा प्रकारच्या खिचडीच्या शहरांत एकाद्या यूरोपियाला आणि त्यांतून परक्याला आपलें काम करणें कितपत सुलभ जात असेल, याचा विचार करणें तुमच्याकडेच सोंपवितो.

कान्स्टान्टिनोपलची सामान्य पहाणी करतांना त्या शहरांत अनेक परस्परविरोधी गोष्टी भरून राहिल्या आहेत, असें मला आढळून आलें. शहराच्या ज्या भागांत मूळचे अस्सल तुर्क लोक राहतात, तो भाग फार स्वच्छ आणि सुखसोयींनीं भरलेला आहे. तसेंच येथें परकीय लोक रहातात, तो भागहि स्वच्छ आहे; परंतु याशिवाय बाकीचा शहराचा भाग म्हणजे शुद्ध सैताननगरी आहे. दारासमोर उकिरडा माजला तरी त्याकडे ढुंकूनहि पहावयाचें नाहींत असल्या ऐदी लोकांनीं बाकीचें शहर भरून गेलें आहे. कान्स्टान्टिनोपल येथील अस्सल तुर्क आणि बाकीची खिचडी यांच्यांतील भेद वर वर पहाणाऱ्या प्रवाशांच्या लक्षांत येत नाहीं; पण मुळांत फारच मोठा भेद आहे, हें विसरतां कामा नये. अस्सल तुर्की गृहस्थ किंवा उस्मानाचा खरा वंशज हा स्वच्छतेचा भोक्ता, रूबाबदार आणि थंड्या डोक्याचा असावयाचा. त्याच्या वृत्तींत एक प्रकारची तत्वज्ञपणाची छाया दिसते; तथापि या छायेंत आतां थोडीशी हलक्या वृत्तीची भेसळहि झाली आहे. एशिया मायनर आणि युरोपचा दक्षिणेकडील भाग यांतून आलेल्या लोकांच्या शेकडों वर्षांच्या संसर्गानें त्याच्या मूळच्या वृत्तींत किंचितसा फरक पडलेला दिसतो.

माझें काम अत्यंत कठिण होतें, हें मीं अगोदरच सांगितलें आहे. शहराची सर्व राहणी आणि तेथील एकंदर जीवनक्रम यांची पाहणी करावयाची. या कामांत अत्यंत चिकाटी आणि त्रास सोसण्यास लागणारी मनाची शांति हीं अवश्य पाहिजेत. बरेच दिवस अशा रीतीने श्रम करून तेथील सरकारचीं अंतस्थसूत्रें कशीं चाळलीं जातात याची माहिती मीं मिळविली. तेथल्या रखेल्यांचीं ठिकाणें शोधून काढण्यांत पुऱ्या तीस रात्री मला खर्चाव्या लागल्या. यांत फ्रेंच, रशियन व सरकेशियन औरतींचाच जास्त भरणा आहे. त्यांचा संबंध थेट मुख्य वजिरापासून तो खालच्या दर्जाच्या लष्करी अंमलदारापर्यंत सर्वांशीं आहे. आमच्या भावी कार्यांतला हा पहिला दुवा घडविणेंच फार दुष्कर होतें. यांनीं माझा अर्धा जीव मट्टयास आणला; पण साऱ्या इमारतीचा तो पायाच असल्यामुळें त्यावर मेहनत करणें आवश्यकच होतें. पायात एकादी जरी चूक राहिली, तरी ती पुढें दगा दिल्यावाचून रहावयाची नाहीं. कित्येक वेळां महिनेच्या महिने काम करूनहि विशेषसें फळ दिसत नाहीं, इतकेंच नव्हे तर कित्येक वेळां मार्गहि अगदीं चुकलेला असतो. या गोष्टींची चवकशी करतांना विलक्षण सावधपणा आणि दूरवर नजर हीं ठेवावीं लागतात. राजकीय कारभारांत ढवळाढवळ करणाऱ्या या कमअस्सल स्त्रिया कमालीच्या धूर्त आणि चाणाक्ष असतात. एकाद्या सावजाला आपल्या भक्ष्याचा वास जसा फार लांबून येतो त्याचप्रमाणें या स्त्रियाहि राजकीय खटपट करणारे ' भक्ष्य ' फार लांबून हुडकून काढतात. याकरता यांच्या दरींत प्रवेश करावयाचा तो फार सावधगिरीनें आणि शिताफीनें केला पाहिजे, हें उघड होय.

या माझ्या कामांत किमची बिनमोल मदत झाली. फार काय; पण तो नसता, तर माझ्या कामांत मला मुळींच यश आलें नसतें. तुर्की कामदाराच्या घरीं अनेक जातींचे काळे लोक नौकरीच्या पेशानें राहिलेले आहेत. या नौकरांपासून कांहीं माहिती मिळवावयाची म्हटलें, तर ती गोष्ट एकाद्या गोऱ्या मनुष्याला कधींहि साध्य व्हावयाची नाहीं. कारण हे लोक कोणत्याहि गोऱ्याशीं मन मोकळें करून कधींहि बोलावयाचे नाहींत.

त्यांच्या तोंडाचें कुलूप काढण्यास सोन्याच्या किल्लीचाहि उपयोग होत नाहीं; पण किम हा त्याचा जातभाई आणि विशेषेंकरून त्यांच्यांतील एका राजघराण्याचा वंशज असल्यामुळें अत्यंत महत्त्वाच्या खबरा मिळविणें त्याला शक्य झालें.

तुर्की कामदारांच्या रखेल्यांचीं रहाण्याचीं ठिकाणें शोधून काढण्याचें काम मी आपल्याकडे घेतलें होतें. यानंतर पुढील भाग मीं किमकडे सोपविला होता. एकाद्या स्त्रीच्या घराचा पत्ता लागला आणि तिचे नांव कळलें, कीं किम तेथें हजर व्हावयाचाच.

" किम, अमुक एका स्त्रीला रोज भेटावयाला कोण अमलदार येतो? रोज एकच अंमलदार येतो की काय, ही माहिती तुला मिळविली पाहिजे. तसेंच तिला पत्रें वगैरे कोठून येतात, याचाहि शोध तुला केला पाहिजे. त्याचप्रमाणें तिला बाहेरून कोठून पैसा येतो, याचीहि माहिती तूं मिळव. थोडक्यांत इतकेंच सांगायचें कीं, तिच्या संबंधीं जी कांहीं बारीकसारीक माहिती मिळेल ती सारी तूं खिशांत घालून ठेव. "

अशा रीतीनें किमची योजना झाली ह्मणजे तो त्या घरांत प्रवेश करून नोकरचाकरांत जाऊन बसत असे. ही स्वारी तेथून बाहेर पडली, ह्मणजे मला लागणाऱ्या या माहितीनें तिचे खिसे भरपूर भरलेले असावयाचे.

या वेळीं अबदुल्ला या नांवाचा मुख्य वजिराचा एक महत्त्वाचा सल्लागार होता. बालनिऑ नांवाच्या एका स्त्रीकडे या अबदुल्लाचें मोठें सूत जमलें आहे असें मला आढळून आलें. मुख्य वजीर जर्मनीला अत्यंत प्रतिकूल आणि जर्मनीच्या हिताकडे अगदीं काणाडोळा करणारा होता, ही गोष्ट आमच्या सरकारास पूर्णपणें विदित झाली होती. कान्स्टांटिनोपल येथें फ्रेंच व रशियन सरकारें खलबतें करण्यांत गुंतलीं होतीं, ही गोष्ट वुइलहेल्मस्ट्रासीला माहीत होती. याकरतां अबदुल्ला हा बालनिऑ बाईच्या घरीं जात असतो कीं काय याची चवकशी करण्यास मीं किमला सांगितलें. तसेंच तो बरोबर कोणत्या वेळीं येतो व प्रत्येक खेपेस तेथें किती वेळ रहातो याचीहि माहिती त्याला मिळविण्यास सांगितलें. अबदुल्लाची आणि या स्त्रीची भेट चार चौघांदेखत अनेक वेळां होत असल्याचें मीं समक्ष पाहिलें होतें;

पण एवढ्यानेंच तिचा व त्याचा कांहीं अंतस्थ राजकीय संबंध आहे कीं काय, हें ठरविणें शक्य नव्हतें. असल्या प्रकारच्या स्त्रियांच्या घरीं लष्करी अम्मलदारांचा आणि सरदार घराण्यांतील तरुणांचा घोळका नेहमींच जमावयाचा. या स्त्रियांच्या कार्यक्रमांतला हा एक भागच आहे. तरुण लष्करी अम्मलदारांस आणि मुलकी कामदारास भुरळ घालून घेरावयाचे, त्यांना आपल्या भोंवतीं नाचावयाला लावावयाचे, त्यांच्या पैशाची चादरात उडवावयाची आणि मग आपल्या हातातले हुकुमाचे पान बाहेर काढावयाचें असा या स्त्रियांचा ठरीव कार्यक्रम आहे. तुर्की लष्करी अम्मलदार या स्त्रियांच्या नादीं लागून जो पैसा उधळीत, तो त्यांच्या पगारापेक्षां कितीतरी पटीने अधिक असे असे माझ्या लक्षात आले. भारी भारी किमतीचे हिऱ्यामाणकांचे दागिने खरेदी करताना त्यांना यत्किंचितहि दिक्कत वाटत नसे. मोटार गाड्यांची खरेदी करतांना लागतील तितके पैसे ते डोळे मिटून देत असत असल्या मूर्खपणाच्या उधळपट्टीचा परिणाम काय व्हावयाचा हे उघडच होते. अशा स्थितींत हे अम्मलदार लवकरच कर्जांत बुडून जावयाचे, हे उघड होय. असल्या कर्जबाजारी अम्मलदारांना दोन मार्ग खुले असतात. एक तर त्याने आपल्या कर्जाची फेड तावडतोब केली पाहिजे, अथवा एखाद्या जंगली भागांत स्वतःची बदली करून घेतली पाहिजे. पण कान्स्टान्टिनोपलच्या चैनी भोगण्यास चटावलेले तुर्की अम्मलदार तें शहर कसचे सोडणार ? देशांतल्या मागासलेल्या जंगली मुलखांत जाण्यापेक्षां आत्महत्त्या करणे सुद्धां तो पत्करील. अशा स्थितींत त्यांच्या कर्जाची फेड या स्त्रिया करतात आणि त्याचा मोबदला ह्मणून महत्त्वाच्या बातम्या त्यांजकडून घेतात.

या स्त्रियांच्या भोंवतीं अशा प्रकारच्या अम्मलदारांचा जो घोळका असतो, त्यापैकीं अबदुल्ला हाहि एक असण्याचा संभव होता. माझ्या सांगीप्रमाणें बालनिऑबाईच्या घरांत किमनें प्रवेश केला आणि मला जरूर असलेली सारी माहितीहि त्यानें लवकरच मिळविली. बालनिऑबाईच्य काळ्या नौकरांनीं कांहीं पत्रें आणि कागदांचीं दुसरीं कांहीं चिटोरीं चोरून किमला आणून दिलीं होतीं. याशिवाय अबदुल्लाचीं व

तिच्यीं जीं कांहीं संभाषणें होत, त्यांतील कांहीं या नौकरांनीं आडून ऐकलीं आणि त्यांचा गोषवारा त्यांनीं किमला सांगितला. हे सारें भांडवल किमनें माझ्या स्वाधीन केलें आणि तें तपासून पहातां, या साऱ्या नाटकाचा आद्य सूत्रधारच माझ्या हातीं लागला आहे, असे मला आढळून आलें. पहिल्याच खेपेला एवढें मोठें सावज हातीं लागलें, ही गोष्ट खरोखर माझ्या चांगल्या नशिबानेंच घडविली असें म्हटले पाहिजे. तसेंच या बाईला प्रत्यक्ष घेरणें अशक्य आहे, हेंहि मला आढळून आलें. लांच देऊन किंवा धाकदपटशा दाखवून ती बाई वश होण्यासारखी नव्हती. ही जो पैसा येथें खर्च करीत असे, तो कोठून येतो, याची माहिती मिळविणें मला अवश्य होते ती माहिती खुद्द तिच्याकडून मिळविणें अशक्य होतें.

तिच्या भोंवतीं जमणाऱ्या दोस्तभगतांतून आपल्या जाळ्यांत सांपडण्यासारखा कोण आहे, याचा शोध मीं करूं लागलों. सडपातळ आणि गोड चेहऱ्याची व काळ्या केसांची अशी एक तारुण्यानें मुसमुसलेली छोकरी तिच्याबरोबर नित्य जातां येतांना मी पहात असें. एका सार्वजनिक नाचखान्यांत ती नाचतहि असे. सिसिलिया कोर्सान असें तिचें नांव असल्याचें मला समजलें. त्या नाचखान्यांत नित्य जाण्याचा परिपाठ मीं सुरू केला. तेथें शेंकडों तुर्की लष्करी अम्मलदारहि येत असत. आपल्या सौंदर्यानें लोक मोहून जातात, या गोष्टीचा तिला फारसा आनंद झाल्याचें दिसत नसे. लोकांनीं टाळ्या वाजविल्या ह्मणजे ती नुसत्या यंत्राप्रमाणें मान हालवीत असे.

युरोपांत जे नाचखाने आहेत, त्यांहून तुर्की नाचखान्यांची पद्धत अगदीं वेगळी आहे. येथील पद्धतींत पौर्वात्यपणा अधिक दिसतो. हे नाचखाने बहुधा उघड्या जागीं असतात. एकादें मोठें अंगण आणि त्यावर स्मर्नाचा बिनमोल गालीच्या अंथरलेला अशा जागेची कल्पना तुह्मीं केली ह्मणजे तुर्की नाचखाना बरोबर तुमच्या ध्यानांत येईल. आजुबाजूला रेशमी गादीच्या खुर्च्या घालून खुद्द तेथल्या अशा नर्तकी बसलेल्या असतात. याचे निम्मे चेहरे बुरख्यानें झाकलेले असावयाचे; पण झिरझिरीत दमास्कसच्या जाळींतून एकंदर शरीराचा देखावा मुग्ध रीतीनें नजरेस पडावयाचा. यूरोपियन

नर्तकी थेट प्यारीसच्या पोशाकांत असावयाच्या. आजुबाजूला संगमरवरी टेबलें असून त्यांजवर सुंदर हुक्का ठेवलेला असावयाचा. जवळच एकाद्या खुर्चीवर एकादी यूरोपियन युवती रेजीचे (कागदी विडी) फुत्कार सोडीत असली, तर दुसऱ्या बाजूला एकादा ' बे ' एकादा ' पाशा ' किंवा एकादा ' एफेंडी ' सुवासिक धुराचे लोट सोडतांना आढळावयाचा. लष्करी अम्मलदार आपले तांबडे, निळे आणि सुवर्णरेखांकित लष्करी पोषाक चढवून यावयाचे. एकादा सहा फूट उंचीचा आल्बेनियांतला सरदार रेशमी पायजमा पेहरून व सोन्याच्या अथवा चांदीच्या मुठीचा जंबिया किंवा तसल्याच मुठीचें एकादें पिस्तुल कम्बरपट्ट्यांत खोवून आलेला असावयाचा. हे सारे चित्र पाहिलें, ह्मणजे एकाद्या शहाजाद्याच्या बैठकीचीच आठवण व्हावयाची.

वर सांगितलेल्या या सुंदर परीवर स्तुतीचा वर्षाव जिकडून तिकडून होत होता; पण मी मात्र दगडासारखा तटस्थ बसून राहिलों. असें करण्यांत माझा एक उद्देश होता. तिचें लक्ष आपणाकडे वेधावें ह्मणून इतरांबरोबर न मिसळतां अशा प्रकारची एखाद्या इंग्रजाला साजेशी तटस्थवृत्ति मीं धारण केली. माझी ही गोळी बरोबर लागू पडली. माझी मुग्धता तिला अर्थातच पहावली नाहीं.

एके रात्रीं ती माझ्या टेबलाजवळ आली आणि फ्रेंच भाषेंत तिनें मला एक प्रश्न विचारला. मीं नुसतें हंसून तिच्याकडें पाहिलें आणि फ्रेंच भाषा मला समजत नाहीं, असें मीं दर्शविलें. त्यानंतर तिनें मोडक्यातोडक्या जर्मन भाषेत कांहीं वाक्यें उच्चारलीं; पण या वेळींहि मीं आपली अजाणपणाची मुद्रा कायमच्च ठेवली होती. अखेरीस ती झोंकदार इंग्रजी भाषेत बोलूं लागली आणि त्या वेळीं मीं तिला प्रत्युत्तर दिलें. इंग्रजी भाषा ती फार चांगल्या रीतीनें बोलत असे. लंडन येथील एम्पायर थिएटरांत ती मुख्य गाणारणीचें काम करीत असे, असें मला शेवटीं कळलें. आमची ओळख हळुहळू अधिक दाट होत चालली. एके रात्रीं सिसेलिया फार उदासवाणी दिसत होती. त्या दिवशीं बालानिऑवाईबरोबर तिचें भांडण झालें होतें. माझ्या मुख्य कार्याचें घोडें मी हळुहळू पुढें दामटीत होतों.

त्या दिवशीं सुद्धां मी कांहीं प्रश्न तिला विचारीत होतों, इतक्यांत एक तुर्की लष्करी अम्मलदार आमच्या जवळ आला. त्याच्या तोंडांतून कोन्याकदारूचे वाफारे एकसारखे बाहेर पडत होते. त्यानें सिसेलियावर उद्धट फ्रेंच भाषेंत कांहीं टीका केली. एका गोऱ्या स्त्रीचा अशा रीतीनें उपमर्द होत असलेला पाहून माझें चित्त खवळलें. फ्रेंच भाषेंतच मीं त्याची कानउघाडणी केली. मला फ्रेंच अवगत नसल्याचा बहाणा मीं पूर्वी केला होता; पण संतापाच्या भरांत मी ही गोष्ट साफ विसरलों. माझ्या दरडावणीनें मियासाहेबांची स्वारी तेथून निघून गेली. तो अम्मलदार निघून गेल्यानंतर मीं सिसेलियाकडे पाहिलें, तों तिच्या मुद्रेवर चमत्कारिक हास्याची लकेर झळकत होती, असें मला आढळून आलें.

ती म्हणाली, " तुम्हांला फ्रेंच भाषा येत नव्हती नव्हे का ? तुह्मांला तर थेट प्यारीसची भाषा बोलतां येते असें दिसते! "

तिचें हें भाषण ऐकून माझी मूर्खपणाची घोडचूक माझ्या लक्षांत आली. माझा चेहरा किती मेषपात्र बनला असेल, याची तुह्मीच कल्पना करा. आमचें भाषण पुन्हां सुरू झालें, तेव्हां सिसेलिया ह्मणाली, " मला आज या बैठकीचा अगदीं कंटाळा आला आहे, गाडींतून जरा फिरावयाला तरी चला. "

मीं एक गाडी बोलावली आणि आम्ही दोघें आंत बसून आमची गाडी चालू झाल्यावर मी म्हणालों, " सध्यांचा आयुष्यक्रम तुला आवडतो का ? आतांच्यासारख्या अम्मलदाराशीं नेहमीं प्रसंग येणें, हें कांहीं खरोखर फारसें सुखाचें नसेल. "

सिसेलिया ह्मणाली, " आतां या गोष्टी माझ्या आंगवळणीं पडत चालल्या आहेत. एखाद्या इंग्रज लठ्ठयापेक्षां किंवा जर्मन धटिंगणापेक्षां तुर्की डुक्कर कांहीं अधिक वाईट नाहीं. " हे शब्द बोलतांना आंतून तिला आपला जीवनक्रम कष्टमय वाटत होता, असें माझ्या ध्यानांत आल्याशिवाय राहिलें नाहीं.

कोणतीहि स्त्री कितीहि बहकलेली असली, तरी तिच्या अंतरंगाचा ओढा सभ्यपणाकडे स्वाभाविक असतो. ही गोष्ट पुष्कळ धटिंगणांच्या

लक्षांत येत नाहीं. हस्थी बाण्याचे आचरण आणि सभ्यपणाच्या चालीरीती यांची छाप अगदीं बहकलेल्या स्त्रीवर देखील बसल्यावांचून रहात नाहीं. उघडपणें वेश्येचा धंदा करणाऱ्या स्त्रीला हा प्रसंग केवळ नाविन्यामुळेंच मजेचा वाटतो. तिच्या कानावर सदोदित घाणेरडी भाषा पडत असते, यामुळें सभ्यतेच भाषण केवळ नाविन्यामुळेंच तिला मनोहर वाटतें. एकादी गृहस्थाश्रमी स्त्री दुराचारी निघाली, तर उलटपक्षीं एकाद्या धटिंगणाची छाप तिच्यावर पडावयाची.

यानंतर नाचखान्यांतलें सिसेलियाचें काम आटोपल्यानंतर तिला बरोबर घेऊन गाडींतून फिरावयाला जाण्याचा पाठ मीं ठेवला. पुष्कळ तुर्की अम्मलदार यामुळें माझ्यावर जळफळत असत; पण मीं त्यांच्याकडे बिलकूल लक्ष दिलें नाहीं. गाडींत हळुहळू प्रश्न करून कांहीं बारीकसारीक माहिती मीं तिच्याकडून मिळविली. तिनें दिलेल्या माहितीशीं किमची हकीकत मी जुळवून पहात असे. नाचखान्यांतून जी थोडीबहुत प्राप्ती तिला होत असे, तेवढ्याच पैशाच्या आशेनें तुर्की अम्मलदारांचीं गलिच्छ भाषणें सोसून ती कान्स्टाटिनोपल येथें रहात नव्हती, हें माझ्या सहज लक्षात आलें. या संधीला मीं आपल्या नाटकाच्या पहिल्या अंकाचा पडदा पाडून दुसऱ्या अंकास सुरुवात केली. मी नाचखान्यांत जाण्याचें एकदम बंद केले. यामुळे सिसेलिया हिला अधिकच उदासवाणे वाटूं लागलें.

एके दिवशीं दुपारीं तिनें मला बोलावणें पाठविलें. तिच्या घरीं जो थोडासा मजेचा प्रकार झाला, त्याचा माझ्या नौकरीशीं कांहीं संबंध नाहीं; तथापि त्यांतहि एक करुण कहाणी वाचकांस कळून येईल. तिनें सर्व बाधाबांधी केली होती, असें मला आढळून आले. ती ह्मणाली, " आतांशा तुह्मी नाचखान्यांत मुळींच आलां नाहीं, असें कां ? "

" इस्पितळांत सध्यां मला इतकें काम पडतें कीं मान वर करण्यास देखील मला फुरसत नाहीं. "

थोडा वेळ थांबवून ती ह्मणाली, " आज मी प्यारीसला निघून जातें. * * * मग—

" अरेरे, मला फार वाईट वाटतें. "

" एवढें म्हटलें, ह्मणजे झालें का सगळें ? "

" लाडके, अधिक बोलण्यांत फायदा तरी काय ? त्यामुळें आपणां दोघांचें दुःख वाढेल मात्र. "

" पण मी ह्मणतें, दुःख होण्याला जागा तरी कशाला ठेवावी ? माझ्या बरोबर आपणहि प्यारीसला आलां, तर नाहीं का चांगलें होणार ?"

तिनें हंसत हंसत पण मोठ्या तोऱ्यानें माझ्याकडे पाहिलें. मीं म्हटलें, " लाडके, मी कांहीं लखपतीचा बेटा नाहीं. मग उगीच टिवल्याबावल्या करीत मुलुखभर फिरत राहणें, मला कसें साधेल ? त्याशिवाय, ज्या कामासाठीं मी येथें आलों आहें, तें करावयाला नको काय ? आणखी एक महिना तरी या इस्पितळांतून माझी सुटका होणार नाहीं. "

सिसेलिया अगदीं नाखुष झालेली दिसली. ती माझ्याकडे निरखून पाहूं लागली. तिच्या वृत्तींत एकाएकीं बदल झाल्यासारखें दिसलें. ती माझ्याकडे इतक्या बारीक दृष्टीनें पहात होती कीं, जणू काय तिनें माझें परीक्षणच चालविलें होतें. थोड्या वेळानें ती ह्मणाली, " फ्रान्झ, तुमच्या सारख्या मनुष्यानें असल्या भिकार कामांत आपलें आयुष्य फुकट घालवावें, हें मला बरें दिसत नाहीं. तुमचें जगाविषयींचें ज्ञान आणि तुह्मांला असलेली मनुष्याची पारख यांचा याहून अधिक उपयोग तुह्मांला करतां येण्यासारखा आहे. तुमची विद्वत्ता आणि तुह्मी केलेला प्रवास यांचा उपयोग प्यारीस येथल्या आमच्या कांहीं लोकांस फारच चांगला होईल. "

ती कोणत्या उद्देशानें बोलत होती, हें माझ्या लक्षांत आलें; तथापि तिच्या ह्मणण्याचा भावार्थ मला कांहींच समजला नाहीं, अशी मुद्रा मीं धारण केली. तेव्हां तिने तो भावार्थ मला थोडक्यांत स्पष्टपणें सांगितला. फ्रान्सच्या हेरखात्यांत ती मला ओढूं पहात होती. मनातल्या मनांत मला इतकें हंसूं लोटत होतें कीं, तें दाबून टाकण्यासाठीं मला भगीरथ प्रयास पडले. ' हेरखातें ह्मणजे काय ? ' असा प्रश्न मीं तिला गंभीर मुद्रेनें केला. तेव्हां तिला प्यारीसहून जीं पत्रें आलीं होतीं तीं मोठ्या

डौलानें तिनें माझ्यापुढें टाकली. त्या पत्राच्याखालीं असलेल्या सह्या आणि वरील पत्ते हीं पाहून फ्रान्सांतील सूत्रधारांची माहिती मला बरोबर कळली. बालनिऑ बाईसारख्या बाजार बसव्यांचा उपयोग करून जर्मनीचें महत्त्व कमी करण्याचा उद्योग कोण करीत होते, हें मला बरोबर समजलें. बालनिऑबाईनें मिळविलेली माहिती फ्रेंच सरकाराकडे पाठविण्यांत सिसेलिया फक्त मध्यस्थीचें काम करीत होती, असें मला कळलें. फ्रान्सच्या हेरखात्यांत शिरण्याची आपली तयारी आहे, असें दर्शवून आणखी कित्येक प्रश्न मीं तिला विचारिले. विशेषतः माझ्या पगारासबंधीं मी फार कसून चौकशी करतों, असें दाखविलें. प्यारीसमधले " तिचे मित्र " मला भक्कम पगार देतील कीं नाहीं, असें मी विचारतां ती ह्मणाली, " त्याची नको तुह्मांला काळजी; तुह्मांला पगार भरपूर मिळेल. तुह्मी माझ्याबरोबर प्यारीसला चला तर खरे ! "

मीं तिला ह्मटलें, " इस्पितळांतलें माझें काम संपल्याशिवाय मला येथून हालतां येणार नाहीं; पण तें झाल्याबरोबर मात्र मी खास येईन. " अशा रीतीनें आमचा करारमदार झाल्यानतर तिचीं कांहीं पत्रें आलीं, तर तीं घेऊन तिच्या पत्त्यावर मी तीं परत पाठवावीत असेंहि ठरलें. या कराराप्रमाणें तिचीं पत्रें मीं रवाना केलीं—पण तीं बर्लिनला !

माझ्या अनेक प्रकारच्या कामगिरींत ज्या गोष्टी मला कराव्या लागल्या त्यांपैकीं ही एक गोष्ट केवळ माझ्या मनाजोगी घडली, असें नाहीं. स्त्रीजातीशीं असलें वर्तन करणें, हें माझ्या मतें अश्लाध्य होय; पण सिसेलिया ही कोणत्या धंद्यांत गुंतली होती, याचाहि विचार केला पाहिजे. ती दुसऱ्या एका प्रतिपक्षी सरकारच्या हेरखात्यांतील नौकर होती. तिच्या आणि माझ्या बुद्धीचा येथें सामना लागला होता. याकरतां प्रस्तुत प्रसंगीं तरी, माझें वर्तन अक्षम्य होतें असें ह्मणण्याचें कारण नाहीं. किमानपक्षीं या विचारानें माझ्या बुद्धीचें तरी मीं समाधान करून घेतलें.

तीन वर्षानंतर अँटवर्प येथील एका भिकार सुखशांतिगृहांत या छोकरीला पुन्हां मीं पाहिलें. त्या वेळीं ती नौकरींतून वजा झालेली होती. कान्स्टांटिनोपल येथें तिनें जो मूर्खपणा केला, त्याचेंच प्रायश्चित्त बहुध

ती भोगीत असावी. तिनें मला ओळखलें नाहीं; पण त्या बिचारीची हीन दशा लक्षांत आणून मीं तिला गुप्तपणें तीनशे रुपयांची रक्कम पाठविली. माझ्यामुळें तिला जी दशा भोगावी लागत होती तिचें अंशतः परिमार्जन मीं अशा रीतीनें केलें.

अशा रीतीनें कान्स्टान्टिनोपल येथें होणाऱ्या नाटकांतील फ्रेंच सूत्रधारांचा शोध लागल्यानंतर मीं सामान्य तुर्की अंमलदारांशीं हळूहळू स्नेह संपादूं लागलों. त्यांच्या विचारांचा रोंख कोणत्या दिशेनें वाहतो, याचें सूक्ष्म निरीक्षण मीं चालविलें. कित्येक अमलदार, व्यापारी, मुत्सद्दी आणि विद्यार्थी याच्या भेटीला जाण्याचा पाठ मीं ठेवला. जनानखान्यांत बसून सूत्रें चालविणाऱ्या असल्या प्रकारच्या लोकांच्या पाताळयंत्राचा सर्वांना अगदीं वीट येऊन गेला होता, असें मला आढळून आल. तरुण तुर्क अगदीं बेदील झाला होता. राज्यक्रांति घडवून आणण्यास ही अगदीं सोन्यासारखी संधी होती असें मला आढळून आलें. मीं आपला रिपोर्ट सादर करताना या राज्यक्रांतीची कुंडलीहि त्यांत बरोबर वर्तविली होती. अनवरबेकडे विशेष लक्ष पुरविण्याबद्दल त्यांत मीं सुचविलें होतें. या गृहस्थानें त्या वेळीं सुद्धां आपली चांगली छाप बसविली होती. मुख्य वजिराला त्याची फार भीति वाटूं लागली होती. याचकरतां म्यासिडोनियांतल्या एका आडबाजूच्या जागेवर या तरुण तुर्कास वजिरानें रवाना केलें होतें. कान्स्टान्टिनोपलमध्यें त्याला दृष्टिआड करण्यांत आलें, तरी तरुण तुर्कांवरची त्याची छाप कमी झाली नाहीं, असें मला आढळून आलें. या वेळीं तुर्की लष्कराला शिक्षण देण्यासाठीं फाँ डर गोल्ड्झ् हे जर्मन अम्मलदार होते. यांचेहि रिपोर्ट बर्लिनला जात असत. त्यांच्या आणि माझ्या रिपोर्टाच्या अनुसंधानानें जर्मनींतल्या परराष्ट्रखात्यानें आपल्या कारस्थानाची दिशा नक्की केली असावी, यांत शंका नाहीं. सुलतान अबदुल हमीद हे केवळ बाहुल्यासारखे होते, याबद्दल माझी पक्की खात्री झाली होती. रशियन आणि फ्रेंच सोन्याची मोजदाद करतां करतां मुख्य वजिराचे हात पिंवळे होऊन गेले होते. यामुळें जर्मनीचें महत्त्व कमी होईल अशाच रस्त्यानें त्यानें आपल्या राज्यकारभाराचा गाडा चाल-

विला होता. फ्रान्स आणि रशियाचा पगार खाणाऱ्या बाजारबसव्या तुर्की अम्मलदारांचीं घरें पोंखरीत होत्या. या सर्व गोष्टींचा उल्लेख मीं आपल्या रिपोर्टांत केला होता. अशा रीतीनें कान्स्टान्टिनोपल येथें चार महिने कालक्रमणा करून अ.. .ि .ां.ी. स्वारी बर्लिनला सुखरूपपणें परत येती झाली.

माझ्या कामगिरीचें राजकीय महत्त्व काय होतें, हें लक्षांत येण्यासाठी त्यावेळच्या राजकीय परिस्थितीचें थोडेसें सिंहावलोकन करणें जरूर आहे. रशियाचें प्रस्थ माजून त्याचा उपसर्ग आपणास लागूं नये, ह्मणून तुर्की राष्ट्राचा स्नेह संपादन करावयाचा व त्याच्या द्वारें रशियाच्या वाढीस आळा घालावयाचा या राजनीतीचा उपक्रम बिस्मार्क यानीं जर्मनीमध्यें केला. तुर्कांच्या स्नेहभावानें इष्टकार्यसिद्धि कशी काय होईल, हें वाचकांस समजेलच. क्याप्रीव्ही यांच्या दिवाणगिरींत तुर्की व जर्मनराष्ट्रांतील स्नेहभावास थोडेंसें शैथिल्य आलें होते. असें शैथिल्य आपणास हितावह नाहीं ही गोष्ट दुसऱ्या वुइल्यिम बादशहासारख्या दूरदृष्टीच्या व तीक्ष्ण-नजरेच्या मुत्सद्याच्या लक्षात आल्यावाचून राहिली नाहीं, आणि तें शैथिल्य दूर करण्याचा यत्न त्यानें केला. आपल्या नेहमींच्या डामडौली पद्धतीस अनुसरून राणीसह या बादशहाची स्वारी प्यालेस्टाईनमध्यें गेली. जातां जातां वाटेंत सुलतानाचीहि भेट त्यानीं घेतली. महमदी देशांतून त्यांचें स्वागत केवढ्या अपूर्व उत्साहानें करण्यात आलें, ही गोष्ट सर्व-विश्रुत आहेच. जर्मनबादशहानें प्यालेस्टाईनमध्यें अशा रीतीनें केलेली स्वारी हा राजनीतीचा एक अपूर्व मासला होय. बादशहाच्या वर्तनासंबंधी त्या वेळीं पुष्कळशा कडक टीका झाल्या; पण बादशहाच्या इष्टकार्याची सिद्धीहि त्याच स्वारीमुळें झाली ही गोष्ट विसरतां कामा नये.

प्यालेस्टाईनमध्यें केसरची स्वारी जाण्याच्या अगोदर सर्व महमदी राष्ट्रांचें पालकत्व आपणाकडे आहे, असें फ्रान्स म्हणत असे; पण या स्वारी-नंतर हा मनु हळूहळू बदलूं लागला. केसरच्या भेटीनंतर वुइलहेल्मस्ट्रासी आणि सबलाईम पोर्टी यांजमध्यें उपस्थित होणाऱ्या प्रश्नांचा खल अधिक सलोख्यानें होऊं लागला. या राष्ट्रांचें परस्पर दळणवळण वाढतां वाढतां

त्याला स्नेहाचें स्वरूप येऊं लागलें. दारूगोळा, तोफा वगैरे मालाची खरेदी जर्मनींतून मोठ्या प्रमाणावर होऊं लागली. याशिवाय दुसऱ्याहि अनेक प्रकारच्या जर्मन मालाला महंमदी राष्ट्रांतून मोठ्या प्रमाणावर मागणी सुरू झाली, हें त्यांच्यामधील स्नेहभावाचें द्योतक होतें.

जर्मनीचा हा उत्कर्ष फ्रान्स आणि रशिया यांच्या डोळ्यांत तावडतोब आला. या दोघाना जर्मनीबद्दल फारसें प्रेम कधींच नव्हतें. या प्रसंगीं इंग्लंड मात्र या घोटाळ्यांतून अगदीं अलिप्त राहिलें. तुर्कस्थानांत रशियाचा हात शिरू नये याकरतां इंग्लंडनें क्रिमियन युद्धांत पाण्यासारखा पैसा खर्चून पुष्कळशी जीवहानीहि करून घेतली होती. रूसोफ्रेंच जोडीला तुर्कस्थानांत ढवळाढवळ करण्याची संधि मिळाली ही गोष्ट इंग्लंडला अनिष्ट वाटत होती. आतां डॉर्डानेल्सचें अधिराज्य जर्मनी किंवा फ्रान्स यांच्या हातांत जाणें इंग्लंडला कितपत रुचतें, हें पुढें पहाणें आहे. रशियासंबंधीं पाहतां या डार्डानेलीसबद्दल कथाथेराईन राणीच्या वेळेपासून एकसारखे रक्तपातच होत आले आहेत. अनेक प्रकारचीं गुप्त खलबतें आणि पाताळयंत्रें इस्तंबूल येथें अद्यापिहि अहर्निश चालू आहेत. तुर्कस्थान आणि आशिआमायनर यांजमधील रशियाचें वजन हळुहळू पण अव्याहत रीतीनें जर्मनी कमी करीत चालला आहे. रूसोजपानी युद्धांत रशियाचा खुर्दा झाल्यानंतर बाल्कनसंघ निर्माण करून त्या द्वारें आपलें महत्त्व वाढवावें याकारितां रशियानें जिवापाड खटपट केली आहे; पण यासंबंधीं अधिक माहिती पुढें कळेल.

या भानगडींत जे कांहीं प्रश्न उपस्थित होतात, त्यांत जर्मनी आणि ऑस्ट्रिया यांचें संगनमत झालें आहे. जर्मनीच्या या बाजूच्या उलाढाल्यांत ऑस्ट्रियाचें नेहमींच अंग असतें, असें म्हणण्यास हरकत नाहीं. तुर्कस्थानात मुख्य सूत्रधार कोण आणि नुसतीं बाहुलीं कोण आहेत, याचा शोध आपल्या हेरखात्याच्या द्वारें जर्मनीनें लावला. रूसोफ्रेंच जोड गोळीचें वजन इस्तंबूल येथें वाढत आहे, ही गोष्ट जर्मनीला कळून चुकली. तरुण तुर्कांच्या दृष्टीनें मूर्ख असा भासणारा सुलतान अबदुल हमीद मुख्य वजिराच्या ओंजळीनें पाणी पीत असे, ही गोष्ट जर्मनीनें

जाणली. असल्या सुलतानाच्या नादीं लागण्यांत फायदा नाहीं, हें जाणून जर्मनीनें आपल्या पुढील डावाची रचना करण्यास सुरवात केली. इस्तंबूल येथें ' मुले कुठारः ' या मार्गाचें अवलंबन करण्याची संधि येऊन पोहोचली आहे, हें जाणून जर्मनीनें ती कुऱ्हाड पाजळण्यास सुरवात केली. परिणामः-राज्यक्रांति. तरुण तुर्कांच्या हातांत सगळी सत्ता आली. या गडबडींत जर्मन शिक्षणांत मुरलेले असे अनवर बे, टचुफिक पाशा, इब्राहिम मांदर बे आणि तसेच इतर लोक यांच्या हातांत राज्याचीं सूत्रें गेलीं. तुर्कस्थानांत विस्कटलेली आपली घडी जर्मनीनें पुनः बसविली. आजमितीला तुर्कस्थानांत जर्मनीचें प्रस्थ विलक्षण वाढलें आहे ही गोष्ट खरी आहे. युरोपांतील एकंदर राज्यकारणांत या परिस्थितीचा काय परिणाम होणार, याचा विचार मी पुढें एकादे वेळीं करीन.

---

## प्रकरण पांचवें.

## ग्रँडड्यूकचें पत्र.

इस्तंबूलहून परत आल्यानंतर आणखीहि कांहीं भानगडीच्या कामगिऱ्यांवर माझी नेमणूक झाली होती. त्याच्या दगदगीनें मी अगदीं त्रासून गेलों होतों. बोअर युद्धांत माझ्या फुप्फुसाला गोळी लागली होती, तिचा त्रास मला आतां जाणवूं लागला. रक्तस्राव होण्यास सुरवात झाली. थंडीवाऱ्यातून एकसारखें हिंडावें लागल्यामुळें माझी प्रकृति अगदीं ढांसळून गेली. शेवटीं बर्लिन येथील सुप्रसिद्ध वैद्य प्रो. बेअर यांची सल्ला मीं घेतली. एक महिनाभर पूर्ण विश्रांति घेऊन त्या अवधींत देवदाराचीं झाडें पुष्कळ असतील अशा एखाद्या भागांत रहाण्याची शिफारस त्यांनीं केली.

नार्वे आणि जर्मनी या देशांत देवदारूंच्या अरण्यांना कांहीं तोटा नाहीं, आणि या दोन देशांत माझे स्नेही सोबतीहि पुष्कळ होते. यांच्यापैकीं कोणीहि माझी सोय मोठ्या आनंदानें केली असती; पण मला अगदीं

एकांत हवा असल्यामुळें या सोयीचा फायदा मीं घेतला नाहीं. रहातांपैकीं दोन स्नेही मला आठवले. यांच्या घरीं मात्र मन मानेल तसें वागण्याची मला मुभा मिळण्यासारखी होती. यांपैकीं एक गृहस्थ हंगेरींत रहात होते; पण तें ठिकाण फार लांबचें पडलें. दुसरा स्नेही फर्स्टेनवाल येथें रहात होता. हें गांव बर्लिनपासून तीस बत्तीस मैलावर आहे. हें ठिकाण मला फार पसंत पडलें. बर्लिनला जवळच्या जवळ असून अगदीं एकी-कडे असें गांव आहे. याच्या आजुबाजूला देवदारूंचें दाट जंगल आहे. या सर्व कारणांनीं मीं तेथेंच जाण्याचा बेत ठरविला.

येथें तीन आठवडे विश्रांतीचें आणि एकांताचें सुख मीं अनुभाविलें. या अवधींत मीं थोडीशी शिकारहि केली व मासे धरण्यासहि मी कधीं कधीं जात असें. तथापि एकाद्या मोठ्या देवदारूखालीं स्वस्थपणें लोळत पडण्यानच मी बहुतेक वेळ घालवीत असें. अशा रीतीनें अस्मादिकांची स्वारी आश्रमवासाचें व कंदफलाशनाचें सुख अनुभवीत असतां एके दिवशीं एक तांबड्या तोंडाचा आणि चपट्या नाकाचा पोष्टाचा शिपायी आमच्या समाधिभंगास कारण झाला. त्यानें एक पत्र आमच्या हातीं दिलें.

हें पत्र काउंट वेडेल यांच्याकडून आलें होतें.

" प्रिय ग्रेव्हज्,

" तुमची प्रकृति आतां चांगली सुधारली असेल, अशी मला आशा आहे. पुढील कामगिरीकडे तुम्ही लक्ष द्यावें, अशी मी विनंति करतों. मी हें तुह्मांला सरकारी नात्यानें फर्माविन नाहीं, हें विसरूं नका. तथापि या कामीं तुह्मांकडून जी मदत होईल, तिचा तुह्मांस चांगला फायदा होईल हें मात्र मी सुचवून ठेवतों. या कामगिरीचें थोडक्यांत स्वरूप असें. * * चे ग्रँडड्युक यांजकडून त्यांच्या एका खाजगी नाजुक कामांत आमची मदत मिळेल कीं काय अशी पृच्छा करण्यांत आली आहे. ही कामगिरी आमच्या सरकारच्या वहिवाटीस सोडून आहे ही गोष्ट खरी; तथापि इतर कारणांस्तव ग्रँडड्यूकची विनंति मान्य करावी असें आह्मांस वाटतें. कामगिरी फारच नाजुक आहे, तिच्यासाठीं इंग्लंडांत

जावें लागेल. याकरतां तुमची खुषी असेल, तर हा कार्यभाग तुमच्यावर सोंपवावा अशी योजना मीं केली आहे. तुमची कबुली असेल, तर खात्यांतून थोडे दिवस रजा मिळण्याची व्यवस्था केली जाईल. पुनः एकवार सांगतो कीं, हा कांहीं सरकारी हुकूम नाहीं; पण तो मान्य करण्यांत तुमचा फायदा आहे."

व्ही. वेडेल.

देवदारूवृक्षांच्या जंगलांत तीन आठवडे राहून माझी प्रकृति जितकी सुधारली, तितकी साऱ्या डॉक्तरांच्या औषधानेंहि सुधारली नसती. शिवाय खेड्यातल्या एकमार्गी आयुष्यक्रमाचा मलाहि कंटाळा आला होता. तशांतून माझा खिसाहि फारसा खुळखुळत नव्हता. तेव्हां त्यांतहि कांहीं भर टाकण्याची सोय मी पहात होतो. वेडेल यानीं सांगितलेली कामगिरी द्रव्यदृष्ट्या मला फायदेशीर होईल, असें त्या पत्रावरूनच दिसत होतें. कामगिरी माझ्या हातून होण्यासारखी असेल तर ती हातीं घेण्यास मजकडून आडकाठी नाहीं, असें उत्तर मीं वेडेल यांस लिहिलें. कामगिरी कसल्या प्रकारची असावी, याचा अदमास मला लागेना. प्रिन्स आणि ड्यूक असल्या बड्या घराण्यांच्या भानगडींत पडल्याने पुष्कळ वेळीं नुसता त्रास मात्र नफ्यादाखल पदरीं पडतो, हें मला माहीत होतें. मोठाल्या राजघराण्यांतल्या खाजगी भानगडींत पडण्यापेक्षा परकीय राष्ट्रांत राजकीय कामगिरीवर जाणें, कमी श्रमाचें आणि अधिक हितावह आहे असें माझें मत झालें आहे. असल्यांपैकीं एकाद्या भानगडीवर माझी योजना होत असावी, असा माझा तर्क होता.

आणखी दोन दिवसांनीं काउंट वेडेल यांजकडून दुसरें पत्र आलें. त्यांत एका ठरलेल्या दिवशीं * * गांवीं मी हजर व्हावें, असें त्यांनीं मला कळविलें होतें. माझ्या मित्रमंडळीचा निरोप घेऊन व त्यांनीं केलेल्या पाहुणचाराबद्दल आभार मानून ग्रँडड्यूक यांच्या गांवीं जाण्यासाठीं मी निघालों. मी गांवीं येऊन पोहोंचलों तेव्हां ड्यूकच्या तबेल्यांतील गाडी मला घेण्यासाठीं हजर होती. दोन हमालांनीं माझें सामानसुमान गाडींत टाकलें व ड्यूकसाहेबांच्या वाड्याकडे मी रवाना झालों. वाड्यांत शिरतांना



ग्रँड-ॲडमिरल फॉँ टिरपिट्झ.

गाडी दिल्ली दरवाज्याजवळ उभी न राहतां ती एका बाजूच्या लहानशा दाराजवळ जाऊन उभी राहिली. तेथें उतरून मी एका लहानशा खोलींत शिरलों. इतक्यांत एक शांत वृत्तीचा वयातीत व सभ्य चेहऱ्याचा असा गृहस्थ आंत आला. त्याचा चेहरा चिंताग्रस्त दिसत होता. वृद्ध ग्रँड ड्यूक ते हेच, हें मीं ताबडतोब ओळखिलें. ड्यूकने एक सबध मिनिटभर माझ्याकडे अगदीं निरखून पाहिले आणि नतर स्वतःशीं पुटपुटल्यासारखें करून ते म्हणाले.

" हा तर अगदीं बचा दिसतो. असो. त्यांनीं आपल्या खात्रीनेच पाठविला असेल. " मग खालीं पाहून व डोकें हालवून ते म्हणाले, " वखत तर मोठा कठीण आला आहे. काळ फारच वाईट. "

इतका वेळपर्यंत मी उभाच आहे, असें पाहून ड्यूकसाहेब एकदम म्हणाले, " बसा, बसा. ती खुर्ची घ्या. "

कसल्या प्रकारची कामगिरी ते मला सांगणार, तिचा उल्लेख त्यांनीं एकदम केला नाहीं. ते माझ्यापाशी इकडच्या तिकडच्या खाजगी गप्पा मारूं लागले. अशा गोष्टी चालतां चालतां शेवटीं मुद्याचा भाग निघाला. तेव्हां तो सांगून ते मला म्हणाले, " हे काम तुमच्यानें होईल का ? "

" माझ्या कामाचें नक्की स्वरूप माझ्या ध्यानांत येईपर्यंत मी खात्री-पूर्वक काहींच सांगू शकत नाही. माझ्या हातून तें होण्यासारखें नसल्यास स्पष्ट नकार देण्याची परवानगी मला असावी. " ही माझी अट त्यांनीं कबूल केली आणि पुनः एकवार माझ्याकडे निरखून पाहून ते बोलूं लागले.

" आमच्या घरांत एक फार त्रासदायक आणि भयंकर अशी भानगड उपस्थित झाली आहे. आमच्या गादीचा वारस आमचा पुतण्या इंग्लडां-तल्या एका स्त्रीच्या जाळ्यांत गुरफटून जखडला गेला आहे. त्याच्या मनां-तून तिच्याशीं लग्न करावयाचें आहे. तिचे घराणें फार मोठ्या दर्जाचें असल्यामुळें ही मागणी एकदम धुडकावून लावतां येत नाहीं, किंवा नुसत्या पैशानें तिला वळविणें शक्य नाहीं. आमच्या घराण्यांत तिचा प्रवेश होणें ही गोष्ट कांहीं कारणानें शक्य नाहीं. यांत काहीं राजकीय भानगड आहे,

असा भाग नाहीं; पण तें कारण माझ्या दृष्टीनें राजकीय स्वरूपाहूनाहि अधिक महत्त्वाचें आहे. याकरितां तिचा येथें प्रवेश होणें, ही गोष्ट कालत्रयींहि घडणें नाहीं. या लग्नाला माझी संमति नाहीं, असें तिला कळल्यापासून आम्हांला पेंचांत पाडण्याचा उपक्रम तिनें सुरू केला आहे. " हें बोलत असतां म्हाताऱ्याच्या डोळ्यांत विलक्षण तेज चमकत होतें. थोडा वेळ थांबून व डोळे अधिक विस्तृत करून म्हातारा पुढें बोलूं लागला. " आमच्या पुतण्यानें तिला जीं कांहीं पत्रें मूर्खपणानें धाडलीं आहेत, आणि दुसरे जे कागदपत्र तिच्या स्वाधीन केले आहेत, ते आम्हांला आतां बाधक होण्याचा संभव आहे. हे कागदपत्र परत माझ्या हातीं यावयास पाहिजेत. खर्च कितीहि झाला, तरी त्याची दिक्कत मला नाहीं. पैशासंबंधीं तुम्ही क्षणभरहि शंका मनांत आणूं नका. पुष्कळ वजनदार लोकांची भीड मीं तिच्याकडे घालून पाहिली, माझ्या पुतण्यालाहि मीं परोपरीनें सांगून पाहिलें; पण या साऱ्या खटपटीचें कांहीं सुद्धां फळ झालें नाहीं. ही कामगिरी कशी करावयाची, तें तुमचें तुम्ही पाहून घ्या; पण कांहीं झालें तरी, या गोष्टीचा बभ्रा लोकांत होतां कामा नये. तसेंच तिच्यावर जोर-जुलूमहि होता उपयोगी नाहीं. हें काम साधायला काय उपाय करावा हें मी तुम्हांला सांगूं शकत नाहीं. आतां सांगा पाहूं तुमच्यानें ही कामागिरी होईल का ? "

उगीच तोंडानें मोठ्या फुशारक्या माराव्या अशी संवय मला कधींच नव्हती. मीं उत्तर दिलें, " कामागिरीला निघाल्यानंतर तिला कांहीं विशेष स्वरूप प्राप्त येईपर्यंत, आपलें मत ठामपणें देणें मला बरें वाटत नाहीं. याकरितां मी आताच कांहीं निश्चितपणें सांगत नाहीं, याबद्दल सरकारांनीं मला क्षमा करावी. "

माझ्या ह्या उत्तरानें म्हाताऱ्याचें समाधान झाल्यासारखें दिसलें. शेवटीं उठतां उठतां ते म्हणाले, " मीं हें आतां सर्वस्वी तुमच्याकडे सोंपाविलें आहे. तुम्हांला जेव्हां कांहीं कळविण्यासारखें असेल, तेव्हां आमच्या खाजगी मंत्र्याकडे कळवीत जा. कांहीं मजकूर तारेनें कळवावयाचा असेल, तर ती व्यवस्था तुमच्या बर्लिनच्या अधिकाऱ्यामार्फत मी करीन. जरा

थांबा. आमचे चिटणीस तुमची भेट घेतील." खोलींतून बाहेर पडतां पडतां माझ्या खांद्यावर हात ठेवून ड्यूकसाहेब ह्मणाले, "आह्मांला या अडचणींतून तुह्मीं बाहेर काढलें, तर तुमचे श्रम कांहीं वायां जाणार नाहींत."

माझे श्रम वायां गेले नाहींत, हें सांगावयाला नकोच. ग्रँडड्यूक खोलींतून बाहेर निघून गेले. एक हुजऱ्या आंत आला, आणि एका भोजनाच्या खोलींत मला घेऊन गेला. त्या ठिकाणीं कांहीं खाण्याचे पदार्थ ठेवले होते. त्यांवर मींहि यथेच्छ ताव मारला. इतक्यांत ड्यूकसाहेबांचे एक चिटणीस आंत आले आणि ड्यूकचे सलाम सांगून एक बंद केलेले पाकीट त्यांनीं माझ्या हातांत दिलें. [illegible] ताबडतोब निघून [illegible] ड्यूकसाहेबांनीं विनति केली आहे, असेंहि ते ह्मणाले. त्याच रात्रीं निघून जाण्याचें आश्वासन सेक्रेटरीला देऊन मी बर्लिनला परत आलों. वुइलहेल्मस्ट्रासीमधील हर स्थ्यामर यांना टेलिफोननें बोलावून दोन महिन्यांची रजा मीं मागितली. त्याच रात्रीं लंडनला जाण्यासाठीं हालंड एक्सप्रेस गाडीनें मी रवाना झालों.

ग्रँडड्यूकचें पत्र उघडून पहातां प्रत्येकीं साडेसातशें रुपयांच्या तीन नोटा त्यांत होत्या, आणि त्यांशिवाय एका इंग्लिश ब्यांकेवर पांचशें पौंडांची हुंडी होती, असें मला आढळून आलें. आणखी पैसा लागल्यास त्याच ब्यांकेला तीन दिवस अगाऊ कळविलें असतां तजवीज केली जाईल, असें पत्रहि त्या पाकिटांत होतें. अशा रीतीनें लंडनमध्यें लागणाऱ्या सर्व खर्चाची तजवीज करण्यांत आली होती.

आपल्या नेहमीच्या शिरस्त्याला अनुसरून आपल्या कामगिरींतील सर्व गोष्टींचा तपशीलवार विचार मीं गाडींत केला. ती स्त्री उच्च दर्जाची होती. अर्थात् तिचे स्नेहीसोबतीहि बडे लोक असले पाहिजेत. तिच्या सोबतींतल्या लोकांशीं संघटन करण्याचा योग जुळवून आणला पाहिजे. लंडन शिवाय दुसऱ्या एकाद्या शहरीं, ही गोष्ट करणें फार जड गेलें असतें; पण लंडनची गोष्टच वेगळी. रुबाबदार चेहरा, चतुरस्रपणा आणि द्रव्यसंचय हीं ज्याच्या जवळ असतील अशा मनुष्याला लंडनच्या कोणत्याहि

दर्जाच्या लोकांत घुसणें फारसें कठिण नाहीं. ही गोष्ट करण्यास चातुर्य, चिकाटी आणि नाटकी बाणा हीं अवश्य पाहिजेत, हें सांगावयास नकोच. आपल्या कार्याला आरंभ करण्याकरितां पहिली भूमिका कोणत्या थाटाची सजवावी हेंच मला समजेना. याबद्दल मीं कोणताच निश्चय केला नव्हता. पुष्कळ वेळा अशा गोष्टी आगाऊ कांहींच ठरवितां येत नाहींत. वारा फिरेल तशी पाठ फिरविणें, हेच अशा स्थितींत फार उपयोगी पडते. लोकांत आपल्याबद्दल वाटाघाट कशी सुरू होईल, याचा विचार मी करूं लागलों. कोणत्या तरी रीतीनें स्वतःला लोकांच्या चर्चेचा विषय करणें, हें माझें पहिले कर्तव्य होतें. कसल्या तरी विक्षिप्तपणाबद्दल ज्याच्या त्याच्या तोंडीं माझें नांव होईल, अशी एकादी गोष्ट मला करावयाची होती. एकादा प्रवासी किंवा एकादा शिकारी अशा प्रकारच्या मनुष्याकडे ब्रिटिश स्त्रीपुरुषांचें लक्ष तावडतोब वेधतें. त्यांतून अशा मनुष्याच्या चाली-रीतींत किंवा एकाद्या सवयींत कांहीं विक्षिप्तपणा असला, तर मग बोलावयासच नको. अशा रीतीने लंडनांतील माझ्या वागणुकीची सामान्य रूपरेषा मीं आपल्या मनांत ठरवून टाकली आणि प्रत्यक्ष वागणूक कशी करावयाची याचा निश्चय तेथें गेल्यावर ठरवावा, असे मीं योजिले.

लंडनला गेल्यावर प्रथम कांहीं दिवस रसेल्स स्क्वेअर हाटेलमध्यें मीं काढले, आणि नतर लँगह्यॅम हॉटेलमध्ये गेलों. ह्या हॉटेलांत मोठमोठे अमीरउमराव आणि राजेरजवाडे उतरतात. येथें आल्यावर मीं आपल्या कामगिरीला हळुहळू सुरवात केली, लंडनांतील अमीरउमराव व श्रीमंत लोक यांच्या हालचालीच्या बातम्या ज्यांत दिलेल्या असतात, अशीं सगळीं वर्तमानपत्रें मीं विकत घेतलीं आणि अथपासून इतीपर्यंत मीं त्यांचें अध्ययन केलें. ज्या बाईसाहेबांशीं मित्रत्वाचें नातें मला जोडावयाचें होतें, त्यांचें हिंडणें फिरणें कोणत्या मंडळींत होत असे, याचा शोध मीं चालविला. हॉटेलांत असतां मीं कांहीं स्नेही जोडले होते. त्यांच्यापासून व वर्तमानपत्रांच्या बातमीदारांपासून मला इष्ट असलेली बातमी मी थोडी बहुत मिळवूं लागलों. सुदैवानें लंडनांत फ्याशनेबल लोकांचा भरणा होण्याचे हे दिवस होते. यामुळें हे सारे लोक सध्यां येथें जमत होते.

बाईसाहेबांच्या विशेष परिचयाचे सोबती कोण आहेत आणि त्यांच्या एकत्र होण्याच्या जागा कोणत्या, हें मीं शोधून काढलें. एवढी आगाऊ तयारी केल्या नंतर बाईसाहेब दिसण्यांत कशा आहेत, त्यांची चालरीत कशी आहे, व त्यांच्या आवडीनिवडी कशा प्रकारच्या आहेत, याचा शोध मीं चालविला घोड्यावर बसून रपेट करण्याकरितां हाइडपार्क बागेंत त्या रोज जात असतात असें मला कळलें. मीहि त्या बागेंतल्या घोडदौडीवर रोज दोन तास घोड्यावरून फेरफटका करण्याचें ठरविलें. पांचव्या दिवशीं सकाळीं माझ्या श्रमाचा मोबदला मला मिळाला. आपल्या कांहीं मित्र-मंडळीबरोबर बाईसाहेब घोड्यावर बसून जात असल्याचें मला आढळलें. दुसऱ्या दिवशीं सकाळीं त्याच वेळीं मी पुन्हां तेथें हजर झालों, आणि थोड्याच वेळांत त्याच मित्रमंडळीबरोबर बाईसाहेबांची स्वारीहि आली. या मंडळीचा ताफा बराच दूर गेल्यानतर मींहि आपला घोडा त्यांच्या मागोमाग पिटाळला. या मडळीचा घोडे बांधण्याचा तबेला मीं प्रथम दुरून पाहिला आणि ती मंडळी निघून गेल्यानंतर मींहि आपला मोर्चा तिकडे वळविला. त्या तबेल्यांत मीं कांहीं इकडे तिकडे चौकशी केली, त्यावरून ही मंडळी रोज त्याच वेळीं घोड्यावरून फेरफटका करीत असते, असें मला कळून आलें. यानंतर दररोज घोड्यावर बसून बाई-साहेबांच्या नजरेस पडावयाचे असा परिपाठ मीं ठेवला. घोड्यावर बसण्यात मी पटाइत आहें, असा अभिमान मला आहे. आस्ट्रेलियांत असतांना घोड्यावर बसून अनेक जंगलें मी भटकत फिरत असें. नाक चेचण्याचे आणि कांटेरी झुडपें तोंडावरून ओरखडले जाण्याचे अनेक प्रसंग मजवर आले आहेत. घोड्याला निरनिराळ्या चालीवर चालविण्याची कलाहि मला अवगत आहे. ही आमची कलाहि एक दोन वेळां मी बाईसाहे-बांच्या नजरेस पाडली. एवढ्यानेंच त्यांच्याशीं माझा परिचय होईल, अशांतला भाग नव्हता; पण कोणीकडून तरी माझ्याकडे त्यांचें लक्ष जाईल इतकीच गोष्ट मला कर्तव्य होती. अशा प्रकारच्या दृष्टिवेधानें पुढील कार्यास सौकर्य येत असतें, असा मानसशास्त्राचा एक सिद्धांत आहे. एकाद्या मनुष्याला तह्मी प्रत्यक्ष ओळखीत नसलां. तरी त्याचा

चेहरा रोजच्या रोज तुमच्या नजरेस पडत असला, तर अंतर्गत हेतूंचा एक सूक्ष्मतंतु तुह्मां दोघांमध्यें निर्माण होत असतो.

लंडनच्या फ्याशनेबल मंडळांत ज्या कांहीं विक्षिप्तपणाबद्दल गोष्टी शिरल्या आहेत, त्यांची आवड आमच्या बाईसाहेबांस व त्यांच्या मित्रमंडळीस असल्याचें मला कळून आलें. यांपैकीं, एका गोष्टिकडे माझें लक्ष विशेष वेधलें. रोज दुपारीं तीन आणि चार वाजण्याच्या दरम्यान स्ट्रॉबेरीचीं फळें खाण्याकरतां आमच्या बाईसाहेब आणि त्यांचें मित्रमंडळ सेव्हॉयहॉटेलमध्यें जात असे. मलाहि हीं फळें एकाएकीं फार आवडूं लागलीं आणि तीं खाण्याकरतां त्याच हॉटेलमध्ये त्याच वेळीं अस्मादिकांची स्वारी जाऊं लागली.

स्ट्रॉबेरीच्या मोसमांत सेव्हॉय हॉटेल हें मनुष्यरूपी फुलपांखरें आणि या फुलावरून त्या फुलावर उडणारे भुंगे यांचें निवासस्थान होऊन बसलेलें असतें. लंडनांतलें सारें सौंदर्य, सारी फयाशन आणि सारा आळस हीं सर्व येथें एकत्र जमत असतात. इंद्रियजन्य सुखाच्या मागें हात धुवून लागावयाचे एवढाच उद्योग या मंडळीला असतो. ज्यांत कसलाहि रस नाहीं, असलीं शुष्क भाषणें आणि ठरींव मूर्खपणाच्या कोट्या यांचा येथें या वेळीं पाऊस पडत असतो. मानवी मनाची क्षुद्र बाजू निरीक्षण करण्याला याहून अधिक चांगली संधि दुसऱ्या कोठेंहि मिळावयाची नाहीं. टेम्स नदीच्या तीरावर बाजूनें कांचा लावलेल्या व श्रीमंती थाटानें सजविलेल्या गच्चीवर बसून असा अभ्यास करणे, हें खरोखर फार मौजेचें आहे.

आपल्या जिव्हालौल्याची तृप्ति करण्यासाठीं सेव्हॉय हॉटेलमध्यें जाणारास बाजिरावी थाटाचा खर्चहि करावा लागतो. आमच्या बाईसाहेब आणि त्यांचें मित्रमंडळ याजकरतां एका विशिष्ट जागेंतलें टेबल राखून ठेवण्यांत आलें होतें. तेथल्या वाढप्याच्या ' मेहरबानीनें ' त्यांच्या शेजारचेंच एक टेबल मीं आपल्याकरतां योजून ठेवलें होतें. बाईसाहेब आपल्या जागेवर जाऊन बसेपर्यंत मीहि इकडे तिकडे उगीच फिरत असें. त्या आपल्या जागेंत गेल्या म्हणजे थोड्या वेळानें मीहि आपल्या जागेवर जाऊन बसत असें. माझा स्वभाव एकलकोंडा असून आपल्या शेजारीं

दुसरा कोणी येऊन बसला, तर तें मला खपत नाहीं, असें माझ्या वर्तनानें मी दाखवीत असें. आपल्या गिऱ्हाइकांना स्ट्रॉबेरी देण्याची एक विलक्षण पद्धत या हॉटेलमध्यें आहे. दहांपासून बारा सुंदर रसदार फळें वर असलेलें झुडूप जसेंच्या तसेंच चांदीच्या ताटांत घालून गिऱ्हाइकापुढें ठेवलें जातें. अशा रीतीनें स्ट्रॉबेरी खाणें म्हणजे चैनीचा अगदीं मुरब्बीपणा समजला जातो. फळाबरोर खाण्यासाठीं दुधावरची थोडी मलयीहि दिली जाते. स्ट्रॉबेरीच्या अशा एका प्लेटीला साडेसात रुपये पडतात. सामान्य खाणाराला एक प्लेट बहुधा पुरेशी होते. मी रोज पाच प्लेटींवर हात मारीत असें.

अशा रीतीनें रोज सुमारे पन्नेचाळीस रुपये ग्रँडड्यूकच्या खिशांतून माझ्यासाठीं खर्च होत असत. हा प्रकार सुमारें दहा दिवस चालू होता. रोज त्याच वेळीं बाईसाहेबांच्या मागोमाग जाऊन बसावें व रोज तितक्याच प्लेटींचा फन्ना उडवावा असा माझा क्रम सुरू होता. लवकरच लोकांचें लक्ष माझ्याकडे वेधूं लागलें. माझ्या विक्षिप्तपणाबद्दल हळुहळु कुजबूज सुरू झाली. एके दिवशीं मी आपल्या जागेवर जात असता, कोणसेंसें ह्मणालें, " हा आला स्ट्रॉबेरी खाणारा राक्षस ! "

हे शब्द ऐकून मला परमावधीचा आनंद झाला. बाईसाहेबांच्या मित्रमंडळींत घुसण्याची संधि लवकरच येणार, असें मीं ओळखलें. साऱ्या लंडनांत फार फ्याशनेबल—चोंचलेखोर—म्हणून नाणावलेल्या हॉटेलांत चोंचलेखोरपणाबद्दल माझा नंबर पुष्कळसा वर लागला, ही कांहीं लहानसहान गोष्ट नाहीं. आमच्या बाईसाहेबांचा दर्जा मोठा, त्यांचें कुळ उच्च, तेव्हां त्या सामान्य स्त्रीप्रमाणें वाटेल त्याच्याबरोबर थट्टामस्करीचा प्रकार करावयाच्या नाहींत, हें उघड होय. इतक्या उघडपणें त्यांच्याशीं ओळख करून घेणें शक्य नव्हतें. त्यांची खुषींत असण्याची वेळ साधून एकादा कटाक्ष त्यांच्याकडे फेंकला तर त्याहि तुमचा कटाक्ष परत करावयाच्या. दोघांचींहि तोंडें थोडींशीं हंसरीं होतात न होतात तोंच तीं एकमेकांच्या विरुद्ध दिशेला वळावयाचीं. पहिली सलामी येथेंच संपते. त्यानंतर दोघेंहि दुसऱ्या दिवसापर्यंत परस्परांकडे पहावयाचीं

नाहींत. अशा प्रेक्षणाला थट्टामस्करी हें ग्राम्य नांव कधींहि देता येणार नाहीं. फारच झालें तर तें एक मानासिक सम्मीलन आहे, इतकेंच ह्मणतां येईल.

अशा रीतीनें स्ट्रॉबेरीचा फन्ना पाडण्याचा माझा क्रम सुरू असतां हॉटेलचे म्यानेजर माझ्याजवळ आले आणि ह्मणाले, " तुह्मी कोण आहां, याबद्दल येथें बरीच चर्चा सुरू झाली आहे. कांहीं लोकांनीं मला याबद्दल प्रश्न देखील विचारले. " ही चौकशी करणारा बाईसाहेबांच्या मित्रमंडळापैकींच एक गृहस्थ आहे, असें त्या म्यानेजरकडून मला कळलें. अर्थात् या चौकशीचा उगम मूळ बाईसाहेबांपासूनच झाला असावा, हें मला सहज ताडतां आलें.

हा प्रकार इकडे सुरू असतां ग्रँडड्यूकसाहेबांशींहि माझा रोजचा पत्रव्यवहार सुरू होता. त्यांचा पुतण्या या दिवसांत लंडनला जावयाचा; पण कसेंहि करून त्याला इकडे येऊं देऊं नका, असें ड्यूक यांस मीं कळाविलें होतें. त्यानें लंडनला येऊं नये एवढेंच नव्हें, तर बाईसाहेबांना पत्रहि लिहूं नये अशी तजवीज मी ग्रँडड्यूकसाहेबांकडून करविली. देशो-देशींचे चैनी लोक या वेळीं लंडनांत पुष्कळसे गोळा झाले होते. हे दिवस चैनीच्या मोसमाच्या भराचे होते. मीहि रोज चैनीचे नवे नवे प्रकार शोधून काढण्यांत गुंग झालों होतो. आज गेटी थियेटर तर उद्यां कोर्ट थियेटर आणि आज हा क्लब, तर उद्यां दुसराच कसला निराळा समाज असा माझा प्रकार रोज सुरू होता. तेथें माझ्या जुन्या ओळखी-चेहि कांहीं मित्र मला भेटले. मी शिकारीनिमित्त किंवा युरोपांतल्या हवा खाण्याच्या ठिकाणीं कित्येक वेळां जात येत असें व त्या वेळीं पुष्कळां-च्या ओळखीहि होत असत. अशापैकींच दोन तीन मित्र येथें मीं गांठले व त्यांजकडून कांहीं क्लबांत व मंडळांत मीं आपला प्रवेश करून घेतला. अशा रीतीनें बऱ्याच मंडळीच्या ओळखी झाल्यानंतर चहापार्ट्या व इतर प्रकारचीं घरगुती संमेलनें यांना मला बोलावणीं येऊं लागलीं. यांपैकीं पुष्कळशा ठिकाणीं आमच्या बाईसाहेबहि येत असत व त्या येण्याच्या ठिकाणीं मला आपोआप बोलावणें न आलें, तर युक्तिप्रयुक्तीनें तें मी

आणवीत असें. अखेरीस एका पार्टीच्या प्रसंगीं बाईसाहेबांचा व माझा प्रत्यक्ष परिचय झाला. बाहेर हिंडण्याफिरण्यांत पटाइत ह्मणून ज्या कांहीं इंग्रज स्त्रिया प्रसिद्ध आहेत, त्यापैकींच बाईसाहेब या एक होत्या. त्या पराकाष्ठेच्या सुंदर होत्या असें नाहीं, पण शरीराचें तेज, डोळ्यांचे पाणी आणि उत्तम प्रकृतीची टवटवी या गोष्टींच्या अनुकूलतेमुळें त्या मोहक दिसत, यात मात्र संशय नाहीं. बांध्यानें त्या उंच व सडपातळ होत्या. त्यांची वृत्ति व चालरीत हीं स्वतंत्र बाण्याचीं द्योतक होतीं. त्या कोणापुढें नमून रहातील अथवा कोणाच्या ओंजळीनें पाणी पितील, असें दिसत नव्हतें. या दृष्टीनें पहातां त्यांची वाढ जर्मन स्त्रीवर्गाच्या वागणुकीच्या अगदीं विरुद्ध झालेली दिसत होती. कदाचित् तरुण ड्यूकसाहेबांच्या प्रेमाच्या मुळाशीं तेंच कारण असूं शकेल.

बाईसाहेब ह्मणाल्या, " काय कसें काय आहे ? स्ट्रॉबेरी खाण्याची तृप्ति अजून झाली कीं नाहीं ? "

आम्ही दोघेंहि मोठ्यानें हंसत सुटलों. मी म्हणालों, " एकूण बाईसाहेब माझ्याकडे इतक्या बारीक नजरेनें पहात होत्या तर ? "

" अर्थात् ! माझी तुमच्यावर सक्त नजर होती. "

यानंतर आम्ही दोघेंहि मन मोकळें करून थोडा वेळ गप्पागोष्टी करीत बसलों. तरुण ड्यूकसाहेबांचें मन बाईसाहेबाकडे इतकें कां वेधलें याचा अधिकाधिक उलगडा मला होऊं लागला. ड्यूकसाहेबांची निवड कांहीं वावगी नव्हती, असेंहि मला वाटलें.

त्या दिवसापासून बाईसाहेब जेथें जेथें हजर असतील, तेथें तेथें हजर राहण्याचा मींहि निश्चय केला. गाणींबजावणीं, नाटकें, उपाहारगृहें, इत्यादि ठिकाणीं त्यांना नेहमीं सलाम करण्याचा प्रसंग मीं वायां जाऊं दिला नाहीं. बारीकसारीक गोष्टींत माझ्या संगतीचा उपयोग त्यांना होऊं लागला. हळुहळू आणि कदाचित् त्यांना न कळतसुद्धां माझ्यावर त्यांचा विश्वास बसूं लागला. हा वेळपर्यंत मी कोण याचा लोकांना हळुहळू उलगडा पडत चालला होता. मी एक जगाचा प्रवासी असून वैद्यविद्येंत कांहीं शोध लावण्याचा नाद मला आहे, असा लोकांचा समज झाला

होता. छोट्या ग्रँडड्यूकचा व त्यांचा जो ऋणानुबंध होता, त्याजबद्दल बाईसाहेबांच्या मित्रमंडळीस बरीच माहिती होती, असें मला कळून आलें. छोटे ग्रँडड्यूक लंडनांत येण्याची वाट बाईसाहेब पहात होत्या. हळुहळू छोट्या ड्यूकसाहेबांची व माझी ओळख आहे, असें मीं बाईसाहेबांच्या लक्षांत आणून दिलें. आम्हां दोघांमध्ये हळुहळू अधिक मोकळेपणा येत चालला. आपल्या अंतरंगांतील गोष्टी बाईसाहेब मजजवळ अधिक मोकळेपणानें बोलू लागल्या. या वाढत्या विश्वासाचा फायदा घेण्याचा उपक्रम मींहि सुरू केला. छोटे ड्यूकसाहेब कांहीं तरुणींच्या मागें लागले असून तिकडे आपलें बस्तान जुळवींत आहेत, असें मीं बाईसाहेच्या मनांत भरवून देऊं लागलो. अशा रीतीनें विश्वास वाढतां वाढतां बाईसाहेब छोट्या ड्यूकविषयीं आपले मन मजपाशीं उघडें करू लागल्या. मींहि छोट्या ड्यूकबद्दल त्यांच्या मनांत मत्सराचें बीजारोपण करून दिलें. येणार, येणार, म्हणून गाजत असलेले ड्यूकसाहेब अद्यापपावेतों लंडनांत आले नव्हते. या गोष्टीचा फायदा घेऊन त्यांजविषयीं बाईसाहेबांचें मन मी कलुषित करू लागलों. छोट्या ड्यूकसाहेबांचे कान मोठ्या ग्रँडड्यूकसाहेबांच्या हातांत आणि या मोठ्यांचे कान अस्मादिकांच्या हातांत होते, ही गोष्ट वाचक विसरले नसतील. माझ्याकडून हुकूम सुटल्याशिवाय छोटे ड्यूक लंडनांत येणार कसे ?

यानतर सुमारें दोन महिन्यांनीं मला मेफेअर पेठेमधील बाईसाहेबांच्या घरीं जाण्याचा योग जुळून आला. छोट्या ड्यूकसाहेबांबरोबर माझी ओळख आहे, असें मीं त्यांस भासविलें असल्यामुळें म्हणा किंवा इतर कांहीं कारणांमुळें म्हणा, बाईसाहेबांचा आणि माझा परिचय या वेळीं बराच दाट झाला होता. छोटे ड्यूकसाहेब व बाईसाहेब यांचा प्रथम परिचय श्रॉपशायर परगण्यांतील एका सरदाराच्या घरीं झाला. पण या वेळीं त्यांचें विशेष मेथकूट जमलें नव्हतें. त्यानंतर स्वित्सरलंडमधील डोंगराळ प्रदेशांत या दोघांची पुन्हां गांठ पडली व तेव्हांपासून या दोघांत अधिक दृढ असा मित्रभाव वाढत गेला. बाईसाहेबांना पत्त्यावर

जुगार खेळण्याचा नाद असून त्यांत त्यांच्या खिशाला बराच चट्टा बसला असल्याचेंहि माझ्या निदर्शनास आलें.

बाईसाहेब कर्जबाजारी बनल्या आहेत, ही गोष्ट उघडकीस आणण्यास मला बरीच खटपट करावी लागली. बाईसाहेबांच्या दासीकडे संधान बाधून व तिच्याशी अनेक वेळां गप्पागोष्टी करून तिच्याकडून ही गोष्ट मला वदवावी लागली. बारीकसारीक प्रसंगीं सुद्धां या दासीबाईच्या हातास लोणी लावण्याचा प्रसंग मीं वायां जाऊं देत नसें. तिच्या मर्जीचा कल पाहून अनेक वेळां कांहीं बारीकसारीक वस्तु तिला मी देत असें. बाईसाहेब बाहेर गेल्या आहेत, अशी संधि साधून मी त्यांच्या घरीं गेलों आणि त्या परत येण्याची वाट पाहण्याचा बहाणा करून त्या दासीशीं बोलत बसलों. तिच्या लक्षांत न येईल अशा रीतीनें कांहीं मुद्याचे प्रश्नहि तिला मीं विचारले. तिनें जीं उत्तरें दिलीं, त्यावरून बाईसाहेबांना पैशाची तंगी असावी असें मीं ताडलें व पुढील धोरण या मुद्याला धरून ठरवाव-याचें असा बेत मीं योजला.

यानंतर बाईसाहेबांच्या घरीं पत्त्यांचे डाव जेव्हां जेव्हां सुरू असत, तेव्हां तेव्हां मी हटकून हजर रहात असे. उच्च दर्जाच्या इंग्रज स्त्रियांत ब्रिज नांवाच्या खेळाचें फार खूळ माजलें आहे, आणि याच नादांत पडून बाईसाहेब कर्जबाजारी झाल्या होत्या. एके दिवशीं आह्मां दोघां-मध्यें डाव चालला असतां तो डाव बाईसाहेबांच्या अंगावर आला. या जुगारांत रोखीचा व्यवहार फारसा नसतो. डाव हारणारा इसम आपल्या प्रतिपक्ष्याला ठरींव रकमेची हुंडी मात्र लिहून देतो. त्याप्रमाणें त्या रात्रीं बाईसाहेबाकडून मीं हुंडी लिहून घेतली. त्याचप्रमाणें दुसऱ्या कित्येक हुंड्या त्यांनीं अनेकांना लिहून दिल्या होत्या. त्या दासीच्या मार्फत या कर्जदाराचे पत्तेहि मीं मिळविले, आणि त्यांजकडून त्या हुंड्याहि माझा स्वतःचा संबंध न दाखवितां माझ्या हातीं येण्याची व्यवस्था मीं केली. नंतर हुंड्यांचें हें सारें पुडकें खिशांत घालून एका प्रसिद्ध खाष्ट सावकाराकडे मी गेलों आणि त्याच्याशीं सौदा पक्का केला. त्यानें तें भेंडोळें खिशांत घालून बाईसाहेबांकडे जावें व रकमेचा उलगडा करण्याचा तगादा

त्यांजकडे लावावा, असें आह्मां उभयतांत ठरलें. अर्थातच माझ्या नांवाचा मागमूसहि त्यानें लागूं देऊं नये, असा ठराव मीं त्याच्याशीं केला. ज्या अर्थीं बाईसाहेबांचा मी स्नेही म्हणवितों, त्या अर्थीं पैशासाठीं त्यांच्याकडे मला स्वतःला कधींच तगादा करता आला नसता, हें उघड आहे. आमचा सौदा ठरला, त्याच दिवशीं आमचे मारवाडीशेट बाईसाहेबाच्या घरीं गेले. यानंतर कित्येक वेळां तो वारंवार त्याच्या घरीं जाई आणि पैशासाठीं निकडीचा तगादा करीत असे. एकसारख्या खेपा घालघालून व अखेरीस कोर्टाची दहशत दाखवून बाईसाहेबांस त्यानें सतावून सोडलें. शेवटीं बाईसाहेब इतक्या वैतागल्या कीं, त्या खरोखर भ्रमिष्ट होण्याच्या रंगास आल्या. मींहि त्यांच्याशीं गुळचट भाषणें अधिक सुरू केलीं व त्यांच्या स्थितीबद्दल माझ्या हृदयाला अगदीं पीळ पडत आहे, असें मीं त्यांना भासविलें. शेवटीं बाईसाहेब माझ्याशीं सारें आपलें हितगुज सांगूं लागल्या. आपण कर्जाच्या पेचांत सांपडलों असून आपलें बहुतेक सारें मित्रमंडळहि कर्जबाजारी आहे, ही गोष्ट उघडपणें त्यांनीं मजपाशीं कबूल केली !

माझा डाव आतां चांगला रंगास आला होता. बाईसाहेबाच्या डोक्यावर उपकारांचें मोठें ओझें लादण्याचा प्रसंग मला प्राप्त झाला. या पेचांतून बाईसाहेबांस सोडविण्यास काय युक्ति करावी याजबद्दल आह्मी परस्परांत खल सुरू केला. बाईसाहेबाच्या कारभारात बऱ्याच भानगडी व गुंतागुंती झाल्या होत्या, असें मला आढळून आलें. छोट्या ड्यूकसाहेबांकडून कसलीहि मदत होण्याचा फारसा संभव नाहीं, ही गोष्ट बाईसाहेबाच्या मनावर मीं ठसविली. ड्यूकशीं त्यांचा विवाहसंबंध होण्याची त्याना यत्किंचितहि आशा नाहीं, अशीहि त्याची मीं खात्री करून दिली; तथापि ज्या अर्थीं छोटे ड्यूक त्यांच्याशीं वचनबद्ध झाले होते, त्या अर्थीं या संकटांतून सोडविण्यास बाईसाहेबांस मदत करणें हें ड्यूकचें कर्तव्य आहे असेंहि मीं आपलें मत दिलें. प्रसंग मोठा अणीबाणीचा होता. बाईसाहेब स्वभावाच्या फार अभिमानी. यामुळें त्यांना नकळत त्यांचें मन वळविण्याचें मोठें बिकट काम मला आतां करावें

लागलें. ड्यूककडून पैसा घेणें ह्मणजे त्याला पेंचांत धरून त्याजकडून पैसा उकळणें नव्हे, असें बाईसाहेबांना मला भासवावयाचें होतें. ड्यूककडून पैसा घेणें ही गोष्ट निव्वळ न्यायाची आहे, अशी मला त्यांची खात्री करावयाची होती. यांत कांहीं अन्याय आहे असा त्यांचा समज झाला असता, तर ड्यूककडून पैसा घेण्यापेक्षां समाजांतून बाहेर राहून एकांतवास त्यांनीं अधिक पसंत केला असता. अशा स्थितींत आपल्या सर्व मोठेपणास व चैनबाजीस रजा देण्याइतका सदभिमान त्याच्या ठिकाणीं जागृत होता, ही गोष्ट कबूल करणे भाग आहे. शेवटीं मी म्हणालों, "बाईसाहेब, तुमची नुकसानी ग्रॅंडड्यूकनें भरून द्यावी, असे करण्यास तुमच्याजवळ कांहीं तीव्र शस्त्र आहे का?"

बाईसाहेब बराच वेळ स्तब्ध बसल्या होत्या. नंतर त्या एकदम उठून बाहेर गेल्या आणि थोड्या वेळानें एक कागदपत्रांचे पुडके घेऊन आंत आल्या. यापैकीं कांहीं कागदावर ग्रॅंडड्यूकच्या राजघराण्याची मोहर मला दिसली. छोट्या ड्यूकसाहेबांच्या हातून इतका मूर्खपणा झाला असेल, अशी माझी कल्पना नव्हती. संतापाच्या भरांत तें पुडकें माझ्या डोळ्यासमोर धरून बाईसाहेब म्हणाल्या, "ग्रॅंडड्यूक आतां यापुढे काय बोलणार तें सांगा पाहू. छोट्या ड्यूकशीं माझा विवाह करण्यास त्यांना मी भाग पाडीन."

ही संधि माझ्या फार फायद्याची होती. तवा अगदीं खरपूस तापला होता. शांतपणें आपण या गोष्टीसंबधीं बोलू, असें मीं बाईसाहेबांस सुचाविलें. बाईसाहेबांस माझा भरंवसा अधिक वाटावा ह्मणून मी स्वतः एका बड्या जर्मन घराण्यांतला वंशज असून नांव चोरून मी लंडनमध्यें आलों आहे, असें त्यांस सांगितलें. अर्थातच ग्रॅंडड्यूकच्या घराण्याची पूर्वापार माहिती मला आहे, असा त्यांचा समज झाला. तसेंच ग्रॅंडड्यूकच्या घराण्याशीं माझें फारसें सूत नाहीं, असेंहि मीं त्यांना भासविलें. एकंदरीनें या वेळीं त्यांना माझ्या मदतीचा फारसा उपयोग होईल, असा त्यांचा पक्का समज मीं करून दिला.

"विवाहासंबंधी म्हणाल, तर तो कायदेशीर होणें शक्य नाहीं, हें

तुह्मांला स्पष्टपणें सांगण्यावांचून गत्यंतर नाहीं. खरोखर ही मोठ्या दिलगिरीची गोष्ट आहे, पण त्याला उपाय काय ? छोट्या ड्यूकनीं तुमच्याशीं केलेली वर्तणूक अत्यंत गर्हणीय आहे, यांत संशय नाहीं. याकरतां त्यांनीं आतां तुमची भरपाई करावी, हें अगदीं रास्त आहे. वचनभंगाच्या अपराधावरून तुह्मीं त्यांजवर दावा केला, तर कोर्टसुद्धां तुमच्यातर्फे निकाल देईल; पण हा मार्ग तुह्मांला कधींच श्रेयस्कर वाटावयाचा नाहीं. तुमच्यासारख्या थोर आणि कुलीन घराण्याला यामुळें केवढा कलंक लागणार आहे बरें ! " हें माझें भाषण बाईसाहेबांना आवडल्यासारखें दिसलें.

त्या ह्मणाल्या, " मग करावें तरी काय ? "

" बाईसाहेब, मी ज्या अर्थी तुमचा मित्र म्हणवितों, त्या अर्थी अशा प्रसंगीं तुमच्या उपयोगीं पडावें हा माझा धर्म आहे, असें मी समजतों. तुह्मी परवानगी द्याल, तर माझ्या मित्रधर्माला जागण्याचा यत्न मी करीन. म्हाताऱ्या ग्रँडड्यूकशी बोलणें करून त्याला या गोष्टीचा विचार सरळ मार्गानें करण्यास मी भाग पाडीन असें मला वाटतें. हा प्रश्न अत्यत नाजूक आहे, हे मलाहि समजतें; पण अशा गोष्टींत स्वतः बोलाचाली करण्यापेक्षां हें काम एखाद्या पुरुषावर सोंपवावें, हें तुह्मांलासुद्धा बरें नाहीं का वाटत ? "

बाईसाहेब खालीं मान घालून बसल्या. हातांतील पत्रांचें पुडके या हातांतून त्या हातांत त्या कांहीं वेळ फिरवीत राहिल्या. नंतर त्या मजकडे पाहून ह्मणाल्या, " छे, छे, मला धीर नाहीं होत. या मार्गाचा मला विचारदेखील करावासें वाटत नाहीं. "

तव्याखालीं थोडा आणखी जाळ घातला पाहिजे, असें मला दिसून आलें. त्या वेळीं मीं खरोखर इतक्या थापा मारल्या, कीं बाकीच्या साऱ्या जन्मांतहि मी इतकें खोटें बोललों नसेन. छोटया ड्यूकसाहेबांचें चित्र पांच मिनिटांच्या अवधींत मीं इतक्या भेसूर रंगांत रंगाविलें कीं त्याज्यापुढें एकादा अस्सल कसाबहि फिका पडेल ! " बाईसाहेब, तुह्मीच विचार करा, छोटा ड्यूक या वेळीं येथें यावयास पाहिजे होता; पण तो

आला नाहीं. फार काय, पण तुमच्या पत्राला त्यानें नुसता जबाबहि दिला नाहीं. या राजघराण्यांतील बदमाषाची किंमत यावरूनच कळून येते. खरोखर असल्या मनुष्याला आाण त्याच्या घराण्याला तुह्मीं केवढीहि शिक्षा केली आणि केवढाहि दंड तुह्मीं त्याकडून भरून घेतला, तरी तो अपुराच होणार आहे. ''

शिक्षेची कल्पना बाईसाहेबांच्या अगदीं पसंतीस उतरली असें दिसलें. केवळ स्वतःचा फायदा करून घ्यावा, ही माझी पहिली कल्पना त्यांना आवडली नव्हती. बाईसाहेब अभिमानी स्वभावाच्या असल्यामुळें ही शिक्षेची कल्पना त्यांच्या स्वाभिमानास पोपक अशी त्यांना वाटली. स्त्रीजातीचा—त्यांतून विशेषतः इंग्रज स्त्रीचा अभिमान खवळला ह्मणजे, तो फार भयंकर होतो. बाईसाहेबांच्या अभिमानाला पोपक असें हें बेजारापण करून मी ताबडतोब तेथून उठलों आणि घरीं आल्यानंतर प्रथम दोन पत्रें तयार कला. तीं तयार केलेलीं पत्रें ग्रँडड्यूककडून आलेलीं नाहींत, असें म्हणण्याचें धाष्ट कोणींहि केलें नसतें. कारण त्या पत्रावर ग्रँडड्यूक यांची सही व शिक्कामोर्तब वगैरे सर्व कांहीं यथायोग्य होतें. या पत्रात बाईसाहेबाच्या कर्जाची फेड करण्यास ग्रँडड्यूक तयार आहेत, असा मजकूर होता. यानंतर दोन तीन दिवसानी पुन्हां मी बाईसाहेबांच्या घरीं गेलों आणि त्यांना तीं पत्रें मीं वांचून दाखविलीं. बाईसाहेब या वेळीं अगदीं विषण्ण होऊन बसल्या होत्या. वाटेल तो योग्य मार्ग स्वीकारण्यास त्यांनीं मला परवानगी दिली. ताबडतोब मी ग्रँडड्यूकच्या लंडन येथील ब्यांकेंत जाऊन सव्वादोन लाख रुपयांची मागणी केली. चार दिवसांनीं हे पैसे माझ्या हातीं आले. यानंतर पुढें सर्व कांहीं सुरळीत झाल. बाईसाहेबांकडील कागदांचें पुडकें घेऊन सव्वादान लक्ष रुपये मीं त्यांच्या स्वाधीन केले. आज बाईसाहेब मोठ्या चैनीनें साऱ्या युरोपभर फिरत असतात आणि ग्रँडड्यूककडून मिळणाऱ्या वर्षासनावर त्यांचा योगक्षेम थाटांत चालला आहे.

सेव्हॉय हॉटेलमध्यें जाऊन स्ट्रॉबेरीचा फराळ त्या आतां करतात कीं

नाहीं, हें मला ठाऊक नाहीं; पण पूर्वी त्या तेथें गेल्यामुळें त्यांचें नशिब खुललें हें मात्र मला पक्कें माहीत आहे.

बाईसाहेबांनीं पत्राचें पुडकें माझ्या स्वाधीन केलें, तेव्हां तें एका जाड पाकिटांत घालून तें पाकीट त्यांनीं मोहोरबंद केलें, अर्थात् तीं पत्रें मला वाचावयाला मिळालीं नाहींत, यामुळें माझी मात्र एक प्रकारची निराशा झाली. पत्रांचें पुडकें माझ्या खिशांत पडल्याबरोबर मीं आपला लंडनचा मुक्काम हालविला व तावडतोब ग्रँडड्यूक यांच्या गांवीं जाऊन तें पाकीट मीं स्वतः खुद्द त्यांच्याच हातीं दिलें. त्यांनीं तें उत्सुकतेनें माझ्या हातून घेऊन माझ्या समक्षच फोडलें. आंतील सर्व पत्रें बाहेर काढून तीं ते झटपट चाळूं लागले. त्या पत्रांकडे त्याचें फारसें लक्ष होतें असें दिसले नाहीं; पण हें पुडकें चाळतांचाळतां जेव्हां एक सरकारी कागदासारखा दिसणारा जाडसा कागद मध्येंच बाहेर पडला, तेव्हां म्हाताऱ्याचा जीव एकदम थंड झाल्यासारखा दिसला. त्यांनीं एक लांबलचक सुस्कारा सोडला. स्वित्सरलंडमध्यें जशा तऱ्हेच्या कागदावर लग्नाचे परवाने दिलेले असतात, तशा प्रकारचा तो कागद दिसत होता. तो कागद मला चांगलासा पहावयाला मिळाला नाहीं, त्यामुळें तो अमक्याच एका स्वरूपाचा होता, असें मला निश्चितपणें सांगवत नाहीं; पण त्या कागदासंबंधीं दिसलेली ग्रँडड्यूकची आतुरता, बाईसाहेबाच्या भाषणांतलि कांहीं संदिग्ध पण सूचक गोष्टी आणि अखेरीस खुद्द स्विटझर्लंडमध्यें माझ्या कानावर आलेली लोकवार्ता इत्यादि गोष्टींवरून यांत गुपचुप लग्नाचा प्रकार घडला असावा, याबद्दल मला तरी यत्किंचितहि शंका वाटत नाहीं.

माझी कामगिरी ग्रँडड्यूसाहेबांस फार पसंत पडली असावी असें दिसलें. त्यानीं चार हजार रुपयांची बिदागी मला दिली, आणि याशिवाय थोड्याच दिवसांनीं एक हिऱ्याची आंगठी आणि सुंदर सोन्याचें घड्याळ व सांखळी अशा वस्तु मला मिळाल्या. घड्याळावर ग्रँडड्यूकच्या राजघराण्याचा शिक्का असून त्या खालीं पुढील मजकूर आहे.

" आमच्या घराण्याचें महत्त्व राखल्याबद्दल ! "

## प्रकरण सहावें.

# मॉन्ट कार्लो येथील गुप्त खलबत

व्हियेन्ना येथील आपली कामगिरी संपवून मी नुकताच बर्लिनला परत आलों होतों. आपल्या कामगिरीचा रिपोर्ट सादर करून मिटलस्ट्रासी-वरील आपल्या खोलींत येऊन मी स्वस्थ पडलों होतों. संध्याकाळीं कोठें तरी थोडी चैन मारावी, असे विचार माझ्या डोक्यांत घोळत होते. थोड्या वेळानें, जेवणाची वेळ झाली म्हणून मी उठण्याच्या तयारींत होतों, इतक्यांत एक सरकारी स्वार आमच्या दाराशीं दत्त ह्मणून उभा राहिला. त्याचे दर्शन झाल्याबरोबर संध्याकाळच्या चैनीच्या साऱ्या कल्पना माझ्या डोक्यांतून एकदम पळाल्या, हें निराळें सांगावयास नको. ‘ वुईलहेल्म-स्ट्रासीमध्यें तुह्मांस एकदम हजर झालें पाहिजेच ’ असा निरोप त्या स्वाराने आणला होता. आमच्या वुइलहेल्मस्ट्रासीमधल्या यजमानांना सबुरी कशी ती ठाऊकच नाहीं. थोडासा सुद्धां खोळंबा झाला, तर तो त्यांना खपत नाहीं. त्यांचें बोलावणें आलें, ह्मणजे कसलीहि सबब न सांगतां तुह्मी ताबडतोब हजर झालेंच पाहिजे. बोलावणें आल्यापासून वीस मिनिटांच्या अवधींत काउन्ट फॉ वेडेल यांच्या समोर मी हजर झालो. आणखी दहा मिनिटांनीं पुढील कामगिरीचे सारे हुकूम खिशांत घालून आमची स्वारी तेथून बाहेर पडली. कामगिरी काय सांगावयाची हें वुइलहेल्मस्ट्रासींतल्या लोकांनीं आगाऊच पक्कें ठरवून ठेवलेलें असतें. यामुळें त्यांचीं सारीं कामें बिनबोभाट व ताबडतोब पार पडत असतात. घरीं येतां येतां, फॉ वेडेल यांनीं सांगितलेल्या कामगिरीचा तपशील मनां-तल्या मनांत मी चाळून पहात होतों. त्यांचें सारें भाषण मी पुनः स्वतः-शीं बोलूं लागलों. “ रात्रीच्या एक्सप्रेस गाडीनें तुह्मांला मॉन्ट कार्लोला गेलें पाहिजे. रिव्हियेराच्या प्रांतांत सध्यां रशियन, फ्रेंच आणि इंग्रज मुत्सदी फिरत आहेत. त्यांच्या हालचालीवर नजर ठेवून त्यांच्या भेटी वगैरे झाल्यास त्यांचा रिपोर्ट एकदम आह्मांकडे आला पाहिजे. जरूर

पडली, तर काउन्टेस चेचानी यांची मदत तुह्मांस मिळेल. या बाईच्या मदतीची आवश्यकता तुह्मांला भासली, तर माझ्या नांवाचें कार्ड त्यांना दाखवा. "–त्यांनीं आपल्या नांवाचें कार्ड आपल्या सहीनिशीं माझ्याजवळ दिलें होतें–" या मुत्सद्यांच्या परस्पर भेटी होऊन त्यांचीं कांहीं संभाषणें झालीं, तर त्यांतला मुद्याचा भाग काय होता, याची माहिती तुह्मीं मिळविली पाहिजे. ही तुमच्या खर्चाची तजवीज. "–सुमारें सव्वादोन हजार रुपयांचा चेक काउन्टसाहेबांनीं माझ्या हातीं दिला होता–" आणखी कांहीं माहिती तुह्मांला पाहिजे ? "

काउन्टेस चेचानी यांस मीं पूर्वीं कधींहि पाहिलेलें नसल्यामुळें त्यांजविषयीं अधिक माहिती काउन्ट वेडेल यांस मीं विचारिली. ताबडतोब घंटा वाजून काउन्ट यांनीं एका सेक्रेटरीला बोलाविले व त्याला कांहीं प्रश्न केला. तीन मिनिटांनी बाईचा फोटो आणि त्यांच्या सहीचा नमुना हीं माझ्या हातांत पडलीं. आता कांहीं अधिक माहितीची मला जरूर नसल्यामुळें काउन्टसाहेबास सलाम करून मी त्यांच्या ऑफिसांतून बाहेर पडलों.

काउन्ट यांनीं दिलेला चेक वटावून रोकड नाणे हातांत घेणें हें माझे पहिलें काम होतें. यानंतर मॉन्ट कार्लोला गेल्यावर तेथें कोणतें सोंग घ्यावयाचें हें मला ठरवावयाचे होतें. या खेपेला दक्षिण आफ्रिकेतला एक खाणीचा मालक हें सोंग माझ्या पसंतीस पडलें. खाणींच्या संबधीं मला बरीचशी माहिती आहे. दक्षिण अफ्रिका आणि ट्रॅन्सवालचा प्रदेश यांत मीं बराच प्रवास केलेला असल्यामुळें त्या प्रदेशाची मला चांगली माहिती आहे. आपण ज्या सोंगाची बतावणी करणार, त्या सोंगाला लागणारा सर्व प्रकारचा साज आपल्यापाशीं जैय्यत तयार आहे कीं नाहीं, याचा विचार हेरानें प्रथम केला पाहिजे. कारण केव्हांना केव्हां तरी खुद्द त्या धंद्यांत असलेल्या लोकांच्या गांठी पडतात आणि त्या धंद्यांतल्या सर्व प्रकारच्या खुब्या हेराला ठाऊक नसल्या, तर त्याच्या फजितीस पारावार उरत नाहीं. याकरतां सोंगाची उत्तम बतावणी करण्याची हेराची तयारी असली पाहिजे. थोडेफार तरी खाणीवाले मॉन्टकार्लो येथें येणार हे मला अगोदरच ठाऊक होतें.

खाणीच्या शेअरचे भाव व खाणीसंबंधीं इतर माहिती हीं ज्यांत येतात अशीं दक्षिण आफ्रिकेंतलीं एक दोन वर्तमानपत्रें विकत घेऊन मी घरीं आलों आणि या प्रवासास लागणारे कपडे व इतर सामानसुमान यांची बांधाबांधी मीं केली. मध्यरात्रीं निघणाऱ्या लॉईड एक्सप्रेस गाडींतून माझ्या प्रवासास सुरुवात झाली. मध्येंच एक चांगलीशी जागा बघून व तेथें आपल्या सामानाची सोय लावून एका गादीवर मीं लांब पाय केले आणि पुढील सर्व बेतांचा नकाशा मनांतल्या मनांत मी उठवूं लागलों. कामागिरी थोडी बहुत जडच होती. यांत अगदीं थोडें यश मिळावयाचें म्हटलें, तर काउन्ट वेडेल यांनीं सांगितलेल्या व्यक्तींच्या प्रत्यक्ष भेटीचा योग जुळून आणणें अवश्य होतें. ही गोष्ट मला साधारण कशी ? नुसता नमस्कारचमत्कार होण्याइतकी ओळख होण्याचा सुद्धां जेथें वानवा, तेथें प्रत्यक्ष भेटीचा योग कसला येणार ! ही गोष्ट मला जवळ जवळ अशक्यच वाटूं लागली.

ज्या तीन मुत्सद्यांवर मला नजर ठेवावयाची होती, त्यांचीं कल्पनाचित्रें आपल्या डोळ्यांपुढें उभीं करून त्यांना मी आपल्या मनांत चाळूं लागलों. रशियाचे प्रिन्स —यांजवर झाराची मोठी कृपा. फ्रान्सचे डेलकासे आणि इंग्लंडचे सर एडवर्ड ग्रे. रिव्हियेराच्या आणि सेव्हॉयच्या आजूबाजूला हे तीन मुत्सद्दी चक्राकार परिभ्रमण करीत होते. स्वतःच्या प्रकृतिस्वास्थ्यासाठीं हे तिघेजण हवाफेर करीत आहेत, असा लोकांचा समज होता. कदाचित् या हवाफेराचें दुसरेंहि एकादें कारण असूं शकेल. कसेंहि असलें, तरी जर्मन बादशहाला या तिघांच्या प्रकृतीबद्दल फार काळजी लागली होती, ही गोष्ट मात्र खरी. एकाहून अधिक मुत्सद्दी एकाच ठिकाणीं हवाफेर करण्यासाठीं जमणें ही गोष्ट संशयोत्पादक असून तिचा अधिक छडा लावलाच पाहिजे, असें आमच्या सरकारास वाटलें. विशेषतः राजकीय उलाढाल्या विशेष काळजीच्या स्वरूपाच्या असल्या, म्हणजे अशी चौकशी करण्यास तें आणखी एक कारण होतें. सन १९१० सालीं जर्मनीचें राजकीय वातावरण दाट धुक्यानें इतकें भरून गेलें होतें कीं, त्यांत शत्रु आणि मित्र या दोघांचीहि ओळख पटेनाशी झाली होती.

सर एडवर्ड ग्रे, यांजबद्दल मला कांहींच माहिती नव्हती. डेलकासी यांजबद्दल थोडीशी होती. रशियाचे प्रिन्स; ओहो ! यांची मला चांगली माहिती होती. हे गृहस्थ सुंदर चेहऱ्याला ताबडतोब भाळणारे आहेत. चोहोंकडे पडलेल्या अंधारांत येथें मात्र एका प्रकाशाचा किरण मला दिसूं लागला. आमच्या काउन्टेस बाईचा येथें चांगलाच उपयोग करून घेतां येईल. त्यांच्या फोटोवरून पाहतां त्या फारच देखण्या असाव्या असें दिसलें; पण पुष्कळ वेळां फोटो आणि वस्तुस्थिति यांत जमीन अस्मानाचें अंतरहि असूं शकतें. हरकत नाहीं, पुढें पाहतां येईल.

दुसऱ्या दिवशीं दुपारीं पांच वाजून पंचेचाळीस मिनिटांनीं मॉन्ट कार्लो येथील हॉटेल मेट्रोपोलच्या एका खोलींत मीं आपला मुक्काम ठेवला. माझें स्नान झाल्यानंतर मीं थोडेसे उपाहाराचे पदार्थ खोलींत मागविले आणि हॉटेलच्या वाटाड्यास बोलावणें पाठविलें. हॉटेलमधले वाटाडे म्हणजे चालतेबोलते विश्वकोशच होत. त्यांना पुष्कळशा भाषा येत असतात. ते मोठे चवकस आणि बारीक नजरेचे असतात. ज्या गोष्टी त्यांच्या नजरेला येऊं नयेत, त्या हटकून बाहेर काढण्याची कला त्यांना चांगली अवगत असते; पण आपल्या तोंडाला कुलूप कसें लावावें हेंहि त्यांना पक्कें अवगत असतें. त्यांच्या तोंडाचें कुलूप काढणे ही सुद्धां एक मोठी विद्या आहे. त्यांचे हात ओले करून तें साधेल असें नाहीं. तुह्मीं त्यांना कितीहि पैसे चारले, तरी खऱ्या गोष्टींचा थांग ते तुह्मांला कधींच लागूं देणार नाहींत.

मॉन्ट कार्लो येथें काय भानगडी चालल्या आहेत, मोठ्या प्रकरणांतून कांहीं गुप्त प्रकार सुरू आहेत कीं काय, बाहेरचे कोण कोण बडे लोक आले आहेत आणि कांहीं नांवाजलेल्या नर्तकी, गाणारणी आणि जुवेबाज लोक वगैरे मॉन्टे कार्लो येथें आले आहेत किंवा काय, याची चवकशी मला करावयाची होती. तसेंच कांहीं बाहेर देशचे हेरहि येथें आहेत कीं काय, याचीहि चवकशी करण्यासाठीं मीं त्या वाटाड्याला बोलावलें. हा गृहस्थ जातीचा स्वीज होता. माझें बोलावणें गेल्याबरोबर तो दारांत येऊन उभा राहिला. मीं त्याला आंत बोलावून खुर्चीवर बसावयास सांगि-

तलें आणि मोठ्या प्रफुल्लित मुद्रेने एक उंची जातीची सिगारेट त्याच्या पुढें केली. ती तो आपल्या खिशात घालूं लागला, तेव्हां मीं त्याला एकदम म्हटलें.

" पेटवा, पेटवा. ती खिशात कशाला घालता ? मला अगदीं एकटया एकट्यासारखें झालें आहे. माझ्याबरोबर गप्पा मारतां मारतां एकादा ग्लास घ्याल कीं नाहीं ? "

अशा रीतानें मीं सूतोवाच केलें. थोडा वेळ इकडच्या तिकडच्या शुष्क गोष्टी झाल्यानतर मी त्याला विचारलें, " येथें सध्यां कांहीं विशेष आहे कीं नाहीं ? "

हा प्रश्न विचारीत असतां मीं त्याच्याकडे काण्या डोळ्यानें पाहिलें. माझ्या या सलगीच्या वर्तनाने वाटाड्याची स्वारी बहुधा फार खुष झाली असावी. एकादें गुपीत सागण्यास मी योग्य मनुष्य आहें, असें त्याला वाटलें. माझा कार्यभाग चांगलाच सिद्धीस गेला.

तो हळूच ह्मणाला, " ग्रँड हॉटेल दि लॉडर्समध्यें एक शिष्ट उतरले आहेत. "

मीं त्याला आणखी एक विडी दिली व त्याचा रिकामा झालेला ग्लास पुनः भरला.

" हॉटेलच्या नोंदबुकांत या शिष्टानें आपलें नांव काउन्ट टेचलो असें लाविलें आहे; पण माझ्यासारखा अज्ञानें थोडाच फसणार ! अहो, तो खरोखर कोण, हें मी तुह्मांला सांगूं का ? तो रशियाचा प्रिन्स—"

" हा प्रिन्स येथें काय करतो आहे ? मला वाटतें, तो खूपसा जुगार खेळत असावा. " ( तो जुगार खेळत नव्हता हें मला माहीत होतेंच. )

" छे ! छे! तो उगीच इकडे तिकडे भटकून दिवस काढीत आहे. "

" बरोबर कुटुंब वगैरे आहे कीं नाहीं ? "

वाटाड्यानें नकारार्थी मान हालविली. या बातमीनें माझा मार्ग थोडासा अधिकच सुकर होणार, याबद्दल मला आनंद वाटला. यानंतर आणखीहि थोडा वेळ इकडच्या तिकडच्या गप्पा मारल्यानंतर त्या वाटाड्याला मीं

रजा दिली. दुसऱ्या दिवशीं सकाळीं काउन्टेस चेचानी यांजकडे जाण्याचा बेत मीं केला.

काउन्टेस या हॉटेल लूव्हरमध्यें रहात असल्याची माहिती काउन्ट वेडेल यांजकडून मला मिळाली होती. त्याप्रमाणें दुसऱ्या दिवशीं त्या हॉटेलांत जाऊन मीं आपल्या नांवाचें कार्ड बाईसाहेबांकडे पाठविलें. या कार्डावर एच. व्हॅन ह्यूट, डूर्नक्लूफ, ट्रान्सव्हाल, असें नांव व पत्ता दिला होता. डूर्नक्लूफ गांवीं मी पूर्वी गेलों होतों, हें वाचकांना अवगत आहेच. या कार्डाबरोबर काउन्ट वेडेल यांच्या सहीचें कार्डहि मीं आंत पाठविलें होतें. थोडा वेळ बाहेर थांबल्यानंतर काउन्टेस यांजकडून मला बोलावणें आलें आणि मी त्यांच्या खोलींत गेलों. काउन्टेस यांनीं साधाच, पण मोहक पोषाख केला होता. काउन्टेस स्वरूपानें सुंदर असाव्यात असा तर्क फोटोवरून मीं पूर्वींच बांधला होता; पण प्रत्यक्ष पाहिलें तों काय ! रम्भामेनकादि अप्सरांची ही एक मूसच ओतली आहे कीं काय, असा मला भास झाला. जगांतलें सारें सौंदर्य येथें जणूं काय एकवटलें आहे, असें मला वाटलें. एकाद्या कोमल वेलीप्रमाणें उंच व नाजूक शरीरयष्टि, झोंकदार बांधा, सुंदर नीलवर्ण डोळे, भ्रमरपंक्तीसारखा नीलकृष्णवर्ण कुरळा केशभार, सज्ज केलेल्या मदनचापासारखे भासणारे आरक्तवर्ण ओंठ, अशी सौंदर्यसंपत्ति एकवटलेली पाहून मी तर आश्चर्यानें थक्क होऊन जागच्या जागींच उभा राहिलों; पण जाऊं द्या. अधिक वर्णन करून माझ्या वाचकांना उगीच भांबावून टाकण्यांत काय फायदा ? माझ्या या कामगिरीनंतर काउन्टेस यांची व माझी पुन्हा दृष्टिभेट देखील झाली नाहीं.

काउन्टेसचा जन्म एका उच्च हंगेरियन सरदार घराण्यांत झाला होता व त्यांच्या विवाहानें हंगारींतल्या दुसऱ्या एका प्रतिष्ठित सरदार घराण्याशीं त्यांचा संबंध जडला होता, ही गोष्ट अगोदर मला माहीत होती. मला हाक मारून त्यांनीं एका खुर्चीकडे बोट केलें. त्यांच्या बोटांत कित्येक रत्नमुद्रिका झळकत होत्या व नुकतीच पेटविलेली एक नाजूक सिगारेटहि त्यांच्या हातांत होती.

" या, ट्रान्सव्हालचे व्हॅन ह्यूट. ती खुर्ची घ्या. " हें वाक्य बोलत असतां काउन्टेस या लबाडीनें मजकडे पहात होत्या.

आम्ही दोघेंहि एकदम मोठ्यानें हांसत सुटलों. मी खरोखर कोण आहें याबद्दल त्यांना शंका नव्हतीच. काउन्ट वेंडेल यांच्या कार्डावरून ही माहिती त्यांना अगोदरच मिळालेली होती; पण यापुढें जे आणखी कांहीं शब्द त्या बोलल्या त्यावरून त्यांना आणखीहि बरीच माहिती असावी, असें मला उघड दिसून आलें.

" डॉक्टरसाहेब, माझा पाय जरा मुरगळला आहे, त्याला कांहीं औषध देतां का ? तुमच्यानें कांहीं इलाज होण्यासारखा असला तर करा. " एवढें वाक्य बोलून त्या चेष्टेनें हासूं लागल्या.

माझ्या चेहऱ्यावर मेषपात्रपणाची कशी कळा आली असेल, याची वाचकांनींच कल्पना केलेली बरी. खरोखर मी अगदीं स्तंभित होऊन गेलों. काउन्टेस यांचें व माझें साऱ्या जन्मांत हे पहिलें दर्शन. मी डॉक्टर आहें, ही गोष्ट आमच्या खात्यांत फक्त एकदोघांनाच माहीत होती. याशिवाय आमच्या खात्यातल्या नौकरानीं परस्परांच्या खाजगी गोष्टी परस्परांस कळवूं नयेत असाहि कडक नियम होता. असें असतां बाईसाहेबाना ही इतकी माहिती कोठून मिळाली ? मला खरोखर तिचा थोडासा रागच आला. माझ्याहून अधिक माहिती असलेल्या मनुष्याचा, विशेषतः अशा एकाद्या स्त्रीचा, मला खरोखरच फार राग येतो. कारण अशा स्थितींत आपल्या पाण्याची खोली किती आहे, याचा अजमास आपणास सांपडत नाहीं. काउन्टेसला ही माहिती कशी मिळाली, हें जाणण्याची फारशी उत्सुकता मीं दर्शविली नाहीं; पण त्यांजकडून ही माहिती काढण्याचा मीं मनांतल्यामनांत निश्चय मात्र केला. मीं शांतपणें म्हटलें, " काउन्टेस, तुह्मीं आमच्यावर मात केली, ही गोष्ट आह्मांला कबूल आहे; पण माझी कांहीं मदत तुह्मांला होण्याजोगी असली, तर तुमच्या सेवेला मी हजर आहें. "

" जाऊं द्या हो, असे चिडता कां ? तुह्मी चांगल्या रीतीनें वागलां, तर पुढेंमागें तुह्मांला मी सारें कांहीं सांगेन. "

पण बाईसाहेबांनीं मला कधींच कांहीं सांगितलें नाहीं. काउन्टेसच्या सामान्य वागणुकींतहि पराकाष्ठेची चतुराई मला दिसून आली; पण त्यांच्या चालीरीती कितीहि मोहक असल्या, तरी त्या इतक्या आंतल्या गांठीच्या होत्या कीं, त्याच्या अंतःकरणाचा ठाव कोणासहि लागणें शक्य नव्हते. यानंतर बाईसाहेबांची कांहीं आणखी थोडी माहिती करून घेण्याच्या इच्छेनें आणखी थोडा वेळ इकडच्या तिकडच्या गप्पा मारून शेवटी मी मुद्यावर येऊन पोहोंचलों, " काउन्टेस, माझी कामगिरी काय आहे, हे तुह्मांला ठाऊक आहे का ? " " मुळींच नाहीं. तुह्मी इकडे येणार व जरूर पडल्यास मीं तुह्मांला मदत करावी, इतकीच माहिती हुकुमावरून मला मिळाली आहे; तेव्हां आतां माझी मदत तुह्मांला कोणत्या कामांत हवी, हें तुह्मीच मला सांगा. "

माझ्या कामगिरीचें स्वरूप काउन्टेसला मी थोडक्यांत निवेदन केलें; तथापि असें करतांना सुद्धा मीं आपल्या मनाचा पुरा ठाव त्यांना दिला नव्हता. आपल्या बेताचे सारे गांठोडे कोणाच्याहि हवालीं करू नये, अशी माझी नेहमींचीच पद्धत आहे. विशेषतः स्त्रियाच्या संबधीं तर अशी काळजी घेणें अधिकच जरूर असतें. यानंतर आमच्या कामागिरीला आरंभ कोठून करावयाचा, याचा विचार आम्हीं केला. रशियाचे प्रिन्स—यांची प्रथम ओळख करून घेतली पाहिजे, असें मीं सुचविलें. प्रिन्ससाहेबांची स्वारी हॉटेल लॉन्ड्रेसमध्ये रहात असल्यामुळें आम्हीं दोघांनींहि संध्याकाळीं तेथें भोजनास जाण्याचा बेत केला. नतर एक पेला चाकोलेट घेऊन मी काउन्टेसच्या खोलींतून बाहेर पडलों. घरीं येतांना मुद्दाम मी लँड्रेस हॉटे-लमध्यें गेलों आणि तेथें थोडीशी ' युक्ति ' लढवून एका विशिष्ट जागें-तलें टेबल संध्याकाळच्या भोजनाकरतां मीं राखून ठेवले. नंतर सायका ळचा उंची पोषाख परिधान करून व फ्रेंच गुलाब पुष्पांचा गुच्छ हातात घेऊन मी पुनः काउन्टेसकडे गेलों.

गुलाब पुष्पें काउन्टेसकडे पाठवून देऊन त्यांच्या आगमनाची वाट पहात, मी दिवाणखान्यांत बसलों. ' मी लवकर येतें ' असा निरोप काउ-न्टेसकडून मला मिळाला; पण माझ्या तीन सिगारेट ओढून झाल्या,

तरी काउन्टेसचा पत्ता नाहीं, हें पाहून मला फार राग आला. कसल्याहि कामात दिरगाई न करणारी स्त्री मला तरी अद्यापि एकहि भेटली नाहीं. शेवटीं रेशमी वस्त्रांच्या घर्षणाचा मजुळ ध्वनि माझ्या कर्णपथावर येऊन आदळला आणि मी वर पहातों, तों बाईसाहेब माझ्यापुढें उभ्या! त्यांनीं उंची रेशमी वस्त्रे परिधान केलीं असून त्यांच्या मनगटावर व गळ्याभोंवतीं रत्नांचे सुंदर अलकार झळकत होते. बाईसाहेबांचें सौंदर्य खरोखर अनुपम होतें, यांत शंका नाहीं. त्यांचे सौंदर्य अमुक एका विशिष्ट प्रकारचे होतें असे ठरवितां येत नसलें, तरी कोणाहि पाहणाराच्या चित्ताला ताबडतोब मोह पडावा, असें तें होतें, यांत मात्र शंका नाहीं.

माझ्या जवळ येऊन व लीलेनें आपला हात माझ्या खांद्यावर टाकून काउन्टेस मला ह्मणाल्या, "वाट पाहून पाहून थकलां असाल नाहीं? पण तुमच्या श्रमाचा मोबदला ह्मणून तुमचीं हीं गुलाबाचीं फुले मीं अंगावर घातलीं आहेत."

बाईसाहेबानीं तो सुंदर पुष्पगुच्छ छातीवर लटकावून दिला होता. ताबडतोब आह्मी गाडींत बसून लॉड्रेस हॉटेलकडे जाण्यास निघालों. आजच्या सोंगाची बतावणी कशी करावयाची याचा बेत, आह्मी गाडींत करीत होतो. या रशियन अस्वलाला वेसण घालतां येईल कीं नाहीं, याबद्दल माझें मन बुचकळ्यात पडले होतं. थोड्या वेळानें आह्मी हॉटेलांत येऊन दाखल झालों. हॉटेल माणसांनीं बहुतेक अगदीं भरून गेलें होतें, असें मला आढळून आले. बहुतेक महत्त्वाचीं ह्मणून समजलीं जाणारीं माणसें तेथें त्या वेळीं जमलीं होतीं. कित्येक नांवाजलेल्या अमेरिकन स्त्रिया त्या दिवशीं तेथें मला आढळल्या. पिक्याडेली सरकस, केरो येथील शेपर्ड हॉटेल आणि मॉन्ट कार्लो या तीन जागा अशा आहेत कीं, जगांतील प्रत्येक नांवाजलेली व्यक्ति येथें केव्हाना केव्हां तरी भेटायचीच.

मीं आगाऊ योजलेल्या 'युक्ती' प्रमाणें हॉटेलचा म्यानेजर धांवतच सामोरा आला व मोठ्या आदबीनें लवून सलाम करून आमच्या योजलेल्या टेबलाकडे आह्मास घेऊन गेला. आमचें टेबल सुंदर व किंमतवान फ्रेंच गुलाबांनीं सुशोभित केलें होतें. (सरकारी खर्चानें.) हा गुलाब

काउन्टेसला फार प्रिय होता. हळू हळू लीलेनें इकडे तिकडे पहात पहात आह्मी आपल्या टेबलाकडे जात असतां अनेक नेत्रांच्या जोड्या आह्मांकडे रोंखल्या गेल्या होत्या. त्यांजकडे आपलें लक्ष नाहीं, असें दर्शवीत काउन्टेसची स्वारी टेबलाकडे गेली. खरोखर त्या साऱ्या समूहांत काउन्टेसच्या जोडीस बसण्यासारखें सौंदर्य दुसऱ्या कोठेंहि व्यक्त होत नव्हतें, असें ह्मणणें अतिशयोक्तीचें होणार नाहीं.

आम्ही आपल्या टेबलावर जाऊन बसलों, तेव्हां आमच्या अजुबाजूस शांततेचें साम्राज्य थोडा वेळ पसरलें. थोड्या वेळानें अस्फुट ध्वनि कर्णगोचर होऊं लागले. आमच्या उजव्या बाजूच्या टेबलाशेजारीं प्रिन्स-बसले होते. आमचें पाऊल आंत पडल्यापासूनच प्रिन्सची नजर काउन्टेसकडे एकसारखी लागलेली होती. मींहि बारीक नजरेनें प्रिन्सच्या हालचालीवर देखरेख ठेवली होती. एकाएकीं प्रिन्स आपल्या जागेवरून उठले व आपल्या सोबत्यांपैकीं एकाला आपल्या खुर्चीवर बसवून ते स्वतः त्याच्या खुर्चीवर जाऊन बसले. या खुर्च्यांच्या अदलाबदलींत काय हेतु होता, हें चटकन् माझ्या ध्यानांत आलें. नव्या जागेवरून काउन्टेसचा चेहरा प्रिन्सला अधिक चांगल्या प्रकारें दिसण्यासारखा होता. आपला चष्मा चढवून ते काउन्टेसकडे एकसारखी टक लावून बसले.

अर्थातच त्यांच्या या वर्तनापासून मला मनांतल्या मनांत फार आनंद झाला. या बड्या माशाच्या पशांत आमचा गळ खास अडकणार असें मला वाटलें; तथापि थोडासा अधिक गवगवा करण्याच्या हेतूनें मीं एक युक्ति योजली. त्या दिवशीं तेथें जाण्यांत आह्मां दोघांचा कांहीं गुप्तबेत आहे, असें कोणाच्या लक्षांत येऊं नये, असें करणें मला अवश्य वाटलें. प्रिन्स अगदीं वेडावून जाण्याच्या रंगांत आला होता, ही गोष्ट साऱ्यांच्याच ध्यानात येऊन चुकली होती. ते इतके बेहोष झाले होते कीं, सामान्य लौकिक चालीरीतीसुद्धां ते आता विसरले होते. त्यांच्या त्या टक लावून पाहण्यामुळें साऱ्या समूहाचें लक्ष त्यांच्याकडे वेधलें होतें.

मी अशाच संधीची वाट पहात होतों. हॉटेलच्या म्यानेजरास हांक मारून व सर्वांस ऐकूं जाईल असा आवाजाचा सूर चढवून मीं त्याला

म्हटलें, " आमच्या उजव्या बाजूच्या सद्गृहस्थांस इतकी टक न लावण्याविषयीं जरा विनंति करा. "

माझें भाषण प्रिन्सनीं ऐकल्याचें दिसलें. त्यांचा चेहरा एकदम गोरामोरा झाला. ते एकदम आपल्या जागेवरून उठले आणि काउन्टेस यांस सलाम करून तेथून एकदम बाहेर चालते झाले. ही गोष्ट अगदीं माझ्या मनाजोगी घडली.

आमच्या ताटात वाढलेल्या मिष्ट पदार्थांवर यथेच्छ हात मारून काफी घेण्याकरता आम्ही बागेत आलों. काफी पिऊन झाल्यावर मीं एक उंची सिगारेट पेटविली, आणि हळू हळू धुराचे फूत्कार सोडीत प्रिन्स येण्याची वाट पहात बसलो. ते आमच्या मागोमाग येणार, याबद्दल मला शंका नव्हतीच. आमच्या अजूबाजूला अनेक दर्जाचे आणि अनेक परिस्थितींतले लोक इकडून तिकडे हिंडत होते. या बाजूला एकादा राजवंशीय पुरुष, तर दुसऱ्या बाजूला प्रामिसरी नोटांच्या सट्ट्यांत पैसे मिळवून गबर झालेला एकादा लक्षाधीश हिंडत होता. ती पहा, इकडे एक स्त्री येत आहे. तिच्या खाजगी वर्तणुकीकडे पाहण्याचें आपणास प्रयोजन नाहीं. तिनें निदान अर्धा डझन देशांत मोठा लौकिक मिळविला आहे. आणखी पलीकडच्या बाजूस काहीं नर्तकी दिसत आहेत, आणि दुसऱ्या एका बाजूस कांहीं प्रसिद्ध मुत्सद्दीहि फिरत आहेत. जगांतले मनुष्य जातीचे सारे नमुने जणूं काय येथें एकवटले गेले होते. यांपैकीं पुष्कळांचीं पूर्वचरित्रें जर लोकांच्या नजरेस आलीं, तर किती तरी गंमत होईल ! आड पडद्यांतल्या गोष्टी जाणण्याचा माझा धंदाच असल्यामुळें मला यांपैकीं पुष्कळांचीं चरित्रें ठाऊक होतीं. या बाहेर दिसणाऱ्या भपक्याच्या आंत बरेचसे नुसते हाडांचे सांगाडे आहेत, ही गोष्ट या वेळीं मला एकाएकीं आठवली. पडद्याच्या पलीकडे पाहण्याचें सामर्थ्य परमेश्वरानें आपणास दिलें नाहीं, यांत त्याचें खरोखर अपार चातुर्य दिसून येतें. फार लांब कशाला, माझ्या चेहऱ्यावरचा पडदा दूर करण्याची जशी मला छाती नव्हती, तशीच माझ्या समोर बसलेल्या बाईसाहेबांसहि पण नव्हती.

एकाएकीं प्रिन्सच्या स्नेह्यांपैकीं एक मजजवळ आला आणि प्रिन्सचें कार्ड माझ्या हातांत देऊन मला म्हणाला, " मॉंशर, प्रिन्सच्या वर्तणुकीपासून बाईसाहेबांना अथवा तुम्हांला कांहीं त्रास झाला असला, तर त्याबद्दल त्यांना फार दुःख होत आहे. बाईसाहेबांची क्षमा मागण्यास स्वतः यावें अशी प्रिन्सची फार इच्छा आहे. या गोष्टीला [illegible] परवानगी आहे काय ? "

" बाईसाहेब स्वतःच मुखत्यार असल्यामुळें याबद्दल खुद्द त्यांनाच आपण विचारा. माझ्या स्वतःबद्दल म्हणाल, तर मजकडून कांहीं हरकत नाहीं. "

काउन्टेस यांनीं संमतिदर्शक मान मात्र हलविली. प्रिन्सच्या या वकिलानें बाईसाहेबांस नमन केलें आणि तो तेथून चालता झाला.

थोड्याच वेळात तो गृहस्थ प्रिन्स यांस बरोबर घेऊन पुनः परत आला. यानतर परस्पर ओळख करून देण्याचा विधि होऊन आम्ही सर्व एकत्र बोलत बसलों; तथापि प्रिन्स मात्र बाईसाहेबांशिवाय दुसऱ्या कोणाशीं फारसें बोलले नाहींत. अशा रीतीनें गप्पांत सुमारें अर्धा तास गेल्यानंतर आम्हीं थोडासा उपहार मागविला. दुसऱ्या दिवशीं प्रिन्स यानीं मला व काउन्टेस यांना आग्रहाचें भोजनाचें निमंत्रण दिलें !

ठरल्याप्रमाणें दुसऱ्या दिवशीं लॉड्रेस हॉटेलमध्यें आमचें सहभोजन झालें. प्रिन्स यांनीं आपल्या दर्जास शोभेशी भोजनाची तयारीहि अपूर्व ठेवली होती. या भोजनाला मला आमंत्रण आल्यामुळें मी गेलों होतो. भोजनानंतर नाटकाला जाण्याची तयारी झाली. नाटकाला मला निमंत्रण नव्हतें. आणखी एका सध्याकाळच्या जेवणाला काउन्टेस याना निमंत्रण आलें. या वेळींहि मला बोलावणें नव्हतें. दुसऱ्या दिवशीं बागेंत हिंडतां हिंडतां प्रिन्स यांची व माझी जेव्हां जेव्हां गांठ पडे तेव्हां माझी कसल्याहि प्रकारची ओळख न दाखवितां ते आपला राजकीय थाटाचा एक कटाक्ष मात्र मजवर फेंकून पुढें चालते होत. या त्यांच्या वर्तणुकीपासून मला मात्र मनांतल्या मनांत आनंद होत होता, हें सांगावयास नकोच. प्रिन्स काउन्टेसच्या कह्यांत पूर्णपणें गेला होता.

दिवसेंदिवस काउन्टेसच्या नादाने प्रिन्स अगदीं पागल बनत चालला आहे, हें मी दुरून दुरून पहात होतों. प्रिन्स व काउन्टेस या जोडीनें नित्य गाडींत बसून फिरावयास जावें आणि रात्रीं नाटके पहावींत असा क्रम कित्येक दिवस चालू होता. प्रिन्स उदार हातानें बहुमोल देणग्यांचा वर्षाव काउन्टेसवर करीत होते. अशा रीतीने आमची कालक्रमणा चालू असतां डेलकासी हे नाइस शहरीं गेले असल्याची बातमी मला लागली. प्रिन्सवर काउन्टेसचा पहारा असल्यामुळें डेलकासीच्या मागें लागण्यास मला सवड मिळाली. याच वेळीं इंग्लंडांतून सर एडवर्ड ग्रे किंवा वुइन्स्टन चर्चिल यांपैकीं कोणी तरी, नाइस शहरीं येणार होते. डेलकासी व इंग्रज मुत्सद्दी यांच्यामध्यें कांहीं बोलणें चालणें होतें कीं काय याची माहिती मला मिळवावयाची होती. नाइस शहरचें खलबत संपल्यानंतर प्रिन्सबरोबर त्यांचें खलबत होईल, असें मीं ताडलें होतें. नाइस शहरीं येऊन डेलकासी यांच्या हालचालीवर मीं सक्त नजर ठेवली होती; पण विशेष महत्त्वाचें असें कांहींच घडलें नाहीं. हाऊस ऑफ कामन्समध्यें कांहीं विशेष भानगड उत्पन्न झाल्यामुळें सर एडवर्ड किंवा चर्चिल यांपैकीं कोणी येऊं शकले नाहींत. यामुळे त्यांनीं आपल्यातर्फें एका गृहस्थास पाठवून त्याजबरोबर डेलकासी यांस ठेवण्यासाठीं कांहीं महत्त्वाचे दस्तऐवज मात्र दिले होते. पुढें प्रिन्स व डेलकासी यांची गांठ पडली, तेव्हां या दस्तऐवजांपैकीं एकांतील मजकूर आह्मांस कळला.

तारीख ९ नवंबर रोजीं रात्रीं काउन्टेसकडून एक तार मला आली. ती माझ्या हॉटेलांत मला मिळाली. ती उघडून पाहतां तींत पुढील मजकूर मला आढळला.

" परत या. डी क्यांप येथें आले. आपल्या मित्राची भेट घेणार. "

डी क्यांप म्हणजे डेलकासी हें माझ्या ध्यानांत आलें. नाइस शहर सोडून डेलकासी तिकडे केव्हां गेले, हें मला समजलें नाहीं. काउन्टेसच्या तारेंत 'आपला मित्र' असे शब्द होते, त्यांचा अर्थ प्रिन्स हें वाचकांच्या लक्षांत आलें असेलच. क्षणाचाहि विलंब न लावतां एक भाड्याची मोटार करून मी ताबडतोबीनें मॉन्ट कार्लो येथें गेलों. पहांटे तीन वाज-

ण्याच्या सुमारास मी मॉन्ट कार्लो येथील माझ्या हॉटेलच्या खोलींत गेलों, तों काउन्टेसची दासी माझ्या येण्याची वाट पाहत बसली होती, असें मला आढळून आलें. डेलकासी व प्रिन्स यांजमध्यें झालेल्या भाषणाचा थोडासा महत्त्वाचा भाग या दासीनें मला सांगितला. काउन्टेस यांनीं सकाळीं दहा वाजतां एका बागेंत नेमलेल्या ठिकाणीं माझी भेट घ्यावी असा निरोप त्यांना पोंचविण्यास सांगून त्या दासीला मीं रजा दिली. ज्या बागेचें नांव मीं कळविलें होतें, तींत पुष्कळ लोकांची नेहमीं गर्दी असल्यामुळें तें ठिकाण गुप्त भेट घेण्यास योग्य असें आहे, असें कोणाच्याहि मनांत आलें नसतें. याकरतांच ही जागा मीं पसंत केली होती.

ठरल्याप्रमाणें काउन्टेस यांनीं माझी भेट घेतली आणि डेलकासी व प्रिन्स यांच्या भाषणांतील बराचसा मजकूर त्यांनीं मला सांगितला. आपलें पूर्वींचें हॉटेल सोडून काउन्टेस हॉटेल लॉंड्रेसमध्ये राहवयास गेल्या होत्या. त्यांची खोली प्रिन्सच्या खोलीशेजारींच असल्यामुळें प्रिन्सच्या खोलींत होणारें संभाषण आपल्या कानीं पडावें अशी युक्ति त्यांना योजतां आली. या भाषणांतील कांहीं कांहीं भाग काउन्टेसच्या कानीं न येणें स्वाभाविकच होतें. तथापि जो कांहीं भाग त्यांच्या कानीं आला, तो मात्र अत्यंत महत्त्वाचा होता, यांत शंका नाहीं.

इंग्लंडच्या संमतीनें फ्रान्स आणि रशिया यांजमध्यें विशेष एकोपा होण्याचें घाटत आहे, असें या बातमीवरून मला उघड दिसून आलें. प्रिन्स आणि डेलकासी यांची आणखी एक भेट त्याच दिवशीं संध्याकाळी पांच वाजतां होणार आहे, अशी बातमी काउन्टेस यांनीं मला दिली. या दुसऱ्या भेटीच्या वेळीं होणाऱ्या भाषणांतील सर्व मुद्दे आह्माला कळणें अगत्याचें असल्यामुळें तशी खटपट करण्यास मीं काउन्टेस यांस बजावलें. यानतर संध्याकाळीं सात वाजतां काउन्टेस यांनीं मला त्याच बागेंत त्याच जागीं भेटावें असें ठरवून मी घरीं परत आलों.

घरीं आल्यानंतर मीं हॉटेलचे पैसे चुकते केले आणि सर्व सामानसुमान स्टेशनावर पाठवून मिलनचें ( इटली ) एक तिकीट घेऊन

ठेवलें. प्रसंगीं एकदम पळून जाण्याची वेळ आली, तर एकाद्या मित्र-राष्ट्रांत चटकन् निघून जाण्याची तयारी आगाऊ करणें, हें नेहमींच इष्ट असतें. या प्रसंगीं अगदीं जवळचें मित्रराष्ट्र इटली हेंच होतें. कदाचित् कांहीं भानगड उपस्थित झाली असती, तर, फ्रान्स देश ओलांडून जाणें शक्यच नव्हतें. जवळच्या स्वित्सरलंड देश स्वतंत्र आहे, तरी सरकारी-रीत्या मला तेथें अडकवून ठेवण्यास तेथील सरकारनें कमी केलें नसते. आतां आपल्या देशांत आलेल्या परदेशस्थ राजकीय गुन्हेगारास ते त्या परदेशाच्या सरकारच्या ताब्यांत देत नाहींत ही गोष्ट खरी; तथापि तेथे अडकून राहणें हें सुद्धां अनिष्टच होतें; पण इटलींत पाय ठेवल्यावर माझ्या सुरक्षितपणाबद्दल प्रश्नच नव्हता. जर्मनींतून थोडीशी सूचना मिळतांक्षणींच इटलींतून मला सोडून देण्यांत आले असतें, याबद्दल मला शंका नव्हती. मिलनचें तिकीट मीं यासाठीं घेतलें होतें.

संध्याकाळीं सात वाजेपर्यंत गांवांत इकडे तिकडे भटकून मीं कसा तसा वेळ काढला आणि नेमलेल्या वेळीं नेमलेल्या ठिकाणीं जाऊन मीं काउन्टेसच्या आगमनाची वाट पाहत बसलो. वेळ अतिशय कंटाळवाणा वाटूं लागला. तासामागें तास जाऊ लागले, तरी काउन्टेस येण्याचीं चिन्हे दिसेनांत. कर्मगतीसाठीं विड्या ओढता ओढतां मी थकून गेलो. अनेक प्रकारच्या कुशंका माझ्या मनांत येऊ लागल्या. अशा गोष्टींत एकादी लहानशी अडचणसुद्धां पर्वतप्राय भासूं लागते.

मी एकाच जागीं फार वेळ बसून राहिल्यामुळे एकाद्याला माझ्याबद्दल शंका येण्याचा संभव होता. अशी शंका येऊं नये म्हणून जवळच असलेल्या एका लठ्ठ स्त्रीबरोबर मी गप्पा मारूं लागलो. तिनेंहि मजकडे वांकड्या डोळयानें पाहून हंसण्यास सुरुवात केली. आह्मा उभयतांमध्यें होत असलेले हे संकेत बऱ्याच लोकांच्या लक्षांत आले. विशेषतः जवळच्या पहारेकरी आह्मांकडे पाहून हंसू लागला. माझ्या दृष्टीनें हे फार चांगलें झालें. कारण कोणी मनुष्य एकाच जागीं फार वेळ कामाशिवाय बसून राहिला, तर तो कोणीतरी गुप्त खलबतें करणारा असावा, अशी शंका साहाजिकच उद्भवते.

माझें लक्ष साहजिकच बागेच्या फाटकाकडे गेलें. तों काउन्टेसची दासी मला खुणेनें बोलावीत आहे, असें मला दिसलें. जवळच्या प्रिय-पात्राची रजाहि न घेतां मी एकदम फाटकाकडे धांवत सुटलो. दहा उड्यांत मी त्या दासीजवळ गेलो आणि तिला म्हटलें, " कांहीं विशेष खबर आणली आहेस काय ? "

" नाहीं. पण बाईसाहेबांना तुमची भेट घेणें जरूर आहे. कोठे भेटाल, ते त्यांनीं विचारलें आहे.

काउन्टेसची योजना फारच चातुर्याची होती आणि ती माझ्या फारच पसंतीस पडली. स्टेशनजवळील एका काफीपानगृहांत काउन्टेस यांना येण्यास सांगून मीं चटकन् एका गाडींत उडी मारली आणि त्या काफी गृहाचा रस्ता धरला. थोड्याच वेळाने काउन्टेसबाईंची स्वारीहि तेथें आली. माझ्या जवळील एका खुर्चीवर त्या बसल्या आणि मला एक गुलाबाचें फूल देण्याच्या मिषाने त्यांनी चटकन् एक कागदाचें पुडके माझ्या हातीं दिलें. नंतर त्या हळूच ह्मणाल्या, " मला मिळालेली बातमी इतकीच, पण ती तुमच्या कामागिरीला पुरेशी आहे. मी उद्यां रात्रीं रोमला जाईन. सलाम. "

मीं खिशांतून घड्याळ काढून पाहिलें, तों मिलनची गाडी निघण्यास अगदीं थोडा अवकाश होता, असें मला दिसून आलें. ताबडतोब स्टेशना-वर येऊन मी गाडींत बसलों. गाडी चालू झाल्यावर काउन्टेसनीं दिलेले कागद बाहेर काढून मीं ते वाचून पाहिले. नोटपेपरच्या आकाराचे ते दोन तुकडे असून त्यांजवर राजघराण्याच्या मोर्तबाचा उठाव छापलेला होता. त्यांत कांहीं तुटक वाक्यें लिहिलेलीं असून कांहीं तारखांचे आंकडे आणि कांहीं नावेंहि लिहिलेलीं होतीं. हा सर्व मजकूर प्रिन्स—आणि डेल-कासी यांनीं खुद्द स्वहस्तेंच लिहिलेला होता. फ्रान्सचे प्रेसिडेंट आणि रशियाचे झार यांजमध्यें गुप्त भेट होण्याचें ठरलें असून ती भेट कोठें व्हावी, व त्या प्रसंगीं कोणत्या मुत्सद्यांनीं हजार रहावें याचा खुलासा या कागदांवरून व काउन्टेसनें ऐकलेल्या त्या दोघां मुत्सद्यांच्या भाषणावरून मला सहज करतां आला. क्रोन्स्टाड बंदरांत झारच्या स्टांडार्ट नांवाच्या

नौकेवर ही भेट होणार होती; पण ही भेट होण्याची वेळच आली नाहीं. ती होण्याच्या पूर्वींच केसर यांनीं मोरोको प्रकरण अचानकपणें हातघाईस आणल्यामुळें ही भेट मागें पडली.

मिलनहून मी तावडतोब बर्लिन येथें गेलों आणि अठ्ठेचाळीस तासांच्या आंत ते कागदपत्र काउन्ट फॉं वेडेल यांच्या स्वाधीन मीं केले. त्यांजकडून ते केसरच्या हातांत तावडतोब गेले असले पाहिजेत हें उघडच आहे. माझ्या या कामगिरीचा एकंदर मुद्दा असा.

मोरोको प्रकरण हातघाईस येऊं पहात होतें. सामदामाने अथवा दंड-भेदाने त्याचा निकाल जर्मनीस लवकरच लावावा लागणार, अशीं चिन्हें स्पष्ट दिसूं लागलीं होतीं. या कामगिरीवर माझी नेमणूक होण्यापूर्वी पुष्कळशा गोष्टी स्पष्ट झालेल्या नव्हत्या. फ्रान्स, रशिया, आणि इंग्लंड, यांचें मेतकुट आहे कीं काय, याबद्दल केसरच्या मनांत प्रबळ शंका होती. फ्रान्सबरोबर युद्धाचा प्रसंग आल्यास कोणतीं राष्ट्रें तटस्थ राहतील याचा अजमास जर्मन बादशहास लागला नव्हता. माझ्या कामगिरींत या संशयाचें बरेंचसें निराकारण झालें. सर एडवर्ड ग्रे यांनीं डेलकासी यांस पाठविलेला निरोप आणि डेलकासी व रशियाचे प्रिन्स यांजबरोबर झालेलें खलबत याजवरून या प्रश्नाचा बहुतांशीं निकालच लागल्यासारखें होतें.

पण ही संधि कितपत टिकाऊ आहे, याबद्दल जर्मनबादशहाला शंका होती. अखेरपर्यंत फ्रान्सला इंग्लंड आपला पाठिंबा देईल कीं काय याबद्दल केसरला शंका होती. या शंकेचें निराकरण करून घेण्याकरतां त्यांनीं मुत्सद्देगिरीचा एक विलक्षण डाव टाकला. त्यांनीं मोरोको प्रकरण एकदम हातघाईस आणलें. प्यांथर या नांवाचें आपलें लढाऊ जहाज अगादीर बंदरांत पाठवून इंग्लंड आणि फ्रान्स यांस परस्परांमधील संधीचें स्वरूप उघड करावयास त्यांनीं लावलें. हें प्रकरण अगदीं युद्धावर आलें असतां वेळीं युद्ध कसें टळलें याची खरी हकीकत फक्त चार इसमांस मात्र ठाऊक आहे. प्यांथर जहाजाचा कप्तान, फॉं वेडेल, केसर आणि शेवटीं मी इतक्यांनाच हें रहस्य त्या वेळीं ठाऊक होतें. युद्धाच्या भयंकर प्रसंगांतून त्या वेळीं युरोप कसें निभावलें, याची हकीकत मी लवकरच सांगेन.

हो ! बरी आठवण झाली. मॉन्ट कार्लो येथें रशियाचे प्रिन्स यांनीं जी मुत्सद्देगिरी दाखविली, तिजबद्दल बाक्षिसादाखल सैबिरियांतील एका प्रांतांत झार यांनीं त्यांची नेमणूक केली.

---

## प्रकरण सातवें.

# केसर युद्ध टाळतात.

साऱ्या जर्मनीभर हवामान मोठें सुंदर होतें. बर्लिन तर मला प्रति-स्वर्गासारखें वाटत होतें. आतां चांगली विश्रांति घेऊन खूप चैन करावी असा निश्चय मीं केला होता आणि हा निश्चय पार पाडण्यास माझा खिसाहि चांगला गरम होता. बराच काळ बाहेर काढून मी जर्मनींत परत आलों, ह्मणजे माझी स्थिति अगदीं वेड्यासारखी होऊन जात असे. किती चैन करावी आणि किती करूं नये, याचा विचारच मला रहात नसे. शहरांत मिळणाऱ्या साऱ्या मौजाचा उपभोग एकाच दिवसाच्या अवधींत घ्यावा अशी माझी वृत्ति बनलेली असे. या वृत्तीला अनुसरून अनेक बेत मीं मनांतल्या मनांत योजीत होतों. बागेंतून सहल करणें, निरनिराळ्या राजशाही थाटाच्या उपाहारगृहांत जाऊन मेजवान्या झोडणें, आणि नाटकें नाच इत्यादिकांत दंग होणें, अशा प्रकारचा ' प्रोग्राम ' मीं योजिला होता. बर्लिन मध्यें फार दिवसांनीं मी परत आलों ह्मणून युरोपांतील राजकीय गुंतागुंतीपेक्षां हाच ' प्रोग्राम ' मला फार पसंत पडला होता. त्या दिवशीं दुपारीं अंटर डेन लिंडनवरील सरदारी काफीपानगृहांत मीं बराच वेळ काढला. नंतर पुढील कार्यक्रम मनांत योजून मी तेथून घरीं आलों.

माझा छोकरा किम हा माझी वाट पहातच बसला असावा, असें मला वाटलें. मी दार उघडून आंत जाण्यापूर्वींच त्यानें तें उघडलें आणि म्हटलें, " धनीसाहेब, टेलीफोनवर तुह्मांला बोलावणें आलें आहे; नंबर ८ ११ तुह्मांला बोलावीत आहे. "

टेलीफोनचें नांव निघाल्याबरोबरच माझें चित्त अस्वस्थ झालें. आणि किमनें तो नंबर उच्चारतांच माझ्या छातींत धस्स झालें. बिसमिल्ला! माझ्या साऱ्या चैनी, नाटकें आणि नाच हीं सारीं मनांतल्या मनांतच जिरलीं. जर्मनीच्या बाहेरचे रस्ते माझ्या नजरेसमोर दिसूं लागले. ए ११ चें बोलावणें ह्मणजे पकडसमानच. तेथें टाळाटाळ किंवा विलंब कामाचा नाहीं. जर्मनीच्या परराष्ट्रीय खात्याचा टेलीफोन नंबर ए ११ असा आहे.

यंत्राकडे जाऊन मीं ताबडतोब ए ११ शीं भाषण सुरू केलें. रात्रीं साडेदहा वाजतां वुइलहेल्मस्ट्रासींत हजर राहण्याबद्दल मला हुकूम झाला. कदाचित् एकाद्या लांबच्या प्रवासाला जाण्याची वेळ येईल, असें वाटून तदनुरूप बांधाबांधी करून मीं सर्व तयारी केली.

रात्रीं दहा वाजता पोषाख करून मी खुर्चीवर थोडा आडवा पडलों. थोडा वेळ झोंप घेण्याचा माझा विचार होता. वुइलहेल्मस्ट्रासींतील रात्रींचीं खलबतें पुष्कळ वेळां अनपेक्षितपणें लांबचा प्रवास करावयाला लावतात, असें मला माहीत होतें. खुर्चीवर पडल्या पडल्या युरोपांतील एकंदर परिस्थिति मनातल्या मनांत मी न्याहाळून पहात होतों. आतांच एवढें मोठें कोणतें प्रकरण उपस्थित झालें असावें? एकाद्या प्रचंड कामागिरीवर माझी योजना व्हावी, अशी माझी फार इच्छा होती. मला बारीकसारीक कामगिऱ्यांची आवड नव्हती. जींत राजमुगुट ढांसळून पडणार, अथवा नकाशांचे रंग फिरणार अशी कामागिरी मला पाहिजे होती.

इ. स. १९११ चा जून महिना युरोपांतील साऱ्या प्रधानमंडळांस फार जड गेला होता. जर्मनी आणि फ्रान्स हे एकमेकांवर गुरगुरत होते. फ्रान्स तर छाती अगदीं वर करून सर्व राष्ट्रांकडे पहात होता. त्याचे हातपाय वळवळत असावेत असें उघड दिसत होतें. फ्रान्सच्या वर्तणुकींत एक मुद्दा होता. प्रामाणिक जॉन बुलचा त्याला पूर्ण पाठिंबा होता. त्या वेळीं युरोपांतील सर्व वातावरण मोरोक्को आणि युद्ध या विषयांनीं दुम-दुमून गेलें होतें. जर्मनींत युद्धाचा पक्ष प्रबळ होत चालला होता. युद्ध सुरू करण्यास केसरला भाग पाडावें, असे विचार या पक्षाच्या मनांत

घोळत होते. या पक्षात सैन्य आणि आरमार यांतले पुढारी आणि पुष्कळसे दारूगोळ्याचे कारखानदार इत्यादि लोकांचा समावेश झाला असून त्यांना लोकांचेंहि थोडेंफार पाठबळ मिळालें होतें. फ्रान्सबरोबर युद्ध सुरू करण्यासाठीं हा पक्ष जिवापाड मेहनत करीत होता.

रात्रीं साडेदहाचा ठोका पडला आणि वुइलहेल्मस्ट्रासींत मी हजर झालों. द्वाररक्षकास आपला नंबर कळवून पुढें काय होणार, याचा विचार करीत, मी तेथें उभा राहिलों.

इतक्यांत द्वाररक्षक परत आला आणि ग्राफ फॉ वेडेल यांच्या खोलींत मला घेऊन गेला. बाजूच्या दुसऱ्या एका खोलींत त्यांनीं मला व दुसऱ्या एका गृहस्थाला बसावयास सांगितलें. या गृहस्थाकडे मीं पाहिलें आणि त्यानें माझ्याकडे पाहिलें. बराच वेळ आम्हीं याप्रमाणें एकमेकांचें निरीक्षण केलें; पण आमच्या हेरखात्याच्या कायद्याला अनुसरून एकमेकांशीं आम्हीं भाषण केलें नाहीं. अशा रीतीनें सुमारें अर्धा तास गेल्यावर काउन्ट वेडेल यांच्या खाजगी खोलींत आह्मांस नेण्यांत आलें. एका वेळीं एकाच मनुष्याची भेट घ्यावयाची, असा वुइलहेल्मस्ट्रासीचा नियम असतां आह्मां दोघांसही एकदम बोलावण्यांत आलें, या गोष्टीचें मला मोठें नवल वाटलें. खरोखर कांहीं तरी अननुभूत प्रकार घडत असावा, असें माझें मन मला सांगूं लागलें. काउन्ट यांनीं आह्मां दोघांचें स्वागत केलें आणि परस्परांची ओळख करून दिली. माझ्याबरोबर असलेल्या गृहस्थाचें नांव हर्र फॉ सेंडन असें असून तो पूर्वीं एक लष्करी अम्मलदार होता.

काउन्ट ह्मणाले, "साडेअकरा वाजतां तुह्मांला एका दिवाणखान्यांत नेण्यांत येईल. दिवाणखान्याच्या मध्यभागीं गेल्यावर उजवीकडे वळून तुह्मी ताठ उभे रहा. तुह्मांला जे कांहीं प्रश्न विचारण्यांत येतील, त्यांचीं उत्तरें द्या; पण स्वतः अगदीं प्रश्न करूं नका अगर कांहीं टीकाहि करूं नका. तुह्मीं स्वतः अगदीं मूकवृत्ति स्वीकारली पाहिजे हें सांगावयास नकोच. समजलांत ?"

आम्हीं होकारार्थीं मान हलविली. इतक्यांत तळघरांतून एका मोठ्या

घंटेचा नाद आमच्या कानीं आला. ' तयार असा ' इतकेच शब्द बोलून काउन्ट तेथून अदृश्य झाले. थोडक्याच वेळांत ते परत आले आणि आपल्या मागोमाग येण्यास त्यांनीं खुणाविलें. काउन्टचा चेहरा नेहमीं-पेक्षांहि आज अधिक गंभीर दिसत होता. एक जिना उतरून आम्ही खालीं गेलों, व एका लांबचलाब दालनांतून पुढें जाऊं लागलों. त्या मार्गाच्या शेवटीं दोन पहारेकरी उभे असल्याचें दिसलें. आम्हीं परस्परांशीं एक शब्दहि न बोलतां त्या पहारेकऱ्यांपर्यंत चालत गेलों. तेथें एक भक्कम ओक लांकडाचा दरवाजा आम्हांस दिसला. दरवाज्याच्या आंतल्या बाजूस आणखी एक पहारेकरी होता. दरवाजापासून थोड्याशा अंतरावर आह्मां दोघास उभे करून काउन्ट पुढें गेले आणि त्यांनीं दरवाजावर टिचकी वाजविली. दरवाजा उघडला आणि आह्मांस हुकूम झाल्याप्रमाणें आम्ही दोघेहि त्या खोलीच्या मध्यापर्यंत चालत जाऊन तेथें उभे राहिलों. त्या खोलींत मोठे दिवे लावून भरपूर प्रकाश केला होता; पण त्या खोलीच्या आंतल्या बाजूस दुसरी एक खोली होती, तींत फक्त एकच दिवा दिसत होता आणि त्यावर हिरव्या रंगाचें आच्छादन असल्यामुळें खोलींत उजेड बेताचाच होता. मध्यभागीं एक लिहिण्याचें मोठें टेबल असून टेबलाच्या मागील खुर्चीवर एक व्यक्ति बसली होती. माझ्याबरो-बरच्या सोबत्यानें या टेबलाकडे नजर फेंकली आणि त्याबरोबर कांहीं भीति व कांहीं आश्चर्य याचा मिश्र ठसा त्याच्या चेहऱ्यावर स्पष्ट दिसू लागला. माझ्या सोबत्याची अशी स्थिति कां झाली, हें लवकरच माझ्या लक्षांत आलें. त्या टेबलाच्या मागील खुर्चीवर जर्मनीचे बादशहा दुसरे वुइलियम हे बसलेले होते.

पांच मिनिटेंपर्यंत चकार शब्दहि न काढतां आम्ही दगडी पुतळ्या-सारखे तटस्थ उभे होतों. बादशहा कांहीं लिहिण्यांत अगदीं गुंग होऊन गेलेले दिसले. मी स्वतः भित्रा आहें असें नाहीं. त्यांतून जो धंदा मीं स्वीकारला होता, त्यांत मनुष्य एकवार मुरला ह्मणजे तो पक्काच निगरगट्ट बनतो. पण त्या वेळच्या स्थितींत माझ्या मनांत सुद्धां थोडी-फार गडबड सुरू झाली. खुद्द बादशहाच्या समोर फार वेळ तटस्थ उभें

राहणें हें मोठ्याशा सुखाचें खास नव्हे. युरोपखंडाच्या या कार्तिकस्वामी-कडे जों जों मी टक लावून पाहूं लागलों, तों तों साऊथ आफ्रिकेंतील एकाद्या डोंगरी गुहेंत जाऊन बसण्याची इच्छा मला अधिकाधिक होऊं लागली.

एकाएकीं बादशहांनीं वर मान केली आणि उच्च व स्पष्ट स्वरांत ते ह्मणाले, " वेडेल, पहिल्यालाच घेऊन या. "

माझा सोबती हर्र सेंडन यास एकदम बाहेर नेण्यांत आलें. या कामगिरीवर त्याची योजना होत नाहीं असें स्पष्ट दिसलें. या सेंडनला मीं पुढें केव्हांहि पाहिलें नाहीं.

बादशहाच्या खुर्चीपासून तीन पावलांच्या अंतरावर मी पुढें जाऊन उभा राहिलों. या वेळीं फक्त तीन इसम त्या खोलींत होते. बादशहा खुर्चीवर बसलेले असून मेजाच्या उजव्या बाजूला काउन्ट वेडेल उभे होते व समोर मी उभा होतों. बादशहांना यापूर्वीं पुष्कळ वेळां मीं पाहिलें होतें; पण इतक्या जवळून त्यांस पाहण्याचा हा माझा पहिलाच प्रसंग होता. कांहीं कागद वाचण्यांत बादशहा अगदीं गढून गेले होते, असें दिसलें. त्यांच्या चेहऱ्यावर उत्तम प्रकृतीचें तेज दिसत होतें; पण त्यांच्या तजाविरीवरून त्यांच्या वयाबद्दल जी कल्पना होते, त्याहून ते अधिक वयाचे दिसत होते. त्यांच्या चेहऱ्यावर धुसर पिंगट रंगाची छटा आली होती. या वेळीं त्यांच्या चेहऱ्यांत फ्रेडरिक दी ग्रेटच्या चेहऱ्याचें विलक्षण साम्य दिसत होतें आणि उतार वयामुळें तर या साम्यांत अधिकच भर पडली होती. त्यांच्या डोळ्यांत एक विलक्षण तेज चमकत होतें. त्यांच्या कोणत्याहि चित्रावरून त्यांच्या डोळ्यांतील तेजाची कल्पना करतां येणें शक्य नाहीं. उंची पोलादाला निळ्या रंगाचें पाणी चढविलें, ह्मणजे जसें तें दिसतें, तसा त्यांच्या डोळ्यांचा रंग आहे. ते कोणाकडे पाहू लागले, ह्मणजे जणूं काय त्याच्या अंतःकरणाचा ते ठाव काढीत आहेत, असें वाटतें. त्यांच्या नजरेंतील हा विशेष वर्णनानें सांगतां येण्यासारखा नाहीं. आजपर्यंत दुसऱ्या फक्त चारच व्यक्तींचे डोळे असे आहेत, ही गोष्ट माझ्या लक्षांत आली. लॉर्ड किचनर, टय़ूफिक पाशा, सेसिल

ऱ्होड्स् आणि लि हुंग चंग या त्या चार व्यक्ति होत. जगाचें धनीपण आपण प्राप्त करून घेणार अशी त्यांची आत्मगत श्रद्धा या त्यांच्या नेत्र-तेजावरून उघड होते.

बादशहांनीं वर मान करून माझ्याकडे पाहिलें आणि थोड्या कर्कश आवाजांत मला ह्मटलें, " तुह्मी नौकरींत किती वर्षें आहां ? "

" तीन वर्षें, सरकार. "

" मोरोक्को तुह्मांला माहीत आहे काय ? "

मोरोक्को ! फ्रान्स आणि जर्मनी ज्याबद्दल युद्धांत पडण्याच्या रंगांत आले आहेत, तेंच हें प्रकरण ! मी म्हणालों, " होय, सरकार. "

" तुह्मी मोरोक्कोंत किती दिवस होता ? "

" सुमारें बारा महिने, सरकार. "

बादशहांचा कांहींच निश्चय होईना असें दिसलें. मी तर अगदीं घाबरून गेलों होतों. मोरोकोबद्दल कांहींच विचार त्या वेळीं माझ्या मनांत येत नव्हते. केसर यांच्या पोषाखाकडेच मी टकमकां पहात होतों. ग्रेने-डियर गार्ड पालटणीच्या कर्नलचा पोषाख या वेळीं त्यांनीं केला होता, त्यांचा निश्चय झालासें दिसलें. पुनः एकवार मजकडे पाहून ते ह्मणाले,

" केड म्याकलीनची व तुमची ओळख आहे काय ? "

" होय, सरकार. "

" त्याची व तुमची ओळख कशी झाली ? "

" सर हॅरी केड म्याकलीन यांच्या मी थोडासा उपयोगीं पडलों होतों. मोरोकोच्या सुलतानाकडे ते त्या वेळीं मुख्य सेनापति होते. "

माझ्या उत्तरानें बादशहांस संतोष झाल्यासारखें दिसलें. ते म्हणाले, " तुह्मी त्यांच्या उपयोगीं पडला या गोष्टीचें आतां त्यांना स्मरण असेल काय ? "

थोडा वेळ थांबून मीं उत्तर दिलें, " सरकार, दुसऱ्याच्या स्मरण-शक्तीबद्दल मी कशी खात्री देऊं ? शिवाय याबद्दल त्या केडची परीक्षा व्हाणें मला बरें वाटत नाहीं. "

बादशहांची मुद्रा थोडी चमत्कारिक झाली. तथापि माझ्या उत्तरानें

त्यांना संतोष झाला. मग काउंट वेडेलकडे वळून ते ह्मणाले, " हा गृहस्थ ठीक आहे. सारे कागदपत्र तयार करा. "

यत्किंचित्हि गडबड न करतां काउंट आंतल्या खोलींत एकदम निघून गेले. माझ्याकडे रोंखून पाहून बादशहा ह्मणाले, " तुमच्याजवळ कांहीं सरकारी कागदपत्र देण्यांत येतील; पण त्याशिवाय प्यांथर जहाजाच्या कप्तानाला एक निरोप तुह्मी तोंडीं कळवा. या निरोपांतील मजकूर तुह्मी पाठ करून घ्या. " असे ह्मणून बादशहांनीं कागदाचा एक तुकडा माझ्या हातीं दिला आणि ते पुढे बोलूं लागले. " तुह्मी कोणत्या कामागिरीवर जात आहांत याची बातमी काउट वेडेलशिवाय दुसऱ्या कोणासही कळतां उपयोगी नाहीं. प्यांथर जहाजावरच्या कप्तानाला माझा एक निरोप तुह्मी तोंडीं कळविणार आहांत, ही गोष्ट सुद्धां कोणासहि कळतां उपयोगी नाहीं. समजलांत ? "

" होय, सरकार. "

बादशहांनीं एकाएकीं आपलीं कोपरें पुढील मेजावर टेंकून दोन्ही हातावर आपलें तोंड ठेवलें आणि काहीं तरी गूढ विचारांत ते निमग्न झाल्यासारखे दिसले. या वेळीं ते अगदीं वृद्ध झाल्यासारखे दिसत होते. चिंतेची स्पष्ट छटा त्यांच्या चेहऱ्यावर दिसत होती. सारें जर्मनराष्ट्र युद्धासाठीं आतुर झालें आहे ही गोष्ट मला एकाएकीं आठवली. प्यांथर ! हें लढाऊ जहाज त्या वेळीं स्पेनच्या किनाऱ्यावर होतें. भूमध्यसमुद्रांतून मोरोकोला जाण्यासाठीं तें अगदीं उतावीळ झालें होतें. याच जहाजाच्या कप्तानाला बादशहांचा निरोप मला कळवावयाचा होता.

बादशहानीं दिलेला कागद मीं उघडून पाहिला आणि त्यांतला मजकूर मनातल्या मनांत पाठ करूं लागलों. मी अगदीं आश्चर्यचकित झालों. बादशहा इतके चिंतामग्न कां झाले, याचें कारण माझ्या लक्षांत आलें. जहाजावरच्या कप्तानास हा मजकूर तोंडींच कळविण्याचें कारण काय होतें, हेंहि मी आतां समजलों. घाईघाईनें तो मजकूर मीं पाठ केला. इतक्यांत काउंट वेडेल परत आले, व बादशहांशीं अगदीं हलक्या

आवाजांत कांहीं कुजबुजूं लागले थोड्या वेळानें मजकडे पाहून बादशहा मला ह्मणाले, " मजकूर पाठ केला काय ? "

" होय सरकार. " बादशहांनीं तो कागद माझ्या हातून घेतला व काडी पेटवून तो सर्व जळून जाईपर्यंत त्यांनीं तो काडीवर धरला होता. त्यांनीं मला एकदम निघून जाण्याची खूण केली व आम्ही दोघे–मी व वेडेल–तसेच दरवाज्याकडे मागें हाटत गेलों. या वेळीं बादशहांचें एक प्रचंड रहस्य माझ्या हातांत सांपडलें होतें. हें रहस्य जाणण्याकरतां फ्रान्स आणि इंग्लंड यांच्या प्रधानमंडळांनीं आणि जगांतल्या कांहीं सट्टेबाज व्यापाऱ्यांनीं करोडो रुपये खर्च केले असते. बादशहास आपली पाठ न दाखवितां, आम्ही तसेच बाहेर पडलों.

एक उदास आणि जिच्या चेहऱ्यावर वृद्धपणाची छाया आली आहे, अशी व्यक्ति तेथें मी पहात होतों. एवढेंच आतां माझ्या स्मरणांत राहिलें आहे. जर्मनीची सारी प्रजा निद्रेच्या शांत सुखाचा अनुभव घेत असतां त्या प्रजाजनांचे बादशहा मध्यरात्रीच्या भयाण वेळीं परराष्ट्रीय कचेरीच्या तळमजल्यांत आपल्या राज्यनौकेची दिशा निश्चित करीत होते! या दिशेचा सुगावा काउन्ट वेडेल यांस आणि कदाचित् युवराज यांसच असला तर असेल.

दरवाजांत अखेरची कुर्निसात करून आम्ही बाहेरील दिवाणखान्यांत आलों आणि तो ओक लांकडाचा मजबूत दरवाजा बंद झाला. वेडेल मला आपल्या खाजगी खोलीकडे घेऊन गेले. मोहोरबंद केलेलें एक कागदाचे पुडकें त्यांनीं माझ्या हातीं दिले आणि ते म्हणाले, " डॉक्टर, ही कामगिरी अत्यंत महत्त्वाची आहे, हें ध्यानांत धरा. युद्धाचा प्रसंग उद्भवणार अशीं चिन्हें दिसूं लागलीं आहेत. या प्रकरणाच्या मुळाशीं कोण आहे, याबद्दल थोडासा संशय आह्मांला आलेलाच आहे; पण त्याचें निराकरण करून घेतलें पाहिजे. या साऱ्या भानगडीची माहिती तुह्मांला आहेच; तेव्हां तुह्मांला अधिक कांहीं सांगावयाला पाहिजे, असें नाहीं. येथें सुद्धां एक पक्ष बादशहाला युद्धांत ओढण्यास खटपट करीत आहे, हें सुद्धां तुह्मांला ठाऊक आहेच. हे सरकारी कागद प्यारीस येथील

जर्मन वकिलातींत द्या. ते उद्यां दुपारपर्यंत तेथें पोंहोंचलेच पाहिजेत. पहांटे तीन वाजतां तुह्मी निघालां, म्हणजे दुपारपर्यंत प्यारीस गांठाल. प्यारीसच्या [illegible] तुह्मांला दुसरें पुडकें मिळेल, तें घेऊन तुह्मी माद्रिद ( स्पेन ) ला जा. हें दुसरें पुडकें तेथें दिल्यानतर प्यांथर जहाजावर जाण्यास तुह्मी मोकळे व्हाल. हें जहाज सध्यां बार्सिलोनाच्या बंदरांत आहे. या जहाजावरची कामगिरी संपली म्हणजे तुह्मी जिब्राल्टरला जा आणि तेथें ब्रिटिश काफिला किती मोठा आहे, आणि त्याची तयारी कशी काय आहे, याची चवकशी करा. " थोडा वेळ थांबून कौंट पुढें म्हणाले, " या कामगिरीला लागणाऱ्या पैशासाठीं तुह्मी सरकारी तिजोरीवर जाऊं नका. या वेळचा तुमचा खर्च बादशहांच्या खाजगी तैनातींतून दिला जाईल. फ्रेंच आणि स्प्यानिश नाणीं थोड्या वेळानें मी तुमच्या घरींच पाठवून देतों. सर्व बरोबर ध्यानांत आलें ना ? प्यांथरच्या कप्तानाला तोंडी सांगावयाचा बादशहांचा निरोप तुह्मी विसरणार नाहींच. "

सर्व कामगिरी माझ्या बरोबर ध्यानांत आली, असें कौंट यांना सांगून व त्यांचा निरोप घेऊन मी एकदम आपल्या बिऱ्हाडीं आलों. माझा नौकर प्रवासाची सर्व बाबाबाधी करीत असल्याचें दिसलें. अशा प्रकारच्या प्रवासाला फारशा सामानाची जरूर नसते. थोडेसे पायजमे, एखादा डोक्याचा ब्रश, एक दोन वस्तरे, आणि एक दांत घासावयाचा ब्रश एवढ्या सामानावर मीं पृथ्वीचा पाऊण हिस्सा पालथा घातलेला आहे. मी आपल्या खिशांत सहा बारी पिस्तुल कधींच बाळगीत नाहीं. स्वतःच्या संरक्षणासाठीं म्हटलें, तर थोडी मिरच्यांची पूड, तपकीर आणि दुसरीं एक दोन रसायनें इतक्या चिजा बस्स होतात. आपल्यावर कोणीं हल्ला केलाच, तर यांपैकीं एखादी चीज त्याच्या तोंडावर उधळून दिली, म्हणजे आपला कार्यभाग होतो.

थोड्याच वेळानें वेडेल यांचा एक दूत पैशाच्या थैल्या घेऊन आला. यांत फ्रेंच आणि स्प्यानिश नाणीं भरलेलीं होतीं. पहांटेची गाडी निघण्यास अद्याप अर्ध्या तासाचा अवकाश होता, ह्मणून स्टेशनावर जाण्यास मी पायानेंच निघालों. प्यारीसला जाणाऱ्या एक्स्प्रेस गाडींत गर्दी अतिशय

असते, यामुळें स्टेशनावर लौकर जाऊन आणि तेथल्या लोकांचे हात ओले करून चांगली जागा मिळविली नाहीं, तर या गाडींत प्रवाशांचे फार हाल होतात, असा माझा अनुभव होता. स्टेशनावर जाऊन मीं एक जागा पक्की केली आणि नंतर मी सर्व गाडीत फिरलो. आपल्या बरोबर कोण कोण प्रवास करीत आहेत, याचा शोध करण्याची माझी नेहमींचीच पद्धत असे, आणि सध्यांच्या प्रसंगीं असे करणें अधिकच अवश्य होतें. जर्मनींतल्या अगदीं अखेरच्या स्टेशनाच्या अलीकडल्या एका स्टेशनावर गाडी येऊन पोहोंचेपर्यंत विशेष महत्त्वाचे असे कांहीं घडलें नाहीं. या स्टेशनावर खिडकींतून डोके बाहेर काढून मी बाहेर पाहू लागलों, तों आमच्या शेजारच्या कम्पार्टमेंटांत तीन मनुष्यें चढत असल्याचे मला दिसलें. ही मंडळी सर्व एकत्रच प्रवास करीत असावी, हे उघड दिसत होतें. पलीकडल्या कम्पार्टमेंटांत जागाहि मुबलक होती. आतां गाडी सुरू होणार, इतक्यांत त्या मंडळींतिल एक स्त्री माझ्या कम्पार्टमेंटांत आली. ‘ शेजारच्या कम्पार्टमेंटांतिल एक गृहस्थ मला निष्कारण त्रास देत आहे, याकरितां तुह्मी माझ्या मदतीला चला, असे ती मला म्हणाली, तिचें ह्मणणें माझ्यानें अर्थातच नाकारवेना. तिचे सामान आपल्या कम्पार्टमेंटांत घेऊन येण्यासाठीं मी तिजबरोबर शेजारच्या कम्पार्टमेंटांत गेलो. तिच्या या कृत्यांत कांहीं गुप्त हेतु असेल अशी नुसती शंका सुद्धां मला हा वेळपर्यंत आली नव्हती. माझ्या प्रवासांत कोठून तरी व्यत्यय येईल अशी कल्पना करण्याचें कांहींच कारण नव्हतें. कारण माझ्या कामागिरीची माहिती कौंट वेडेल आणि खुद्द बादशहा यांशिवाय तिसऱ्याच्या कानीं गेली नव्हती. आतां [illegible] स्वरूप विलक्षण होतें आणि मला नेमलेल्या ठिकाणीं जाऊं न देण्यांत ज्याचा डाव साधणार असा एक पक्ष तेथें अस्तित्वांत होता, ही गोष्ट मात्र खरी.

शेजारच्या कम्पार्टमेंटांत जाऊन त्या स्त्रीच्या सामानाला मी हात लावतों न लावतों इतक्यांत एक गृहस्थ मोठ्यानें ओरडून ह्मणाला, “ अहो शिष्ट, माझ्या बायकोच्या सामानाला हात लावणारे, तुह्मी कोण ? ”

ती स्त्री माझ्या मागच्या बाजूला उभी होती. माझी पाठ तिच्याकडे

वळलेली होती; पण समोर लावलेल्या आरशांत तिचें प्रतिबिंब मला दिसत असल्यामुळें तिनें त्या गृहस्थाला केलेली खूण माझ्या नजरेस आली. अर्थात् या साऱ्या प्रकरणात कांहीं वेगळाच हेतु असावा, हें ताबडतोब माझ्या लक्ष्यांत आलें. हा सर्व बेत अगाऊच ठरविलेला होता, याबद्दल मला शंका उरली नाहीं.

ही मंडळी पुढे काय करणार, याचा उलगडा हळुहळू होऊं लागला. गाडीचा कन्डक्टर तेथे आला, तेव्हां ते ' नौरोजी ' पुढें झाले आणि ' याला या स्टेशनावर उतरून घ्या ' अशी त्यांनीं त्याला विनंति केली. या त्यांच्या विनंतीला दुसऱ्या गृहस्थानेहि दुजोराच दिला; पण गम्मत ही कीं माझ्या मदतीची अपेक्षा करणारी ती स्त्री सुद्धा त्यांना जाऊन मिळाली. सर्व हकीकत जशी घडली, तशी ती मीं कन्डक्टरला सांगितली; पण खालीं उतरण्याचें मात्र मीं साफ नाकारलें. कन्डक्टरने माझ्या कम्पार्टमेंटला कुलूप घातलें आणि पुढच्या कोलोनच्या स्टेशनला गाडी गेली ह्मणजे तेथें स्टेशनमास्तराच्या ताब्यांत तुह्मांला देण्यांत येईल, असें त्यानें मला बजावलें.

पुढच्या स्टेशनवर गाडी जाईपर्यंत या गोष्टीचा विचार करण्यास मला फुरसद मिळाली. खरें ह्मणाल, तर मला स्वतःचाच फार राग आला होता. गुप्त हेरांच्या खात्यात पुष्कळ कामागिऱ्यांचा अनुभव घेऊन मी या कामांतला अगदीं मुरब्बी ह्मणवीत होतों, अशा स्थितींत इतक्या सोप्या रीतीनें मी फसलों, याबद्दल माझा मलाच अतिशय राग आला. खरोखर म्हटलें, तर माझ्या शत्रूंनीं योजलेली युक्ति अतिशय साधी असल्यामुळेंच मी फसलों. मोठ्या कुशलतेनें केलेल्या योजना ज्याच्या चित्तांत सदोदीत असतात, त्याला अगदीं सोप्या सांपळ्याची युक्ति न समजली तर नवल नाहीं. आतां पुढें काय योजना करावी, याचा विचार मी करूं लागलों. असल्या भिकार आरोपावर फार वेळ ते मला अडकावून ठेवूं शकणार नाहींत, याबद्दल माझी खात्री होतीच. फार तर बर्लिनला एकादी तार दिली, कीं माझें काम होणार होतें. पण त्या गाडीनें मी पुढें न गेलों, तर दुसऱ्या दिवशीं संध्याकाळपर्यंत प्यारीसची मज़ल गांठणें मला शक्य नव्हतें.

आणि हुकुमाप्रमाणें मला तेथें दुपारींच पोहोंचणें अवश्य होतें. माझी बुद्धि तर अगदीं गुग होऊन गेली.

अशा महत्त्वाच्या प्रसंगीं थोडासा उशीर सुद्धां फार घातक होण्याचा संभव असतो. या सहा तासांच्या उशिरानें तर युद्धाग्नि भडकण्याचाहि संभव होता ! जर्मनींतला एक जोरदार तट युद्धांत पडण्यास उत्सुक होता. जर्मनीचें वातावरण युद्धाच्या प्रस्तावनेनें भरून गेलें होतें. एकाद्या सरकारी कामगाराची अगदीं क्षुल्लक चूक सुद्धां भडका उडविण्यास त्या वेळीं कारण झाली असती. फ्रान्सचें वातावरणहि चांगलेंच क्षुब्ध झालें होते. प्यांथर जहाजाच्या कप्तानाला बादशहांचा तोंडीं निरोप वेळींच न पोहोंचला, तर युद्धाग्नि भडकण्याचा संभव होता ! मला अशा रीतीनें अडकवून ठेवण्यांत या टोळीचा काय हेतु होता, हें माझ्या लक्षांत आलें; पण माझ्या कामगिरीचा सुगावा त्यांना कसा लागला, हें गूढ मात्र मला केव्हांहि उकलतां आलें नाहीं. मी वुईलहेल्मस्ट्रासींत जात असता त्यांनीं माझ्यावर पाळत राखली असावी आणि त्यांचें पुढील वर्तन बहुधा नुसत्या अनुमानधपक्यावरच झालेलें असावें.

रेलवेच्या टाईमटेबलाप्रमाणें एक्सप्रेस गाडी कोलोनच्या स्टेशनावर नऊ मिनिटें थांबावयाची; पण तेथल्या स्टेशन मास्तरनें या प्रसंगीं ती अकरा मिनिटें थांबविली. आम्ही सर्वजण खालीं उतरलों आणि स्टेशन-मास्तरच्या ऑफिसांत गेलों. स्टेशनमास्तरला जरा बाजूला बोलावून त्याना मीं आपल्या खात्याचा बिल्ला दाखविला. प्यारीस येथील जर्मन वकिला-तीसाठीं जें मोहोरबंद पुडकें मी घेऊन जात होतों तेंहि मीं त्याला दाख-विलें. हें पुडकें सरकारी रेशमी दोरीनें बांधलेलें असून त्याच्या पाठीवर परराष्ट्रीय खात्याची मोहोर उठविलेली होती. अशा रीतीची प्रस्तावना करून मीं स्टेशनमास्तरला ह्मटलें, "माझ्यावरचा आरोप किती क्षुल्लक आणि मूर्खपणाचा आहे, याचा तुह्मीच विचार करा. मी कोण याबद्दल तुमची खात्री पटत नसेल, तर वुइलहेल्मस्ट्रासीला माझ्या खर्चानें तार देऊन ती खात्री करून घ्या. तुह्मीं मला अडकवून ठेविलें, तर पुढच्या परिणामाची जबाबदारी तुमच्यावर राहील, हें लक्षांत ठेवा. सर्व खरी

हकीकत मीं तुम्हांला सांगितली आहे. तुमच्या कर्तव्याच्या आड मी येऊं इच्छित नाहीं; तथापि कोणत्याहि गोष्टीचा दूरवर विचार करण्याइतकी तुमची विचारशक्ति प्रबळ आहे, असें मला वाटतें. ”

स्टेशनमास्तरच्या मनांत कोणते विचार चालले असावेत, याची मला कल्पना करतां येण्यासारखी होती.

“ हा मनुष्य म्हणतो कीं आपण बादशहाचे दूत आहो. गाडी जर्मन हद्दीच्या बाहेर जाण्यास अजून आणखी तीन तास लागतील. हा म्हणतो त्याप्रमाणें जर तो बादशहांचा दूत नसला, तर त्याला सरहद्दीवर पकडण्यास पुरेसा अवकाश मिळेल. पण त्याला मीं येथें अडकावून ठेवलें आणि जर तो खरोखरच बादशहांचा दूत असला, तर मी मात्र फुकट पेंचांत सांपडेन. ” अशा प्रकारचे विचार आमच्या ‘ सुविचारी ’ मास्तरसाहेबांच्या मनांत घोळत असावेत.

अखेरीस आरोप अगदीं क्षुल्लक आहे, असें म्हणून त्यांनीं आम्हां सर्वांस बाहेर घालवून दिलें. यानंतर ही टोळी मला पुनः दिसली नाहीं. मास्तरसाहेब माझ्या कम्पार्टमेंटपर्यंत मला पोहोंचविण्यास आले आणि कोलोन स्टेशनापासून तों थेट फ्रेंच हद्दीपर्यंत माझ्या कंम्पार्टमेंटांत दुसरा कोणताहि उतारू आला नाहीं. प्यारीसला आल्याबरोबर रू द लिलेच्या भागांत असलेल्या जर्मन वकिलातींत जाऊन वुइलहेल्मस्ट्रासींतून आणलेलें पुडकें तेथील चिटणिसाच्या स्वाधीन करून त्याची पावती मीं घेतली. या ठिकाणीं माद्रिद येथील वकिलातीला देण्यासाठीं दोन खलिते माझ्या स्वाधीन करण्यांत आले. प्यारीसच्या जर्मनवकिलातींतून घेतलेली पावती ताबडतोब बर्लिनला मीं पोस्ट मार्फत रवाना केली. अशा प्रकारच्या पावत्या मुख्य खात्याला ताबडतोब पाठवून देणें नेहमींच इष्ट असतें. यानंतर कोणतेंहि संकट न येतां मी माद्रिदला पोहोंचलों. या गाडीला या दिवशीं चार तास उशीर झाला होता म्हणून त्या वेळीं वकिलातींत जाण्याचा माझा इरादा नव्हता; पण मी स्टेशनावर उतरतों तों वकिलातींतील एक मनुष्य मला भेटला. प्यारीसहून आणलेले कागद मीं त्याच्या स्वाधीन केले. त्याबद्दल त्याची पावती घेऊन आणि पूर्वींप्रमाणेंच बर्लिनला

ती रवाना करून मीं तावडतोब बार्सिलोनास जाणारी गाडी गांठली. या शहराच्या बंदरांत कोठें तरी प्यांथर जहाज पुढील हुकमाची वाट पहात बसलें होतें.

फार वेळ खटपट करून शेवटीं मीं एक होडी भाड्यानें ठरविली आणि प्यांथर जहाजाकडे जावयास निघालों. त्या वेळीं दिवस अगदीं पूर्ण बुडून गेला असून दिवसाच्या अखेरचा संधिप्रकाश मात्र शिल्लक उरला होता. बराच वेळ होडींतून गेल्यानंतर अखेरीस क्षितिजावर प्यांथर जहाजाची काळी पडछाया दिसूं लागली. प्यांथर ( चित्ता ) हें नाव या वेळीं मला किती विलक्षण वाटलें! या आमच्या चित्त्यानें एकच उडी चुकून मारली असती, तर साऱ्या युरोपभर केवढा हाहाःकार उडाला असता! मी जहाजाच्या जवळ येऊन पोहोचलों, तेव्हां जहाजावरच्या पहारेवाल्यानें आह्मांस लांब उभें राहण्यास सांगितलें. मला कप्तानाला भेटावयाचें आहे, असें मीं मोठमोठ्यानें ओरडून त्याला सांगितलें; तथापि तो आह्मांस जवळ येऊ देईना. बराच वेळ अशी आरडाओरड केल्यानंतर जहाजावरील एक अम्मलदार कठड्याजवळ आला, तेव्हां त्याला मीं ओरडून म्हटलें, “ कप्तानाला भेटण्याबद्दल मला सरकारचा हुकूम आहे. ”

अम्मलदारानें आह्मांस जवळ बोलावून वर येण्यास मला परवानगी दिली. वर गेल्याबरोबर मला कप्तानाच्या खोलींत नेण्यांत आलें. जहाजाचा कप्तान म्हणजे तेवढ्या ठिकाणचा तो राजाच असतो. प्यांथर जहाजाचे कप्तान सुमारें चाळीस वर्षांच्या वयाचे होते. चेहऱ्यावरून ते मोठ्या आनंदी स्वभावाचे दिसत होते. कांहीं वेळानें माझ्याकडे रोखून पाहून कप्तानसाहेब म्हणाले, “ कां, काय काम आहे? तुमचा नंबर काय आहे? ”

“ सतरा ” मीं उत्तर दिलें.

नंबर सतरा भेटावयास येणार, अशा अर्थाची तार कप्तानाला अगोदरच आली असावी अशी माझी खात्री होती; तथापि अधिक खात्री करून घेण्याकरतां कप्तान पुढें म्हणाले, “ तुह्मांला या कामगिरीवर प्रथम कोणीं नेमलें? ”

“ वेडेल यांनीं. ”

" त्यानंतर तुमची कोणाशीं भेट झाली ? " हा प्रश्न विचारीत असतां तीक्ष्ण दृष्टीनें कप्तान माझ्याकडे पहात होते.

" खुद्द बादशहाशीं; आणि आतां त्यांचा स्वतःचा निरोप मी तुम्हांस सांगतों. हा निरोप तुम्हांस सांगितल्याबरोबर तुम्हीं खाजगी सांकेतिक भाषेचा उपयोग करून त्यांतील मजकूर खुद्द कौंट वेडेल यांस तारेनें ताबडतोब कळवा अशी विनंति आहे. "

कप्तान पाय न वाजवितां एकदम उठले आणि खोलीचें दार त्यांनीं मोठ्या त्वरेनें उघडलें. जवळपास कोणीहि दिसत नव्हतें. कप्तानसाहेब दार पुन्हा लावून घेऊन परत आले आणि मला म्हणाले, " ठीक आहे. निरोप मला सांगा. "

बादशहांनीं मजकडून पाठ करून घेतलेला निरोप मीं कप्तान यांस सांगितला. तो निरोप असाः—" प्यांथर जहाज अगादीरच्या बंदरांत गेल्यानंतर कोणत्याहि कारणासाठीं तुम्ही तेथें शस्त्रप्रहार करूं नका. सरकारी अधिकाऱ्यामार्फत तुम्हांस कोणताहि हुकूम मिळाला असला, अथवा यापुढें मिळाला, अथवा यापुढें घडून येणाऱ्या परिस्थितीमुळें कसलाहि प्रसंग आला, अथवा तुमचा कोणत्याहि रीतीनें अपमान करण्यांत आला, तरी फ्रान्स अथवा इंग्लंड यांच्या विरुद्ध तुम्हीं शस्त्र उचलूं नये. "

बादशहांनीं हा निरोप मला प्रथम सांगितला त्या वेळीं माझी जशी स्थिति झाली होती, तशीच आतां कप्तानसाहेबांची झाली. आश्चर्यानें ते अगदीं स्तंभित झाल्यासारखे दिसले. मोरोक्कोला जाऊन फ्रेंच आणि ब्रिटिश यांजविरुद्ध गडबड करावी, असा स्पष्ट हुकूम परराष्ट्रीय खात्याकडून त्यांस मिळाला होता, आणि आतां खुद्द बादशहाकडून मिळालेला निरोप सरकारी हुकुमाच्या अगदीं विरुद्ध होता. सरकारी हुकूम युद्ध उपस्थित करण्यासाठीं असून बादशहांचा निरोप युद्ध टाळण्यासाठीं होता. युद्धांत पडण्यास अगदीं उतावीळ झालेला असा एक बराच मोठा पक्ष त्या वेळीं जर्मनींत होता, हें मीं पूर्वींच सांगितलें आहे. युद्धमदिरेचें आकंठ पान करून झिंगलेल्या या पक्षानें जर हा माझा निरोप ऐकला

असता तर आपल्या क्रोधाच्या प्रदर्शनानें त्यानें जर्मनींत आकाशपाताळ एक करून सोडलें असतें. सर्व राष्ट्र युद्धासाठीं एका पायावर उभें होतें; पण वुइलहेल्मस्ट्रासींतील तळघराच्या एका लहानशा खोलींत थकून बसलेल्या एका व्यक्तीला मात्र युद्ध नको होतें. जर्मनीच्या बादशहाला तेथें कर्तुमकर्तुम् अन्यथा कर्तुम् शक्ति आहे, असा पुष्कळांचा समज आहे; पण हा समज अगदीं चुकीचा आहे. या वेळीं युद्धांत न पडणें हेंच शहाणपणाचें आहे, असें बादशहांस वाटून त्यांनीं गुप्तपणें आपलें काम केलें. सर्व लोकांच्या मर्जीविरुद्ध तशा अर्थाचा सरकारी हुकूम प्यांथर जहाजाला उघडपणें सरकारीरीत्या पाठविणें, बादशहांस बरें वाटलें नाहीं. अशा रीतीनें वागण्यांतच राष्ट्राचें खरें हित साधणार आहे, असें त्यांना वाटलें.

यानंतरची हकीकत बहुतकरून सर्वांस अवगत असेलच. रविवार तारीख ७ जुलई रोजीं सकाळीं प्यांथर जहाज मोरोक्कोला कसें गेलें व अगादीर बंदरांत त्यानें आपला प्रवेश कसा करून घेतला व तेथें पंधरवड्याहून अधिक दिवस राहून बड्याबड्या राष्ट्रांत तेढ कशी उपस्थित कला, हें माझ्या वाचकांना विदित असेलच. तसेंच त्या वेळीं एक फ्रेंच आणि एक इंग्लिश लढाऊ जहाज तेथें येऊन तीं शेजारीं शेजारीं लढाईच्या पवित्र्यांत कशीं उभीं राहिलीं होतीं, हेंहि त्यांना आठवत असेलच. ब्रिटिश आणि फ्रेंच जहाजांनीं प्यांथरच्या कप्तानाला निर्वाणीचा खलिताहि पाठविला होता, हें कदाचित् कोणास ठाऊक नसेल. दिलेल्या मुदतीच्या आंत जर्मन जहाज बंदरांतून न निघालें तर त्याला जबरीनें हांकून देण्यांत येईल, असेंहि ब्रिटिश व फ्रेंच आरमारी अम्मलदारांनीं कळविलें होतें. अर्थात् हें युद्धाचें आव्हानच होतें.

प्यांथर जहाजाच्या कप्तानाला बादशहांचा निरोप कळला नसता, तर त्याच्या शास्त्राप्रमाणें दंडाला प्रतिदंडाचा जबाब देणें त्याला अवश्य होतें. पूर्वीच्या उघड सरकारी हुकुमाप्रमाणें जर तो वागला असता, तर अगादीर बंदरांत अग्निज्वालांचा लाल प्रकाश भरून गेला असता. एकाद्या लहानशा बंदुकीच्या आवाजानेंहि युद्धाचा वणवा पेटावा अशी या वेळची

परिस्थिति होती; पण प्यांथर जहाज बंदरांतून मुकाट्यानें निघून गेल्यामुळें हा प्रसंग टळला.

या एकंदर परिस्थितींत बादशहांची विलक्षण चतुराई दिसून येते. इंग्लंड आणि फ्रान्स यांची दोस्ती आहे, ही गोष्ट बादशहांस ठाऊक होती; पण या दोस्तीचें स्वरूप कितपत पक्कें आहे, याचा अजमास त्यांना नव्हता. अगादीर बंदरांत प्यांथर जहाज पाठवून ही दोस्ती त्यांनीं कसाला लावली. तेव्हां तींत बराच राम आहे, ही गोष्ट त्यांना कळून चुकली. इंग्लंड आणि फ्रान्स हीं खांद्याशीं खांदा भिडवून लढतील अशी त्यांची खात्री झाली. सर्व जर्मनी युद्धासाठीं उद्युक्त झाला असतां एकंदर परिस्थिति निकरापर्यंत आणून नंतर तेथून ती परतविणें हें काम खरोखरच फार भयंकर होतें. हें काम बादशहांनीं आपल्या तोंडी निरोपानें साधलें.

आपल्या भोंवतीं कशा प्रकारची परिस्थिति आहे, याचा बरोबर अजमास बादशहांला लागला. आतां या दोन राष्ट्रांत फूट पाडून एकाशीं संधि करून दुसऱ्यास उघडें कसें पाडावयाचें इतकाच विचार राहिला. यानंतर फ्रान्सला उघडें पाडण्याचा डाव सुरू झाला. तो यशस्वी झाला असता, तर युरोपचा सगळा नकाशा पार बदलून गेला असता.

## प्रकरण आठवें.

## बाल्कन संस्थानें आणि युरोपची तटस्थवृत्ति.

फ्रान्स, इंग्लंड आणि जर्मनी यांच्या पूर्व परिस्थितींत असलेल्या ज्या घोटाळ्यांचा मला अनुभव आला होता, त्यांवरून कांहीं विलक्षण बनाव अचानकपणें घडून येणार असा अंदाज मीं पूर्वींच बांधला होता. तथापि १९११ सालाच्या आक्टोबर महिन्यांत जी एक विलक्षण गोष्ट घडली, ती मात्र माझ्या अंदाजाबाहेरची होती. इंग्लंड आणि फ्रान्स यांचें मित्रत्व भक्कम आहे, असा अनुभव जर्मनबादशहांस मारोका प्रकरणांत आलाच

होता, आणि जर्मनीची राजकारणाची कुटिलता माझ्या अनुभवाची असल्यामुळें वुइलहेल्मस्ट्रासीचीं प्यादीं पुढें कशीं सरकणार, हें मला अगोदरच ठाऊक होतें. हीं प्यादीं पुढें सरकविण्याची वेळ आली, म्हणजे ती कामगिरीहि माझ्यावरच सोंपविली जाईल, असेंहि अनुमान मीं केलें होतें. या राजकारणांतील बऱ्याचशा भानगडी मला अगोदरच ठाऊक असल्यामुळें पुढील कामगिरीवरहि माझीच योजना व्हावी, हें तर्कशास्त्राला अनुसरूनच होतें.

माझा तर्क कांहीं चुकीचा नव्हता. पूर्वीं अनुमान केल्याप्रमाणें मला बोलावणें आलें आणि एका कामगिरीवर माझी योजना झाली. या कामगिरीचें स्वरूप इतकें कांहीं विलक्षण होतें कीं, त्यावरून राजनीतीच्या कौटिल्याचें भयंकर स्वरूप माझ्या चांगलेंच अनुभवास आलें. मोठमोठे राजे आणि बादशहासुद्धां राज्याच्या हितासाठीं कसे निर्दय बनतात, हें या कामगिरींत मला कळून आलें.

पावसाळ्याच्या सुटीला सुरवात होऊन बरेच दिवस झाले होते. इतक्यांत मला वुइलहेल्मस्ट्रासिकडून बोलावणें आलें. दरवाजावरील नेहमींचा विधि उरकल्यानंतर कौंट फॉ वेडेल यांच्या खाजगी खोलींत मी गेलों. एका खुर्चीकडे बोट दाखवून कौंट यांनीं मला बसावयाला सांगितलें. माझ्या पूर्वींच्या कामागिरीबद्दल माझी बरीचशी स्तुति करून साडेसात हजार रुपयांचा चेक त्यांनीं माझ्या हातीं दिला. हा चेक खुद्द बादशहांकडून आलेला होता.

मी चेक हातांत घेत असतां त्यांनीं 'तुमच्या कामगिरीचें हें बादशहांकडून आलेलें बक्षीस' असें मला सांगितलें. यानंतर आपल्या नेहमीच्या पद्धतीला अनुसरून ते नव्या कामगिरीबद्दल माझ्याशीं बोलूं लागले. खुर्चीवर मागें रेलून आणि पायावर पाय ठेऊन ते ह्मणाले, "हर्र फॉ किडरलेन वेक्टर यांजबरोबर खाजगी चिटणीस या नात्यानें तुह्मांस जावयाचें आहे. या कामासाठीं तुमचीच निवडणूक मीं केली आहे. याचें कारण हें कीं, तुह्मांला इंग्रजी भाषेचें ज्ञान असून या बाबतींतल्या पूर्वींच्या भानगडीहि तुमच्या माहितींतल्या आहेत. ट्यानसच्या जंगलांत एका ठर-

लेल्या जागीं कांहीं मुत्सद्दी परस्परांस भेटणार आहेत. या मंडळीची सर्व प्रकारची तरतूद लावण्याचें काम तुमच्या एकट्याकडेच सोंपविण्यांत येईल. तेथल्या सर्व बाबींकडे तुह्मांस लक्ष ठेवलें पाहिजे. तेथें कांहीं लिहिलेले कागद असतील, आणि दुसरे कांहीं टिपकागद असतील, तर ते तुह्मी सर्व जाळून टाका. फॉ किडरलेन वेक्टर यांच्या समोरच ते तुह्मी जाळा."

एवढें बोलून ते थोडा वेळ थांबले; पण त्यांच्या मुग्धतेंतहि कांहीं विशेष अर्थ होता. त्यांच्या शब्दांचा अर्थ जसजसा माझ्या ध्यानांत येऊं लागला, तसतसें या कामगिरीचें विलक्षण स्वरूपहि मला उघड दिसूं लागून मी आश्चर्यानें स्तंभित झालों.

कौंट वेडेल पुढें बोलूं लागले. "ही मंडळी त्या जागीं जाण्याच्या अगोदर तीन दिवस तुह्मांस तेथें जावें लागेल. त्यांच्या जेवणाखाण्याची सारी व्यवस्था तुह्मांसच ठेवावी लागेल. कारण तुमच्याशिवाय दुसरा कोणीहि नौकर तेथें असणार नाहीं. हा सारा व्यवहार त्या भागांत अगदीं गुप्त राहील अशी व्यवस्था अगाऊच करण्यांत आलेली आहे. या गोष्टीचा यत्किंचितहि बभ्रा होतां उपयोगी नाहीं, ही गोष्ट नीट ध्यानांत धरा हीं कोणी तरी मंडळी नुसत्या शिकारीसाठीं येथें आली आहे, अशा प्रकारचा समज तिकडे होईल, अशी कांहीं तरी तरतूद तुह्मी करा. ही तरतूद कशी करावयाची, हें तुमचें तुह्मीच पाहून घ्या. जे गृहस्थ तेथें येणार आहेत, त्यांपैकीं कोणी तुमच्या ओळखीचे असतील अथवा नसतील. त्यांचीं नांवें मी तुम्हांला लिहून देतों.

कौंटची लेखणी कागदावर कुरकुर वाजूं लागली आणि मलाहि पुढील विचाराकरतां थोडासा अवसर मिळाला. जर्मन राष्ट्राची भवितव्यता या वेळीं काळाच्या उदरांत होती. पुढें काय होणार, याचा अंदाज करतां येत नव्हता. आपल्या राष्ट्रावरील आपत्ति टाळण्याकरतां जर्मनीचे केसर राजकीय पटावरील मोहरीं चाळवीत होते, आणि या भानगडीपैकींच ही कांहीं तरी कामगिरी असावी, असा माझा समज होता; तथापि या भानगडीचें स्वरूप किती विलक्षण आणि महत्त्वाचें आहे, हें मात्र मला त्या जंगलांत गेल्यानंतरच कळून आलें.

कौंट वेडेल यांनीं एक कागदाचा तुकडा आपल्या जागेवरून माझ्याकडे सरकाविला. त्याजवर त्यांनीं पुढील नांवें लिहिलीं होतीं. लॉर्ड-मि.-एम. पी ( पार्लमेंट सभासद. ) ॲडमिरल फॉं टिरपिझ, जनरल फॉं हिरिनजेन्, जनरल मॉरिट्झ् रिटर फॉं आफेनबर्ग, हर फॉं किडरलेन वेक्टर.

हा वेळपर्यंत या नौकरींत शिरून मला अकरा वर्षें झालीं होतीं. यामुळें मी अनेक प्रसंग पाहून निर्ढावलों होतों. जर ही कामगिरी आरंभींच माझ्याकडे सोंपविण्यांत आली असती, तर तिच्या विलक्षण स्वरूपानें मी अगदीं गांगरून गेलों असतों. ठ्यानस अरण्याच्या एका ओसाड भागांत ही मोठमोठी मंडळी एकत्र जमण्याचें घाटत होतें. यावरून त्या वेळची परिस्थिति किती गंभीर स्वरूपाची होती, याची तुह्मीच कल्पना करा. त्या वेळचीं युरोपांतील वर्तमानपत्रें कोणीं चाळून पाहिलीं, तरी सुद्धां मी ह्मणतों या गोष्टीचा प्रत्यय त्याला येईल. इंग्लंड आणि जर्मनी हीं राष्ट्रें एकमेकांची नरडी धरण्यास अगदीं उतावीळ झालीं होतीं, असें वर्तमानपत्रांतील हकीकतीवरून दिसून येईल. जर्मन हेरांच्या सुळसुळाटाच्या वर्णनांनीं इंग्रजी पत्रांचे रकाने भरून निघत होते. अशा प्रकारची परिस्थिति असतां, ब्रिटिश प्रधानमंडळांतले दोन बडे गृहस्थ केसरच्या युद्धखात्याच्या प्रधानाला गुप्तपणें भेट देणार, हें ऐकून मला किती नवल वाटलें असेल, याची तुह्मीच कल्पना करा.

जर्मनीच्या परराष्ट्रीय खात्याच्या आमंत्रणावरून हे दोन्ही इंग्रज गृहस्थ पूर्वीं एकवर गुप्त भेट घेऊन गेले होते, ही गोष्ट मला माहीत होती. जर्मनीची युद्धाची तयारी कशी आहे, याची जाणीव या दोन इंग्रज मुत्सद्यांस करून देण्यांत आली होती. विशेषतः आकाशांतील युद्धासंबंधानें जर्मनीची तयारी कशी होती, हें त्यांस दाखविण्यांत आलें होतें. यांतहि जर्मनीचा कांहीं विशेष हेतु होता.

पण आतां फॉं वेडेल हे पुनः बोलूं लागल्यामुळें त्यांजकडे लक्ष देणें अवश्य आहे. वेडेल ह्मणाले, " चालू महिन्याच्या मध्याच्या सुमारास ही मंडळी स्क्लायांजेनबाद येथें परस्परांस भेटतील. ठ्यानसच्या डोंगराळ मुलखांत बादशहांची एक खास शिकारीची जागा आहे, ही गोष्ट तुह्मांला

ठाऊक आहेच. तुह्मी उद्यांच तेथें जा. तेथें कोणत्या प्रकारची आगाऊ तयारी करावी लागेल, हें तुह्मांला सांगावयास नकोच. "

याप्रमाणें सर्व बेतबात ठरल्यावर मी तावडतोब तेथून घरीं निघून आलों आणि माझ्या झुलू छोकऱ्याला भावी प्रवासाचें बाडबिछाइत तयार करण्याला सांगून पुढील कामगिरीची चर्चा मीं आपल्या मनाशीं सुरू केली. कौंट वेडेल यांनीं दिलेली यादी मीं प्रथम वाचून पाहिली.

इंग्लंडचे लॉर्ड—बादशहाजवळ यांचें मोठेंच वजन. जवळ जवळ त्यांचे ते खाजगी दोस्तच ह्मणावयाला हरकत नाहीं. मि —एम. पी. हे ब्रिटनच्या आरमारी खात्यांत असतात. वेक्टर—जर्मनीचे परराष्ट्रीय प्रधान. यांना बादशाही मंडळांत बरेच जण प्रतिकूल असतांहि केसरच्या हे अगदीं विश्वासांतले. टिरपिझ—हे जर्मन आरमाराचे प्रमुख आणि फॉ हेरिन्‌जेन हे तर सेनेची अधिष्ठात्री देवता. हे दुसरे मोल्टकेच आहेत, असा सर्वत्र समज आहे. फॉ ऑफेनबर्ग हे ऑस्ट्रियन साम्राज्याच्या मुख्य प्रधानाचे आधारस्तंभ. अशा रीतीनें तीन बलाढ्य राष्ट्रांचा संगम आतां होणार होता. आपआपल्या राष्ट्राच्या शिरोभागीं असलेलीं हीं माणसें एका अरण्याच्या अगदीं उजाड आणि क्षुद्र भागांत एकत्र होणार! फ्रान्ससंबंधी एकंदर लक्षण बरेंसें दिसत नाहीं. फ्रान्सवर या भेटीचा परिणाम काय होईल याचा नक्की अंदाज मला करतां येईना. माझ्या मनाची गुंतागुंत वाढूं लागली. तथापि या मंडळीची भेट झाल्यानंतर आपणाला बऱ्याचशा गोष्टी कळतील, एवढ्या आशेवरच मीं आपल्या मनाची समजूत केली.

मला हुकूम झाल्याप्रमाणे दुसऱ्या दिवशीं अगदीं उजाडतांच हेर फॉ किडरलेन वेक्टर यांच्या घरीं मी हजर झालों. तावडतोब साहेबबहादुरांच्या खोलींत माझा प्रवेश झाला. ते एका टेबलाशेजारीं बसले असून कांहीं कामांत गुंतले होते. प्रथम कांहीं थोडे कुशल प्रश्न झाल्यावर ते पुन्हा आपल्या कामाकडे पाहूं लागले. या रिकाम्या वेळाचा फायदा घेऊन या साहेबबहादुरांचें आपण थोडेंसें निरीक्षण करूं. यांचा स्थूल देह, यांचा तांबूस चेहरा, आणि कैसाळ भिंवया हीं पाहून हे गृहस्थ मोठे राजका-

रणी असतील अशी शंकासुद्धां कोणाला यावयाची नाहीं; पण ते खरो-खरच मोठे मुत्सद्दी होते, यांत मात्र शंका नाहीं. त्यांच्या मृत्यूनें बादशहा आणि एकंदर जर्मनराष्ट्र यांस खरोखरच चुकल्या चुकल्यासारखें वाटत असेल. यांच्या शरिराचा उठाव आणि पोषाखाची ढब हीं पाहून हे सौथ आफ्रिकेंतले एकादे बोअर किंवा इंग्लंडांतले बडे शेतकरी असावेत असा कोणाचाहि समज झाला असता. त्यांचा पोषाख अजूनहि माझ्या स्मरण-शक्तीला चिकटून बसला आहे. त्या वेळीं त्यांच्या अंगांत एक चटकदार रंगाचें आणि वर हिरवे टिपके असलेलें असें जाकीट होतें; पण एक वेळ त्यांनीं आपले पाणीदार व सूक्ष्मनिरीक्षक डोळे तुमच्याकडे फिरविले, का त्याचें जाकीट आणि इतर पोषाख यांच्या साऱ्या कल्पना तुमच्या डोक्यांतून निघून जाऊन तुह्मी ताबडतोब शुद्धीवर यावयाचे. ‘ पुढील हुकूम घेण्यासाठीं मी आपणाकडे आलों आहें, ’ असें मी साहेबमहसु-बांस सांगितलें.

एकंदर कामगिरीसंबंधीं अत्यंत गुप्तपणा राखण्याचा विशेष इषारा देऊन त्यांनीं मला दुसऱ्या काहीं किरकोळ कामाची समजूत दिली; तथापि त्यांच्या बोलण्यावरूनसुद्धां पुढें काय घडणार आहे, याचा विशेषसा उल-गडा मला झाला नाहीं. त्याची थोडीशी कल्पना मात्र मला आली. ह्या राजकीय उलाढालीमुळें केवढी वावटळ उठण्याचा संभव होता, यासंबंधीं साहेबबहादुरांनीं आपल्या भाषणांत एक अक्षरसुद्धां काढलें नाहीं.

शिकारीच्या मिषानें त्या अरण्यांत शिरावयाचें अशी वेडेल यांची जी सूचना होती, तिला अनुसरून मीं कांहीं बंदुकी मिळविल्या आणि स्क्र्यांजेनबादला जाणारी साडेबारांची गाडी गांठण्याकरतां स्टेशनावर येऊन दाखल झालों.

आक्टोबर महिना नुकताच उजाडला होता. मी स्क्र्यांजेनबाद येथील ‘ कर ’ हॉटेलांत जाऊन तेथील नोंदबुकांत बर्लिनचे हर ब्याम्बबर्गर असें स्वतःचें नांव दाखल केलें. तुह्मीं कधीं या गांवाला फेरी मारली, तर या हॉटेलांत जाऊन तें नोंदणीबुक अवश्य पहा. स्क्र्यांजेनबाद हा गांव नॅसॉ संस्थानांत असून तो तेथील औषधी पाण्याच्या झऱ्यासंबंधानें प्रसिद्ध

आहे. आजूबाजूला ष्यानस नांवाचें अरण्य आहे. गांवापासून थोड्याच अंतरावर त्या अरण्यांत बादशहांचा शिकारी बंगला असून याच बंगल्यांत वेडेल यांनीं सांगितलेली भेट होणार होती.

· कित्येक दिवसपर्यंत त्या हॉटेलांत मी एकटाच होतों. नंतर या बड्या मंडळीपैकीं एकेक जण नांवें बदलून तेथें येऊं लागला. प्रथम ऑस्ट्रियाचे जनरल मॉरित्स रिटर फॉं ऑफेनबर्ग हे आले. यांचा चेहरा दिसण्यांत मोठा उमदा असून स्वभावानें हे अगदीं शांत आहेत आणि स्वतःच्या मोठेपणाची मुळींच घमेंड न बाळगणारे असे आहेत. बादशहा फ्रान्सीस जोसेफ यांच्या हे पूर्ण विश्वासांतले आहेत, अशी ख्याति आहे. सालमन मासे धरण्याचा यांना मोठा शोक आहे, असें मला आढळून आलें. न्यूझीलंडमध्यें मासे मारण्याच्या अनेक गमतीच्या गोष्टी सांगून मीं त्यांची मर्जी संपादन केली.

यानंतर आडमिरल फॉं टिरपिट्झ आणि जनरल फॉं हेरिनजेन हे आले. अडमिरल हे शरीरानें धष्टपुष्ट, सहा फूट उंच, रुंद छातीचे असे गृहस्थ आहेत. त्यांचे निळे डोळे, भरदार दाढी आणि एकंदर रुबाब यांनीं जर्मन खलाशाबद्दल कोणालाहि चांगलीच कल्पना करून दिली असती. स्वभावानें हें अगदीं गोड आणि चालीरीतीला फार सभ्य असल्याचें मला आढळून आलें. फॉं हेरिनजेन हे यांच्या अगदीं उलट. अगानें अगदीं सडपाळ-किंबहुना रोडके. शरीरयष्टि वांकडी, खांद्याला पोंक आलेलें, अगदीं मुखस्तंभ, आणि खोल डोळ्यांचे, असे हे गृहस्थ आहेत.

स्मरण करतां त्या दिवशींची तारीख १२ आक्टोबर ही होती, असें मला आठवतें. त्या दिवशीं भल्या सकाळीं एक गाडी भाड्यानें करून तींत कांहीं खाण्याचे जिन्नस, दारूच्या बाटल्या, आणि दुसरें जरूरीचें सामान भरून मी त्या अरण्यांत सोळा मैलांवर असलेल्या एहरनक्रूग नांवाच्या शिकारी बंगल्यांत गेलों.

आजुबाजूला कित्येक मैलपर्यंत मनुष्यवस्तीचें एकहि चिन्ह नव्हतें. दगड आणि विटा अशा मिश्रणानें हा बंगला बांधलेला आहे. यांत पाहु-यासाठीं पांच सहा खोल्या, एक मोठा दिवाणखाना आणि सकाळीं बस-

ण्याउठण्याकरतां एक लहानशी खोली, अशी व्यवस्था आहे. हा राजकीय कुटुंबाचा बंगला असल्यामुळें फॉरेस्ट खात्यांतले दोन पेनशनर नौकर येथें पहाऱ्यासाठीं ठेवलेले होते. मी पोहोंचलों त्या दिवशीं कडाक्याची थंडी पडली होती. विशेषतः आजुबाजूला झाडीनें भरलेले डोंगर असल्यामुळें तर हवेंत गारठा व सर्दी हीं विशेषच होतीं. मी गेल्याबरोबर रखवालदारांनीं शेगड्या पेटवून बंगला चांगला उबदार केला.

रस्त्यावर दोन्ही दिशांकडे पोलिसचा पहारा ठेवण्यांत आला होता. याशिवाय कित्येक पोलिसचे लोक अरण्यांत नाक्यानाक्यांनीं ठेवण्यांत आले होते. पोलिसची नजर चुकवून कोणालाहि तेथें प्रवेश करतां आला नसता. दुपारीं तीन वाजतां जर्मन व ऑस्ट्रियन गृहस्थ येऊन दाखल झाले, आणि यानंतर आणखी पाऊण तासानें दोन सुप्रसिद्ध इंग्रज मुत्सद्दी मोटारगाडींतून आले.

या दोघांपैकीं एक गृहस्थ वयानें वडील होते. यांस मीं पूर्वीं पाहिलें नव्हतें. हे मोठे मितभाषी होते; तथापि वयोमानानें त्यांच्या अंगीं मार्दवहि आलेलें होतें. बोलण्याची यांची ढब लॉर्ड चेस्टरफिल्ड यांस साजेशी होती; तथापि दिसण्यांत हे एखाद्या धर्मगुरूसारखे दिसत. डोक्याला थोडेंसे टक्कल असल्यामुळें यांची स्वाभाविक संन्यस्तवृत्ति अधिकच खुलत होती.

दुसरे गृहस्थ तरुण असून यांची वृत्तीहि तरुणाला शोभेशीच थोडीशी उतावीळपणाची होती. बोलण्यांत आणि कृतींतहि धरबंद बेताचाच दिसत होता. आत्मप्रौढीची थोडीशी छटा यांच्या ठिकाणीं दिसत होती. या शिष्टसंमेलनांत हेच गृहस्थ सर्वांत वयानें लहान होते. बोअर युद्धाच्या वेळीं यांची व माझी दृष्टभेट झाली होती. आपला कोट काढीत असतां, ते माझ्याकडे निरखून पाहूं लागले. दक्षिण आफ्रिकेंत माझ्याशीं झालेल्या भेटीचें स्मरण त्यांस होऊन ते मला म्हणाले, " मीं पूर्वीं तुह्मांला कोठें तरी पाहिलें आहे. "

" होय मेहेरबान. ब्लोएम्फॉंटीनच्या लष्करी इस्पितळांत युद्धाच्या वेळीं आपली भेट झाली होती. "

" ओहो ! बरोबर; बरोबर. "

त्या वेळीं त्यांची जखम मीं बांधली होती. त्यांनीं मला ओळखलें, यावरून त्यांच्या विलक्षण स्मरणशक्तीची ओळख मला पटली.

अल्पसा उपहार झाल्यानंतर सारी मंडळी सकाळच्या बसण्याउठण्याच्या खोलींत गेली आणि खोलीच्या दरवाज्यावर मी पहाऱ्याकरतां उभा राहिलों. आंत काय खलबत चाललें होतें, हें मला माहीत नाहीं; पण एक तासानंतर मला आंत बोलावण्यांत आलें. दरवाजा उघडून आंत जातांच सर्व प्रकार मोठ्या गंभीरतेचा आहे, असें माझी मनोदेवता मला सांगूं लागली. ते दोघे इंग्रज गृहस्थ टेबलाच्या दोन्ही बाजूंकडून एकमेकांकडे तीक्ष्ण नजरेनें पहात होते. या देखाव्यावरून बऱ्याच गंभीर गोष्टींचा तेथें खल होत असला पाहिजे, असें अनुमान कोणालाहि साहाजिकपणेंच करतां आलें असतें. हें टेबल खोलीच्या मध्यभागीं मांडलेलें असून त्यावर दोन मोठे दिवे टांगलेले होते. काळोख पडूं लागला असल्यामुळें दिवे पेटवून मी खोलीच्या एका कोपऱ्यांत जाऊन उभा राहिलों. या सहा असामींचे त्या वेळचे चेहरे माझ्या पूर्ण लक्षांत आहेत. मंडळी भावी इतिहासाची सामुग्री तयार करण्यांत गुंतली होती. कागद, इतर लिहिण्याचें सामान आणि कांहीं सरकारी खलिते त्या टेबलावर जिकडे तिकडे पसरले होते. या मंडळीच्या लिहिण्यानें भरलेले कित्येक कागद टेबलावर जेथें तेथें पडलेले होते. फक्त फॉं हेरिनजेन यांजपुढील कागद मात्र कोरे होते. [illegible] गोष्टीसाठीं ते बहुधा टांक बुचकळीत नाहींत. सर्व गोष्टींचें टांचण ते आपल्या डोक्यांतल्या स्मरणवहींतच करीत असतात

मी खोलींत शिरलों त्या वेळीं या मंडळींचीं परस्पर संभाषणें बहुतेक संपलीं होतीं. त्या वेळीं ऑस्ट्रियाचे मारिट्झ यांचे एकच वाक्य मला ऐकूं आलें. " हें सर्व साधण्यासाठीं बाल्कन राष्ट्रांचा संघ फोडणें जरूर आहे. "

टेबलाच्या वरच्या बाजूकडे किडरलेन वेक्टर बसले होते, ते उठून उभे राहिले. या वेळींहि त्यांच्या अंगांत मारवाडी रंगाचें एक जाकीट होतेंच. आपल्या डाव्या हाताकडे वळून त्यांनीं त्या तरुण इंग्रज गृहस्थाकडे आणि टिरापिट्झ यांजकडे कांहीं वेळ टक लावून पाहिलें. नंतर त्यांची तीक्ष्ण

नजर मॉरिट्झकडे वळली. मॉरिट्झ यांनीं जो एक प्रश्न शेवटीं उपस्थित केला होता, त्याचें उत्तर मंडळीकडून मिळेल अशी अपेक्षा या वेळीं त्यांच्या मुद्रेवर दिसत होती. वेक्टर यांनीं आपली नजर मॉरिट्झ यांजकडून काढून ती हेरिनजेन यांजकडे वळविली आणि अखेरीस त्या दुसऱ्या इंग्रज गृहस्थाकडे पाहून ते बोलूं लागले. त्यांचें भाषण अद्यापिहि मला चांगलें स्मरत आहे. ते ह्मणाले, " सद्‌गृहस्थहो, जनरल मॉरिट्झ यांनीं काढलेला मुद्दा सध्या तसाच राहूं द्यावा. विशेषतः त्याबद्दल आपल्या सरकारांची अनुमति प्रथम मिळवावी लागेल. लॉर्ड—यांनीं म्हटल्याप्रमाणे हा मुद्दा अधिक घोंटाळा उपस्थित करणारा आहे. बाल्कन राष्ट्रांसंबंधीं ऑस्ट्रियालाच सर्वांत विशेष काळजी आहे. आतां माझ्या संबंधीं ह्मणाल, तर ह्या मुद्याला कबुली द्यावी, आणि तशी कबुली देणें योग्यहि आहे, असे मला वाटतें. " ( हें भाषण चालू असतां सर्वांच्या मुद्रा किती गंभीर झाल्या होत्या, हें अद्यापिहि मला स्पष्ट दिसत आहे. त्याचा अर्थ ह्मणजे बाल्कन प्रकरण हातघाईवर येणें हाच होय. )

किडरलेन वेक्टर ह्मणाले, " एकंदर मुख्य मुद्यासंबंधीं आपणां सर्वांचें एकमत झालेंच आहे. आपल्या भेटीचा मुख्य हेतु इतकाच होता, कीं हे मुद्दे सिद्धीस नेण्यासाठीं ज्या काहीं गोष्टी कराव्या लागतील, त्या गोष्टींसंबधीं वाटाघाट करून त्या नक्की करावयाच्या. खुद्द बादशहांनीं हेंच सांगितलें होतें. तथापि बाल्कन राष्ट्रांचा हा मुद्दा आपल्या वाटाघाटींत पूर्वींच यावयास पाहिजे होता. तो आला नाहीं, ही मोठ्या दुर्दैवाची गोष्ट आहे. याकरतां मुद्दा सध्यां तसाच ठेवून व त्याबद्दल आपापल्या सरकारांस कळवून आपण परस्परांची पुनः भेट घ्यावी अशी माझी सूचना आहे. जरूर पडल्यास या दुसऱ्या भेटीचा योग आपण येत्या बुधवारीं जमवून आणूं. "

पण या दुसऱ्या भेटीचें कारणच उरलें नाहीं. ऑस्ट्रियाच्या मुद्याला सर्वांनीं संमति दिली.

किडरलेन वेक्टर खालीं बसले, त्या वेळीं लॉर्ड—यांनीं आपली संमति स्पष्ट शब्दांनीं दिली आणि इतरांनीं त्याला माना डोलाविल्या. ही सभा

बरखास्त झाली, हें उघडच होय. पण येथें जमून त्यांनीं साध्य काय केलें ? त्यांच्या भाषणाच्या ओघावरून त्या सर्वांचें एक मत झालें, हें उघड दिसत होतें; पण हें एक मत कशाबद्दल झालें ? कदाचित् लौकरच समजेल.

किडरलेन वेक्टर मला हांक मारून म्हणाले, " ब्यॉम्बबर्गर, टेबलावर कांहीं चिठोरीं पडलीं असतील, तीं सगळीं गोळा करून शेगडींत टाकून दे."

" जी साहेब."

मग ते इतरांकडे वळून म्हणाले, " कोणाला कांहीं टांचणें ठेवावयाचीं असतील, तर तीं त्यांनीं ठेवून घ्यांवींत. बाकीचे सगळे कागद आतां भट्टींत जावयाचे आहेत."

सर्व मंडळी आपआपलीं टांचणें शोधूं लागली. आपणास जरूर असलेले कागद त्यांनीं निवडून घेतले. त्या तरुण इंग्रज मुत्सद्यानें भाराभर टिपणें केलीं होतीं आणि बुद्ध्या हेरिनजेननें एक ओळहि लिहिली नव्हती, ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. टेबलावर पडलेलीं सर्व कागदाचीं चिटोरीं, टिपकागद आणि खरडलेले अथवा कोरे कागद मीं गोळा केले. हे सर्व कागद अग्नीच्या भक्ष्यस्थानीं पडावयाचे होते.

मीं एकेक कागद हळुहळू शेगडींत नेऊन टाकण्यास सुरवात केली; पण तो अग्निमुखांत टाकण्यापूर्वीं त्यावर एकदां नजर फिरविण्यास मात्र मी चुकलों नाहीं. महत्त्वाचा असा एकहि कागद अग्नींत जाऊं द्यावयाचा नाहीं, असा माझा निश्चय होता. मधून मधून बरीचशी माहिती मिळविण्याची संधि मला सांपडे. त्या गृहस्थांनीं टिपणें केलीं होतीं, त्यांच्या निरनिराळ्या तुकड्यांतून मिळालेल्या माहितींची संगति मी मनांतल्यामनांत लावूं लागलों, आणि या माहितीच्याद्वारें या गृहस्थांपैकीं प्रत्येकाच्या मनांत कोणत्या प्रकारचे विचार घोळत असावेत, याचें अनुमान मला करतां आलें. सैन्य आणि आरमार या संबंधींचें टांचण बरेंचसें विस्तृत होतें. त्या इंग्रज गृहस्थानें ऑस्ट्रिया आणि जर्मनी यांची युद्धविषयक तयारी कितपत पूर्ण होती. याचें विस्तृत टांचण केलें होतें. इंग्लंड आणि आस्ट्रिया यांच्या आरमाराबद्दल व सैन्याबद्दल किडरलेन वेक्टर यांनीं बरीच माहिती लिहिली होती. त्याचप्रमाणें मारिट्झ यांनीं इंग्लंड आणि

जर्मनी यांजबद्दलच्या युद्धविषयक माहितीचें टिपण केलें होतें. या एकंदर हकीकतीवरून येथें तिरंगी संधीची वाटाघाट चालली होती व हे गृहस्थ परस्परांस आपापल्या राष्ट्रांची युद्धविषयक तयारी माहीत करून देत होते, असें उघड दिसून येण्याजोगें होतें. सैन्याच्या टाचणाप्रमाणेंच कांहीं आरमारी टांचणेंहि माझ्या पहाण्यांत आलीं. या टांचणांचा हेतु वरीलप्रमाणेंच उघड होता.

थोड्या वेळानें सर्व मंडळी टेबलाजवळून उठली व जोडी जोडीनें इकडे तिकडे फिरूं लागली. किडरलेन वेक्टर व इंग्लंडचे मि.–हे शेगडीच्या बाजूला गेले आणि तेथील लोखंडी दांड्यानें भट्टींतील कागद खालींवर करूं लागले. कागद जाळतां जाळतां ते आपसांत हळुहळू बोलूं लागले. टेबलावरील एकेक कागद नेऊन शेगडींत टाकण्याचा माझा क्रम सुरूच होता. दुसरे गृहस्थहि जोडी जोडीनें फिरत असून आपसात बोलत होते. यांच्या भाषणाचा जो कांहीं भाग माझ्या कानावर आला, त्याचा शक्य तितका मुळाबरहुकूम गोषवारा मी येथें देतों.

हेरिनजेन आाणि लॉर्ड–हे एका बाजूला उभे होते. हेरिनजेन म्हणाले, " आमच्या राखून ठेवलेल्या सैन्यावर विशेष भार न घालतां पसतीस लक्ष शिपायी कोणत्याहि वेळीं आम्ही उभे करूं शकूं. आणि ऑस्ट्रियाशीं जो आमचा अखेरचा करार झाला आहे, त्याप्रमाणें ऑस्ट्रियाहि वीस लक्षांची मदत आह्मास करील. आतां पैशाच्या पुरवठ्यासंबंधानें ह्मणाल तर ती गोष्ट अर्थातच माझ्या हातची नाहीं. "–यावर लॉर्ड–यांनींहि कांहीं जबाब दिला; पण तो मला नीटसा ऐकूं आला नाहीं; तथापि त्यांनींहि मान हालविली, तीवरून हेरिनजेन यांच्या ह्मणण्यास त्यांची अनुमति होती, असें दिसलें.

या वेळीं तो तरुण इंग्रज गृहस्थ किडरलेन वेक्टर यांस सोडून टिरपिट्झ यांजबरोबर कांहीं बोलत होता, असें दिसलें. त्याला जर्मन भाषा चांगलीशी येत नव्हती, यामुळें त्यांचें भाषण कांहीं इंग्रजींत व कांहीं फ्रेंच भाषेंत असें चाललें होतें. टिरपिट्झ ह्मणाले, " कांहीं बाहेरची परिस्थिति उत्पन्न झाली, तर तीबाबत इंग्लंडनें जबाबदारी घ्यावी, अशी आमची

अपेक्षा आहे. युरोपच्या बाहेरची जबाबदारी तुमच्या आरमारानेंच स्वीकारली पाहिजे, हें अगदीं उघड होय."

इंग्रज गृहस्थाचा चेहरा थोडासा सावधगिरीचा झाल्यासारखा दिसला. तो गृहस्थ ह्मणाला, "कदाचित् आणखीएक तिसराच घोंटाळा उत्पन्न होण्याचा संभव आहे. परिस्थितीच्या अमलाखालीं युनायटेडस्टेट्स पूर्णपणें आमच्या विरुद्ध गेलें, तर कसें ?"

यावर अडमिरल टिरापिट्झ यांनीं थोडीशी तिरस्काराची मुद्रा करून 'उं:' एवढेंच उत्तर दिले. पुढें ते जें कांहीं बोलले त्याचा आशय असा:— युनायटेडस्टेट्सला ( अमेरिकेला ) घरच्याच भानगडी पुरेशा आहेत. यामुळें इकडच्या उलाढालींत हात घालण्यास त्याला फुरसतच नाहीं, आणि कदाचित् तशी कांहीं ढवळाढवळ करण्याचा यत्न त्यानें केलाच तर त्याच्या स्वतःच्या सरक्षणासाठीं त्याचें आरमार त्याला अडवून ठेवावें लागेल; तथापि या साऱ्या गोष्टींचा सर्व विचार अडमिरल यांनीं त्या इंग्रज गृहस्थावरच सोंपविल्यासारखें दिसलें.

किडरलेन वेक्टर आणि मारिट्झ हे बाल्कन्सच्या वाटाघाटींत चूर होऊन गेले होते.

मारिट्झ ह्मणाले, "थोड्याशा महिन्याच्या अवधींत तो प्रश्न आम्ही निकालाच्या मार्गास आणूं यांत संशय नाहीं."

याचा अर्थ, बाल्कन्सची गुतागुंत निकालास लावण्याच्या मार्गास ऑस्ट्रिया लवकरच लागणार, असा मीं केला. किडरलेन वेक्टर यांची मुद्रा फार गभीर दिसत होती. ते ह्मणाले, "तसें करणें अगदीं अवश्य आहे."

अशाच रीतीचीं भाषणें त्या खोलींत जिकडे तिकडे चालू होतीं आणि त्या सर्वांचा विषय एकच होता. हळू हळू या भेटीसंबंधानें एकंदर गोष्टी मला स्पष्ट दिसण्यास सुरवात झाली; तथापि जाळण्यापूर्वी कांहीं कागद मी पाहीपर्यंत या वाटाघाटीचें स्वरूप किती गंभीर होतें, हें माझ्या लक्षांत आलें नाहीं. या कागदांत काय मजकूर होता, याची परिस्फुटता करणें मला बरें वाटत नाहीं; पण या भेटीमुळें बाल्कन युद्ध सुरू असतां एकंदर युरोपची शांतता सुरक्षित राहिली हें मात्र खरें.

## प्रकरण नववें.

# बाल्कन संस्थानांत.

ट्यानस अरण्यांतील माझी कामगिरी संपल्यानंतर बाल्टिक समुद्राच्या तीरावरील आल्बेक नांवाच्या सुप्रसिद्ध हवा खाण्याच्या ठिकाणीं मी गेलों. वुइलहेल्मस्ट्रासीच्या कामगिऱ्यांमुळें सतत वर्षभर मला पायपीट करावी लागली होती. यामुळे मला विश्रांति घेण्याची जरूर फारच भासूं लागली होती. या गांवीं येऊन मी आपली राहण्याची वगैरे व्यवस्था लावतों न लावतों तोंच वुइलहेल्मस्ट्रासीची एक तार मला आली. तींत " सवडीप्रमाणें शक्य तितक्या लवकर निघून या " असा मजकूर होता. या हुकमांतील सवड या शब्दाचा अर्थ एकदम असा करावयाचा, हें मला माहीत होतें. आपल्या हेरांना हुकूम करतांना सुद्धां गुळचट भाषा वापरण्याची जर्मनीची नेहमींचीच पद्धत आहे.

ही तार वाचून मला खरोखर थोडेंसें चिडल्यासारखें झालें, हें मी प्रांजळपणें कबूल करतों. आल्बेक येथें राहून चार दिवस मजेनें विश्रांति घेण्याचा माझा बेत अर्थातच ढांसळला. कांहीं तरी महत्त्वाची भानगड उपस्थित झाली असावी, असा तर्क मीं केला. कारण तसें नसतें; तर इक्काची रजा सुरू होते न होते तोंच मला परत बोलावण्यांत आलें नसतें. " साडे सातच्या गाडीनें येतों " असा जबाब मीं बर्लिनला पाठविला. थोड्याच तासांच्या अवधींत मीं स्टेशन गांठलें आणि दक्षिण दिशेकडे आमची गाडी झपाट्यानें चालू लागली.

हा प्रवास तीन तास चालावयाचा होता. तेवढ्या अवधींत एकंदर परिस्थितीचें निरीक्षण मी मनांतल्या मनांत करूं लागलों. कसल्या प्रकरणाच्या कामगिरीवर माझी योजना आतां होणार, याचा कांहीं अदमास लागला तर पहावा, असा माझा विचार होता. आमच्या गुप्त खात्यांत एक गप्प बरीच पसरली होती. तिचा विचार करून पुढें कांहीं मार्ग सांपडतो कीं काय, हें मी पाहूं लागलों. फ्रान्स आणि इंग्लंड यांची जूट फोडण्यांत केसर बादशहांनीं जी विलक्षण मुत्सद्देगिरी दाखविली आणि त्याब-

रोबर इंग्लंडशीं जें सख्य संपादन केलें, त्यामुळें बाल्कन संस्थानांत चालू असलेल्या ऑस्ट्रोजर्मनांच्या राजनीतीला मोकळी वाट सांपडली.

आमची गाडी बर्लिनकडे झपाट्यानें जात असतां आणखीहि एका गोष्टीचा मी विचार करूं लागलों. रूसो—जपानी युद्धानतर युरोपांतील राजकारणांत आपलें वजन कमी होऊं लागलें आहे, असा अनुभव रशियाला आला होता. आपलें हें गेलेलें वजन पुनः परत मिळविण्याकरितां रशिया निकरानें यत्न करील, व तसें करण्याला त्याला आतांच संधि आहे, ही गोष्ट मला माहीत होती. रूसो–जपानी युद्ध संपल्यानंतर रशियाची तलवार बोथट झाली आहे, असें पाहून हरजगोविना आणि बॉसनिया हे प्रांत ऑस्ट्रियानें ताबडतोब गिळंकृत केले. ऑस्ट्रियाच्या या कृत्यांत त्याला जर्मनीचें पूर्ण पाठबळ होतें. या बाबतींत जर्मनी व ऑस्ट्रिया या दोन्ही राष्ट्रांचें संगनमत पूर्वींच झाले होतें. ऑस्ट्रियाच्या या कृत्यानें बाल्कन्समध्यें रशियास खटपट सुरू करावी लागली, हेंहि मला माहीत होतें. ग्रीक, सर्वियन, बलगेरियन आणि मांटेनिग्रीन या राष्ट्रांत परस्पर एकभाव उत्पन्न होऊं लागला होता. हा वेळपर्यंत हीं राष्ट्रे परस्परांस पाण्यांत पहात होतीं; पण तो मनु बदलण्याचीं चिन्हें दिसू लागलीं होतीं. हिंदुस्थानांत जितक्या जाती व जितकीं वेगवेगळीं मानव कुळें आहेत, तितकींच तीं बाल्कन सस्थानांतूनहि आहेत. आपल्या नेतृत्वाखालीं या सर्वांचें एकीकरण करावें, असा रशियाचा उद्देश होता. हा उद्देश सिद्धीस नेण्यासाठीं अचाट उलाढाली, पाण्यासारखा पैसा आणि विलक्षण दीर्घोद्योग हीं रशियास खर्चावीं लागलीं होतीं. सर्वियाच्या युवराजानें सोफायास ( बल्गेरियाची राजधानी ) जावें असा घाट रशियानें जुळवून आणला. रशियाची ही युक्ति सफळ झाली आणि सर्विया व बल्गेरिया यांजमधील भेदभाव संपुष्टांत येण्याच्या मार्गाला लागला. किंबहुना सर्विया आणि बल्गेरिया हे एकजीवच झाले, असें ह्मणावयास कांहीं हरकत नाहीं. मग तुर्कांविरुद्ध जय मिळविल्यानंतर या दोघांत जो त्रेसष्टाचा आंकडा दिसला, त्याचें कारण काय ? असा प्रश्न सहजच उद्भवतो. बाल्कन संस्थानांच्या राजकीय परिस्थितींत अंतस्थ



फॉँ डर गोल्ट्ज.

रीतीनें जे प्रकार चालू होते, ते मी आतां उघडच तुम्हांला सांगतों, म्हणजे त्यांत वरील प्रश्नाचें उत्तर आपोआपच मिळेल.

उच्च दर्जाच्या सर्वियन कामगारांच्या मनांत आपल्या जुन्या राष्ट्राची पुनः उभारणी करण्याचे विचार घोळत असल्याचें मीं एकदां ऐकलें होतें. त्या गोष्टीची या वेळीं मला आठवण झाली. बल्गेरियाहि अशाच प्रकारच्या विचारांत गुंतला होता. वॉलाचिया, आणि मोल्डाव्हिया यांची एकी करून याशिवाय ट्रॅन्सिलव्हानिया, बुकोव्हिना आणि आणि टेमेस्वर हे प्रांत मिळविण्याची इच्छा रुमानियाच्या डोक्यांत घोळत होती. यांपैकीं प्रत्येक राष्ट्राची स्वतंत्र सेना असून तिचें प्रत्यक्ष सामर्थ्य काय आहे, हेंहि नुकतेंच अजमाविलें होतें; पण प्रत्येक राष्ट्राच्या आकाराच्या आणि उत्पन्नाच्या मानानें प्रत्येकानें विलक्षण मोठें सैन्य बाळगलें होतें, हें कोणाच्याहि लक्षांत येईल. अशा परिस्थितींत प्रत्येकाला आपआपली राज्यमर्यादा वाढविण्याची महत्त्वाकांक्षा उत्पन्न झाल्यास नवल नाहीं.

बाल्कन संस्थानांत सैन्याची जमवाजमव सुरू होती, व त्याची तयारीहि पहिल्या प्रतीची होती, ही गोष्ट मला माहीत होती. या सैन्याचा खर्च उत्पन्नाच्या मानानें फारच अवाढव्य होता. हा पैसा कोठून येत होता? युरोपांतील मोठ्या पटावरील प्याद्यांसारखीं हीं बाल्कन संस्थानें होतीं.

बर्लिन येथें येऊन मी आपल्या बिऱ्हाडाकडे गेलों. मी दाराजवळ पोहोचलों, त्या वेळीं आठ वाजण्याचा सुमार होता. किम दरवाजांतच उभा असून विलक्षण आतुर झालेला दिसला. त्या वेळीं मला भेटण्यासाठीं कोणी तरी आलें होतें. आपल्या स्नेह्यांसोबत्यांस भेटण्यास घरीं न बोलवण्याची माझी पद्धत असल्यामुळें किम अधिकच गांगरून गेलेला दिसला.

"राम राम धनिसाहेब. कोणी गृहस्थ भेटावयास आला आहे. हें बरें कीं वाईट तें कांहीं सांगतां येत नाहीं. तो गृहस्थ म्हणतो, मीं चांगली बातमी आणली आहे."

त्या गृहस्थाच्या येण्यानें किम अगदीं घाबरून गेला होता, हें मला अगदीं उघड दिसलें. हा गृहस्थ कोण असावा, याबद्दल तर्कवितर्क

करीत मी आपल्या खोलींत शिरलों. तों तेथें वुइलहेल्मस्ट्रासींतले एक गृहस्थ बसले होते; यांचें नांव हर फॉन स्त्यामर असें असून वेडेलसाहेबाचे ते अगदीं विश्वासांतले हस्तक होते, हें मला माहीत होतें; तथापि नेहमींच्या पद्धतीपेक्षां ही भेटीला बोलावण्याची नवीच तऱ्हा पाहून मला थोडेंसें चमत्कारिक वाटलें. वुइलहेल्मस्ट्रासींत येण्याबद्दल हुकूम करण्याची नेहमींची पद्धत होती. असो. या नव्या प्रकाराचें कारणहि पुढें समजेल.

हर फॉन स्त्यामर म्हणाले, " डॉक्टरसाहेब, तुमच्या घरीं पहारा मोठा कडक दिसतो. तुमचा हा कृष्णमूर्ति मला आंत येऊं देत नव्हता. "

मीं अर्धवट हंसल्यासारखी मुद्रा केली. किमशी तंटाभांडण करण्यांत या गृहस्थाला बराच त्रास झाला असावा, हें माझ्या तेव्हांच लक्षांत आलें.

" डॉक्टरसाहेब, आल्बेकहून आलेली तुमची तार मिळाली. कौंट वेडेल सध्या दुसऱ्या कामांत गुंतले असल्यामुळें तुमच्या कामगिरीची समजूत तुह्मांला देण्याचें काम मजकडे आलें आहे. "

इतक्यांत कांहीं विड्या घेऊन किम आंत आल्यामुळें स्त्यामर बोलावयाचे थांबले. किम गेल्यावर ते पुढें बोलूं लागले.

" तुह्मी ताबडतोब बेलग्रेडला जाऊन तेथील सध्यांची परिस्थिति कशी आहे, याचा पक्का खुलासा काढावा, अशी कौंटची इच्छा आहे. अंतस्थ रीतीनें तेथें कसलीं प्रकरणें शिजत आहेत, याची माहिती तुह्मी काढा. सरकारीरीत्या जी काय माहिती यावयाची ती आलेली आहेच; पण रशियाचें वजन बेलग्रेड आणि सोफाया येथें खरोखर किती वाढलें आहे, याचा अजमास आह्मांला काढावयाचा आहे. रशियाची अंतस्थ खटपट कितपत दूरवर गेली आहे, आणि ती कितपत जाण्याचा संभव आहे, याचा खुलासा तुह्मी काढा. बेलग्रेड येथें ही माहिती न मिळाली, तर तुह्मी सोफायाला ( बलगेरियाची राजधानी. ) जा; पण हें काम अतिशय लवकर झालें पाहिजे ही गोष्ट मात्र विसरूं नका. एकदर परिस्थितीची माहिती शक्य तितक्या लवकर आमच्या हातीं पडली पाहिजे. " इतकें बोलून हर स्टयामर थोडा वेळ थांबले. या कामगिरीचें महत्त्व माझ्याहि लक्षांत हळुहळू येऊं लागलें.

फॉ स्टश्रामर पुढें म्हणाले, " या कामगिरींत जरूर पडल्यास ऑस्ट्रियन हेरखात्याची मदत तुह्मास मिळेल; तथापि त्यांच्या माणसांपैकीं तुमच्याबरोबर कोणीच नसणें अधिक इष्ट आहे, हें तुह्मांला सांगावयाला नकोच. कारण ऑस्ट्रियन हेरखात्यातलीं सर्व माणसें बाल्कन संस्थानांतल्या रशियन एजंटाच्या ओळखीचीं आहेत. तुह्मीं सध्यां बुडापेस्ट (हंगेरीची राजधानी) येथें जा आणि तेथें पुढच्या साऱ्या मदतीची जुळवाजुळव करा. तुह्मांस कोठून मदत मिळण्यासारखी आहे, याची माहिती क्यासिमिर [illegible] यांजकडून मिळेल. हा ऑस्ट्रियन एजंट असून तो डोनॉस्ट्रासी नं० २४ येथें राहतो. तुमची त्याची ओळख आहे का ? "

" नाहीं. "

" ठीक आहे. त्याची मी अगाऊ तजवीज करतों, ह्मणजे तुमचा पुढचा मार्ग लवकर मोकळा होईल. तुमच्याबरोबर परवाना ( पासपोर्ट ) मात्र अवश्य पाहिजे. पूर्वीं तुह्मीं एका कामगिरीवर तिकडे गेला होतां, आणि त्या वेळीं बरीच भानगड उपस्थित झाली होती. तिजमुळे सध्यांच्या कामांत तुह्मांला अडथळा येईल, असें तुह्मांला वाटतें काय ? "

ते कोणत्या प्रसंगाला उद्देशून बोलत होते, हें माझ्या लक्षांत आलें. आलेक्झांडर राजा व ड्रागा राणी यांचा १९०३ सालीं वध झाल्यानंतर एका आठवड्यानें मी सर्वियांत गेलो होतों. या कामागिरीचें स्मरण करणें सुद्धां मला अगदीं आवडत नाहीं, कारण त्या स्मरणाबरोबर सहा मॉसर बंदुकींच्या नळ्या माझ्या नजरेसमोर दिसू लागतात. ती सारी हकीकत माझ्या वाचकांसहि आठवत असेलच.

त्या वेळची माझी ओळख ठेवण्यासारखीं दोनच माणसें तेथें होतीं. यांपैकीं कर्नल निगलीस हे मृत्यु पावले होते. राजाराणींच्या वधाच्या वेळीं त्यांचाहि वध झाला होता. दुसरे गृहस्थ स्टॉबोल हे अद्यापि हयात असून त्यांची व माझी गांठ पडण्याचाहि बराच संभव होता. माझी गांठ पडल्यास हा सद्गृहस्थ मला ओळखील एवढेंच नव्हे, तर कदाचित् माझ्या पाठींत लांबलचक सुऱ्याची बक्षिसीहि देईल, अशी माझी

खात्री होती. या कामागिरीवर जाण्याचें नाकारावे असे माझ्या मनांत येऊ लागलें. माझ्या पूर्वीच्या कामगिरीचा जो अनुभव मला आला होता, त्यामुळे येथील एकंदर लोकांबद्दल माझें मन अगदीं विटून गेले होतें. बाल्कन संस्थानाइतका भयंकर घोंटाळा जगांत दुसऱ्या कोठेहि नसेल. थोड्याशा रकमेच्या लालचीनें विश्वासघात करणारे अथवा प्रसंगीं खूनहि करणारे लोक तेथें वाटेल तितके आहेत. त्यांच्या एकदर चालचालुणुकीची थोडीशी चव मला मिळाली होती. तेवढ्यानें माझी जीभ अगदीं विटून गेली होती. माझ्या मनांत काय चाललें आहे, याचा सुगावा फॉ स्टचामर यांस लागला असावा. ते म्हणाले,

" काय डॉक्तरसाहेब, घाबरलां कीं काय ? "

मी मनांतून खरोखरच घाबरलों होतों, आणि मीं त्यांना तसें स्पष्ट सांगितलेंहि.

" या कामागिरीवर जाण्याची तुमची इच्छा नसणें स्वाभाविक आहे. याशिवाय एकसारखे पांच महिने तुह्मी कामाला जुंपले असल्यामुळें तुह्मांला विश्रांतीची जरूर आहे, हेंहि मला कबूल आहे; तथापि तुमच्याशिवाय या कामागिरीवर नेमण्याला लायक असा दुसरा इसम आमच्यापाशीं नाहीं, हेंहि तुह्मीं लक्षांत घ्यावें अशी माझी विनंति आहे. "

यानंतर फॉ स्टचामर आपल्या ' विनंतीला ' आणखी अशी कांहीं भर घालूं लागले कीं, ती कामागिरी मीं नाकारल्यास ती गोष्ट वुइलहेल्मस्ट्रासीच्या पसंतीस उतरणार नाहीं, हें मला पक्के कळून चुकलें. ही कामगिरी नाकारणें ह्मणजे पुढील कामगिऱ्यांतूनहि स्वतःला वजा करण्यासारखेंच होतें. याशिवाय फॉ स्टचामर यांनीं दुप्पट बक्षिसाची लालूच लावली तें वेगळेंच. या बक्षिसाच्या रकमेनें माझ्या तोंडास पाणी सुटलें, ही गोष्ट मी मोकळ्या मनानें कबूल करतों. या कामागिरींत फार तर माझा महिनाभर मोडेल आणि नेहमींच्या बक्षिसाशिवाय ७ । ८ हजार रुपये माझ्या पदरीं पडतील, ते वेगळेच. माझ्या चित्तात विचाराचें झुंज सुरू झालें. जावें कीं नाहीं याबद्दल अद्यापिहि माझा निश्चय होईना. मला तेथें ओळखणारे लोक भेटतील, आणि जेथें मला जावयाचें तेथले

लोक विलक्षण माथेफिरू व उतावळ्या स्वभावाचे. इंग्लड किंवा फ्रान्स या देशातल्या कामगिऱ्यांपेक्षां ही कामगिरी कितीतरी पटीनें अधिक कठिण आणि अधिक भयप्रद होती. स्यानस अरण्यातील कामगिरी फार कठिण होती, ही गोष्ट खरी; पण तींत माझ्या जीविताला धोका पोंचण्याचा यत्किंचितहि संभव नव्हता. अखेरीस फॉ स्त्यामर हे जेव्हां माझ्या उत्तरासाठीं मला पुनः पुनः विचारूं लागले, तेव्हां विचारासाठीं मीं थोडीशीं मुदत मागून घेतली. मध्यरात्रींपूर्वीं त्याच्या घरीं टेलिफोननें माझें उत्तर मी त्यांस कळवीन असें सागितल्यानंतर ते निघून गेले.

मी अद्यापिहि ख्रिस्ताचा अनुयायी म्हणवितों आणि मी तसा आहे ही गोष्ट खरी; तथापि आफ्रिका आणि हिंदुस्थान या देशाचा मला बराचसा सहवास झाला असल्यामुळें त्याच्या भोळसरपणाचा संसर्गहि मला लागलेला आहे. एखादी गोष्ट करावी कीं करूं नये, याबद्दल माझ्या चित्तांत निश्चय होईनासा झाला म्हणजे पत्त्यांचे दोन डाव घेऊन त्यांच्या खेळावरून मी आपल्या कामाचा निकाल करून घेत असें. तिहींपैकीं एक वेळ तरी माझ्या मनांतला इष्ट पत्ता मला मिळाला तर मी माझें काम हातीं घेत असें. हा पत्त्यांचा निकाल नेहमींच माझ्या पथ्यावर पडत आला आहे. या निकालाविरुद्ध मीं फक्त दोनदांच वर्तन केलें आणि दोन्ही वेळ त्या कामगिऱ्या माझ्या गळ्याशीं आल्या.

फॉ स्त्यामर यांना मीं निश्चयात्मक उत्तर दिलें नाहीं, याचें हेंच कारण, होय. मीं सांगितल्याप्रमाणें किम पत्त्यांचे दोन जोड घेऊन आला आणि मी खेळूं लागलों. दुसऱ्या वेळीं माझें इष्ट पान मला मिळालें. पत्ते फेकून देऊन मी ताबडतोब टेलिफोनवर गेलों आणि कामगिरीवर जाण्यास तयार असल्याचें फॉं स्त्यामर यांस कळाविलें. त्यानीं मला एकदम आपल्या घरीं बोलाविलें. त्यांच्या घरीं गेल्यानंतर त्यांनीं मला आणखी कांहीं माहिती दिली व बाल्कन संस्थानांत प्रवेश होण्यासाठीं अवश्य असणारे परवानेहि माझ्या स्वाधीन केले.

दुसऱ्या दिवशीं पहाटे तीन वाजतां व्हिएन्नाच्या मार्गानें जाणाऱ्या ओरिएंट एक्स्प्रेस गाडीनें मी निघालों आणि बुडापेस्टला येऊन पोहों-

चलों. बुडापेस्ट येथें येऊन मी तावडतोब डोर्नॉस्ट्रासी नं. २४ येथें गेलों आणि ऑस्ट्रियाचे एजंट कोवॉलस्की यांची गांठ घेतली. त्यांजपासून जी माहिती मला मिळाली, तिचा मला फार उपयोग झाला. बेलग्रेड येथें माझ्या उपयोगीं पडण्यासारख्या माणसांचे पत्ते त्यांनीं मला दिले. तसेंच कांहीं माणसांचीं–विशेषत–कांहीं स्त्रियांचीं नांवें देऊन त्यांजबद्दल फार सावधगिरी राखण्याविषयीं त्यांनीं मला सुचविलें. हीं माणसें रशियाच्या हेरखात्यांतलीं होतीं. त्याच रात्रीं मी बुडापेस्टहून निघालों आणि सर्वियाच्या बेलग्रेड राजधानींत येऊन दाखल झालों.

बेलग्रेडमध्यें हॉटेल दि प्यारीस नांवाच्या हॉटेलांत माझ्यासाठीं प्रथमच जागा मुक्रर करण्यांत आली होती. ही जागा सर्वांत अत्युच्च दर्जाची होती. एवढ्या श्रीमंती थाटाने येथें राहण्यांत माझा एक विशेष हेतु होता. बाल्कन संस्थानांत पैसा हाच काय तो एक परमेश्वर ओळखला जातो. आपण थेट प्यारीसच्या थाटाने राहणारे आहों, असा अभिमान बेलग्रेड येथील लोक बाळगतात. त्या ठिकाणचा प्रत्येक अम्मलदार एखाद्या रशियन ग्रँडड्यूकच्या थाटाने रहात असतो. त्याचा पगार पाहिला, तर तो बहुधा अगदींच थोडा असतो. मग एवढ्याशा पगारावर हे इतक्या थाटानें कसे राहूं शकतात, याबद्दल एखाद्या परस्थाला खरोखर अचंबा वाटण्यासारखा आहे; पण या कोड्याचे उत्तर हेंच कीं, त्यांच्या पाठीमागें रशियाची तिजोरी आहे, तोंपर्यंत त्यांच्या थाटामाटांत कांहीं उणीव येण्याचें कारण नाहीं. रशियाच्या सोन्यांत असा कांहीं गुण आहे कीं, बुडापेस्टच्या दक्षिण भागांत वाटेल ती जिन्नस त्याला प्राप्त करून घेतां येते. त्याची मात्रा मांटेनिग्रोंत किंवा उस्मानलींत मात्र चालत नाहीं.

मीं पाण्यासारखा पैसा उधळण्यास सुरवात केली; यामुळें लवकरच तेथें माझें नांव सर्वतोमुखीं झालें. चैनी लष्करी अम्मलदार माझी मैत्री संपादन करण्यासाठीं धडपडूं लागले. या अम्मलदारांत मेजर गोर्स्की या नांवाचा एक अम्मलदार होता. हे गृहस्थ मोठें चैनी असून त्यांना जुगारीचाहि नाद होता. ते एखाद्या ग्रँडड्यूकच्या थाटानें रहात होते. अशा प्रकारच्या कामगिरींत असले चैनी आणि व्यसनी लोकच आम्हां

हेरांच्या फार पथ्यावर पडत असतात. या मेजरसाहेबांच्या खिशांत खुळखुळणारा पैसा रशियाकडून येत होता, ही गोष्ट मला माहीत होती. कोवॉलस्की यांनीं हें मला अगोदरच सांगितलें होतें. रशियाच्या पैशानें या भल्या गृहस्थाचे खिसे पिंवळे झाले असले, तरी त्याजकडूनच मला जरूर असणारी माहिती मिळेल, अशीहि माझी खात्री होती.

मेजरसाहेबांस आपल्या जाळ्यांत कसे धरावे याचा विचार मी करूं लागलों. हॉटेल दि प्यारीसमध्ये जगी मेजवान्या देण्याचा उपक्रम मीं सुरू केला. जेवण झाल्यानतर मी मेजरबरोबर जुगार खेळूं लागलो. त्यात मेजरसाहेबच नेहमीं जिंकतील अशी व्यवस्था मी करीत असे. माझ्याकडून मिळविलेला पैसा ते दुसऱ्याबरोबर खेळून गमावीत; पण त्यांच्याबरोबर खेळत असतां डाव न जिंकण्याचा यत्न मी नेहमीं करीत असें, यामुळें मेजरसाहेब सदोदित माझ्या चौकशींत राहूं लागले. असल्या लोकांच्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणे हा मेजरहि बडा दारूबाज होता. सपाटून दारू पिऊन हे गृहस्थ अगदीं तर्र झाले म्हणजे यांची जिव्हाहि अद्वातद्वा बरळूं लागे. अशा वेळीं अनेक सूचक प्रश्न करून जरूरीची माहिती मिळविण्याचा यत्न मीं केला; पण त्यांत मला फारसें यश आलें नाहीं. एकाद्या प्रश्नाबद्दल थोडीशी शंका येतांच मेजरसाहेब आपल्या तोंडाला पक्कं कुलूप घालीत.

रेनी दुवल नावाच्या एका फ्रेंच बाईबरोबर मेजरसाहेबांचें विशेष संघटन असून ते नेहमीं तिच्या संगतींत असल्याचें मीं पाहिलें होतें. मेजरचें त्या बाईशीं बरेंच सूत असावें, असे उघड दिसून येत होतें. तिच्या एकंदर वागणुकीवरून तिचें मनहि मेजरवर जडलें असावें, असें अनुमान मीं काढले. तिच्याशीं अधिक घरोबा संपादण्याचा यत्न मीं सुरू केला. सोन्याच्या अथवा इतर खटपटींच्या जाळ्यांत एकादें सावज गोंवले गेलें नाहीं, तरी पाणीदार डोळ्यांच्या जाळ्यांत तें खास गोंवलें जातें असा अनुभव मला आला. बेलग्रेडमध्यें अशा प्रकारचा धंदा करणाऱ्या स्त्रिया विलक्षण उधळ्या असतात, आणि दुवलबाईहि यांपैकींच एक होती. तिला जुगारीचा फार शोक होता. एके रात्रीं संधि साधून सुमारे तीनशे

रुपयाची रक्कम मीं तिला उसनी दिली. यानंतर तिचें व माझें दळणवळण वाढत चाललें.

एकाद्या परराष्ट्राच्या खात्यात ही बाई नोकर असावी अशी शंका मला पूर्वीं कध्हांहि आलेली नव्हती. उलट तिच्या वागणुकीवरून असल्या प्रकाराशीं तिचा कांहीं संबंध नसावा, असेंच कोणालाहि वाटलें असतें; पण हा धंदाच असा आहे कीं, त्यांतल्या प्रत्येक माणसाला सदोदित चोहोंकडे काकदृष्टीनें पाहण्याची सवय झालेली असते. दुवलबाई फ्रेंच भाषा उत्तम बोलत असे. तिची चेहरेपट्टीहि फ्रेंच पद्धतीचीच होती. तसेंच तिची सर्व चालरीतहि फ्रेंच पद्धतीची होती; तथापि ती खरोखरच फ्रेंच स्त्री होती कीं नाहीं, याबद्दल माझें मन साशंक होतें. अशा प्रकारच्या स्थितींत आपलें चित्त सदोदित साशंक ठेवणें हेंच फार शहाणपणाचें असतें. मीं तिजबद्दल बारीक तपास सुरू केला. तिच्याशीं संभाषण कर-तांना बारीकसारीक सूचक प्रश्नहि मी तिला करीत असें. ती कांहीं तरी विशेष कार्यांत गुंतली असावी असें मला हळूहळू दिसूं लागलें. बाहेरून जी चवकशी मीं केली तीवरून ती बाई फ्रेंच असावी, असें दिसलें; तथापि माझ्या मनाचें समाधान मात्र झालें नाहीं. अखेरीस माझी शंका अनाठायीं नव्हती असें सिद्ध झालें.

एके रात्रीं हॉटेल दि पॉरिसमधील आपल्या खोलींत दुवलबाईनें एक मेजवानी दिली. भोजनानंतर जमलेल्या मंडळींत जुगार सुरू झाला. तिच्या या खाजगी बैठकीच्या जागेंत तिची जातकुळी निश्चितपणें सिद्ध करणारी एकादी तरी चीज आढळून येईल असा माझा अजमास होता. ती खरोखरच फ्रेंच आहे कीं माझ्या शंकेप्रमाणें ती दुसरीच कोणी आहे, याचा निकाल या बैठकींत लावण्याचा माझा विचार होता. मीं आपली काकदृष्टि चोहोंकडे फिरविली; पण त्या बाईचा संबंध रशियाशीं जोड-ण्याजोगी एकहि वस्तु मला तेथें आढळून आली नाहीं. थोड्या वेळानें दुवलबाई तेथून आंत गेली आणि एक खडीसाखरेचा खाऊ खात खात बाहेर आली. या खाऊनें बाईची खरी जात जाहीर केली !

हा खाऊ फक्त रशियामध्येंच तयार होत असून अशाच प्रकारच्या

फ्रेंच किंवा तुर्की खाऊपेक्षां अगदीं वेगळ्या पद्धतीने हा तयार केलेला असतो. हे पक्वान्न म्हणजे गुलाबाचीं ताजीं पाकविलेलीं फुले होत. ज्या पद्धतीने ते बनविले जाते, त्या पद्धतीचें रहस्य फक्त मास्को येथील डेमीट्रॉफ अॅन्ड सन्स यांनाच माहीत आहे. पदार्थाच्या चवीची खुबी जन्मसिद्ध मस्कोव्हाईट ( रशियन ) शिवाय दुसऱ्या कोणास कळावयाची नाहीं. संवयीने या पदार्थाची लज्जत उत्पन्न करून घ्यावी लागते. जो जन्मतः रशियन असेल, त्याला किंवा पुष्कळ वर्षे रशियांत राहिला असेल त्यालाच या पदार्थाची लज्जत कळते.

दुवलबाईची मला पूर्वीची माहिती मुळीच नव्हती; तथापि असल्या प्रकारच्या स्त्रियांची माहिती युरोपांतील साऱ्या गुप्त पोलीस खात्यांना बहुधा हटकून असते. तिच्या जातकुळीबद्दल बहुतांशीं खात्री होऊन चुकलीच होती. तेव्हां तिजबद्दल आणखी माहिती मिळवून त्या बाईच्या एकंदर कुळकथेचा शोध करण्याचें मीं निश्चित केले मीं तिचे दोन फोटो मिळविले. तसेच तिच्या हस्तलेखाचा नमुनाहि मीं पैदा केला. यांपैकीं प्रत्येकीं एक फोटो व एक नमुना व्हिएन्ना व बर्लिन येथील गुप्तपोलीस खात्याकडे पाठवून त्या बाईबद्दल शक्य तितकी खुलासेवार माहिती तारेने मला कळविण्यास मीं त्या खात्यास विनंति केली. अठ्ठेचाळीस तासांच्या अवधींत मला व्हिएन्नाहून जबाब आला. ही बाई ऑस्ट्रियन पोलीसाच्या पक्की ओळखीची होती. ग्यालिशिया प्रांतातलि चैनबाजाच्या एका जुगार खान्यात पहारा ठेवण्याचें काम ही करीत असे. एका खुनाच्या खटल्यांत तिजवर वहीम आल्यामुळे ती गॅलिशियांतून फरारी झाली होती. क्रॅको येथें तिनें पॉला असें नांव धारण केले होते, व पोलीस तिच्या शोधांत होतेच.

नंतर दुसऱ्या एका वेळी दुवलबाई एकटी आहे, असें पाहून मी तिच्या भेटीला गेलों. एक अत्तराची पेटी भेटीदाखल तिच्या हातांत देऊन मीं तिला एकदम म्हटले:—

" पॉला, क्रॅकोपेक्षां तुझा येथला धंदा निराळाच आहे, नाहीं बरें ! " अशा गोष्टींत एकदम निकराचा हल्ला चढविणें फार शहाणपणाचें असतें.

उगीच इकडे तिकडे सूचक प्रश्न विचारल्यानें आपला प्रतिस्पर्धी सावध मात्र होतो. माझ्या प्रश्नाचा परिणाम जो व्हावयाचा तोच झाला. तिचा चेहरा खरकन उतरला. एखाद्या स्त्रीवर मीं अशा रीतीनें तुटून पडावे व तिला एकदम नामोहरम करावें याबद्दल स्त्रीदाक्षिण्याच्या चाहत्यास विषाद वाटेल, व ते माझ्यावर पशुत्वाचा आरोप करतील, हें खरें; तथापि तसें करण्यावाचून मला गत्यंतरच नव्हते. या शिवाय अशा स्त्रियांना सदसद्विवेक बुद्धीची ओळखहि नसते हें ध्यानांत ठेवलें पाहिजे.

" अरे देवा ! तुम्ही आहां तरी कोण ? "

" मी कोणी कां असेना ? तुझी इतकी आणि याहूनहि अधिक माहिती मला आहे, एवढे मात्र ध्यानांत ठेव. तुझा ठावठिकाणा ऑस्ट्रियन पोलिसाला समजला तर त्यांना खरोखर फार आनंद होईल. त्यांना ही बातमी मी देऊ का ? "

" गप्प बसावयाला काय घ्याल ? "

" मला रशियासंबंधीं जी कांहीं माहिती पाहिजे आहे, ती तूं मिळवून दे, म्हणजे माझें तोंड बंद होईल. "

तिनें पूर्ण आश्चर्याची मुद्रा या वेळीं धारण केली.

" काय ? रशिया ? रशियाबद्दल मला कांहींच माहिती नाहीं. "

मी हसत हसत तिच्या टेबलाजवळ गेलों आणि तेथें असलेल्या एका चांदीच्या बशींतून पाकवलेले गुलाबाचें फूल उचललें. " पॉला, तूं मोठी धूर्त आहेस ही गोष्ट खरी, पण तितकीच तू निष्काळजीहि आहेस. रशियाची माहिती तुला यत्किंचितहि नाहीं; पण रशियनांच्या या आवडत्या पक्वान्नाची लज्जत मात्र तुला चांगली लागली आहे. पॉला, हें खरोखर मोठें आश्चर्य म्हटले पाहिजे. "

आपले ओंठ सडकून चावून ती म्हणाली, " तुह्मांला पाहिजे तरी काय ? "

" मला काय पाहिजे हे सांगण्यापूर्वीं तुला एक गोष्ट बजावून सांगतों ती ध्यानांत धर. माझ्याशीं तुझे लपंडाव बिलकूल चालावयाचे नाहींत

तुझ्या मनांत असेल, तर माझा खून कायदेशीर रीतीनें करणें, ही गोष्ट फारशी अवघड नाहीं."

तिच्या भोंवतीं लष्करी अम्मलदारांचा बराच घोळका जमत असे. यांपैकीं एखाद्याला मीं तिचा अपमान केला, असें समजलें म्हणजे पुरे. दुसऱ्या दिवशीं सकाळीं तो इसम माझ्याकडे येऊन मला द्वंद्वासाठीं आव्हान करावयाचा, आणि या भांडणाचा निकाल पिस्तुलाची एखादी गोळी माझ्या शरीरांत शिरून व्हावयाचा.

"ध्यानांत ठेव; जर माझें येथे कांहीं वाईट झालें, आणि दर सहा तासांला माझ्या सुरक्षितपणाची खबर व्हियेन्नाला गेली नाहीं, तर सातव्या तासाला तुझ्या हातांत कडींतोडे पडतील. ऑस्ट्रियन बादशाहीच्या वारंटानें तुला पकडण्यांत येईल तुझे दोस्त लष्करी अम्मलदार असले, तरी तुला मदत करण्याची त्यांची छाती नाहीं. बादशाहींतून आलेले वारंट फेंटाळून लावून ऑस्ट्रियाचा क्रोध सरविया आपणावर ओढून घेईल हें शक्यच नाहीं. पॉला, ध्यानांत ठेव; सरवियाच्या सरहद्दीवर या क्षणीं ऑस्ट्रियन फौजा जय्यत उभ्या आहेत."

या वेळीं तिचा चेहरा तिच्या विषारी अंतःकरणाची पूर्ण साक्ष देत होता.

मीं आपलें भाषण पुढें चालविलें. "पॉला, मला आतां काय पाहिजे आहे, हे मी तुला सांगतो. मेजर गोर्स्की रशियन सरकारची तैनात खात आहे. येथे रशिया ज्या भानगडी करीत आहे, त्याची सारी गुरुकिल्ली त्याच्याजवळ आहे. रशिया येथें आपला पाय किती रोवणार, याचा बरोबर अंदाज त्याला आहे. ती गुरुकिल्ली मला हस्तगत करून घ्यावयाची आहे आणि ती तूं मला मिळवून दिली पाहिजे. मेजरला कशाची जरूर आहे याचा अजमास मीं काढला आहे. त्याला सध्यां पैशाची फार जरूर आहे. पैशासाठीं रशियाच्या रहस्याची विक्री करण्यास तो फारसा कांकू करणार नाहीं. पण तुझी नजर त्याच्यावर असल्यामुळें तसें करावयास तो भितो. पॉला, येथल्या रशियन एजंटावर व विशेषतः या गोर्स्कीवर नजर ठेवण्याकरतांच रशियानें तुझी योजना केली आहे. ही गोष्ट मला पक्की

ठाऊक आहे. तेथल्या राजकीय घडामोडींची बित्त बातमी जितकी त्याला आहे, तितकी तुला नाहीं, हेंहि मला माहीत आहे. जर तुझ्याजवळ तशी बातमी असती, तर गोस्कींच्या मागें न लागतां तुझ्यापासूनच ती मीं घेतली असती. असो. आतां तुला काय करावयाचे आहे, तें सांगतों. तुझ्यावर माझी नजर नाहीं, असें गोस्कींला तूं कळव. गोस्कींनें रशियाचा विश्वासघात केला, तरी त्याच्याविरुद्ध तुझा रिपोर्ट जाणार नाहीं. असें तूं त्याला स्पष्ट सांगितलेंस म्हणजे तुझें काम संपलें. हे पहा, पॉला, तुझें त्याच्यावर प्रेमही जडले आहे. तेव्हां मी म्हणतां, असें करण्यांत तुला अवघड काहींच नाहीं. तो सुरक्षित रहावा अशी तुझी इच्छा असेल, तर मी म्हणतो असेच तुला केलें पाहिजे. नाहीं तर त्याचे जें होणें असेल तें होईलच. त्याच्याविरुद्धहि एक शस्त्र माझ्याजवळ तयार आहेच."

हे शेवटचें वाक्य मी नुसत्या अनुमानधपक्यावरच बोलून गेलों होतों. पण त्याचा परिणाम तिच्यावर खूपच झाला. ती म्हणाली, "तुह्मी म्हणतां असें मीं केलें, तर तुमच्या बाजूनें तुह्मी आपलें वचन राखाल याचा काय भरंवसा ?"

मीं म्हटलें, " मीं आपले वचन कां राखावें याचें कारण इतकें सयुक्तिक आणि उघड आहे, कीं तें तुझें तुलाच समजलें पाहिजे. तुह्मी आह्मी जो धंदा करतों, त्यांत आपली मुख्य नजर अखेरच्या परिणामावर मात्र असते, हें तुला ठाऊक नाहीं काय? मला जी माहिती पाहिजे, ती मिळ- ल्यानतर तुमच्या दुसऱ्या भानगडींत पडण्यापासून मला फायदा काय ? मी तुला वचन देतों कीं, तुझी ही क्रॅकोची भानगड मी अधिक पुढें जाऊं देणार नाहीं. याशिवाय तुला एकादा हिऱ्याचा दागिनाहि मी देतों, मग तर झालें कीं नाहीं ? आतां सवदा पक्का झाला ना ?"

त्या रात्रीच्या कामगिरीनें सतुष्ट होत्साता मी आपल्या हॉटेलांत परत आलों.

दुसऱ्या दिवशीं मेजरसाहेब मला भेटावयास आले. त्यांचा चेहरा विलक्षण चिंतातुर दिसत होता. प्रारंभींचा नमस्कारचमत्कार झाल्या- नंतर मीं त्यांना म्हटलें, " दुवलबाईशीं तुमची भेट झाली वाटतें ! "

मेजरसाहेब एकदम दचकून म्हणाले, " हें तुह्मांला कसें कळले ? "

" मेजरसाहेब, तुमचें इतक्या सकाळीं आगमन आणि चिंतातुर चेहराच या गोष्टींची साक्ष देत आहे. मला आतां फारसा वेळ नाहीं. तुमचें हे धाकटें प्यारीस ( बेलग्रेड ) मजेचे आहे खरें; पण मला आपला बाल्टिक किनारा आवडतो. तुम्हाला मला काहीं सांगावयाचें असेल, तर तें अगदीं थोडक्यांत आणि अगदीं चटपट सागा पाहूं. व्हिएन्नाला जाण्याकरतां मी आज दुपारींच निघणार आहें. तुमची कातडी शाबूत राहील, हें तुह्माला सांगावयास नकोच. तसेंच मी गेल्यानंतर राशियाकडची तुमची तैनातहि थांबणार नाहीं, हें उघड आहे. पण माझ्या पाठीमागें तुह्मी कसे वागाल हें पाहण्याचें कारण मला नाहीं. येथें व रुमानियांत राशियानें काय काय खटपटी केल्या आहेत, हे स्पष्टपणें तुह्मीं सांगितलें ह्मणजे माझें काम झाले. "

" रुमानियाबद्दल मला कांहींच माहिती नाहीं. "

" हे पहा, मेजरसाहेब, माझ्यापुढें असें वेड पांघरण्यांत काय बरें अर्थ आहे ? तुह्मांला येथली जितकी माहिती आहे, तितकीच रुमानियाचीहि आहे. एक तर मोकळेपणानें सारी माहिती मला द्या. नाहीं तर मुळींच बोलूं नका. माझ्यापासून तुह्मांला एकहि गोष्ट छपवितां येण्यासारखी नाहीं. हें दुवलबाईनें—अथवा पॉलानें ह्मणा—तुह्मांस सांगितलें असेलच. " अधिक आढेवेढे न घेता मेजरसाहेबानीं एकंदर सारी हकीकत मला स्पष्टपणें सांगितली. तिचें तात्पर्य असें:—

फ्रेंचांच्या तिजोरीच्या साह्याने बल्गेरिया आणि सर्विया यांना खूप पैसा चारून टर्कीविरुद्ध राशिया त्यांना मथवीत होता. पुष्कळसे नॉनकमिशन्ड फ्रेंच आणि राशियन लष्करी अम्मलदार बेलग्रेड आणि सोफाया यांमध्यें लोटत होते. बाल्कन संघाच्या सैन्यांत खडी लष्करी नौकरी बजावण्यास हे सर्व अम्मलदार एका पायावर तयार होते. सैन्यांतील मुख्य मुख्य लष्करी अधिकारी आणि कांहीं मुत्सद्दी राशियाची तैनात खात होते. थोडक्यांत इतकेंच सांगावयाचें कीं तेथें वशीकरणाची क्रिया पूर्ण धडाक्यानें चालू होती. बाल्कनसंघ राशियाच्या पूर्ण कह्यांत आणण्याची ही

विद्या होती. बाल्कनसंघाच्या सैन्याला नव्या पद्धतीचा फ्रेंच तोफखाना पुरविण्यांत आला होता. राशिया आणि फ्रान्स यांच्या पैशानें बल्गेरिया आणि सर्विया यांचीं सैन्यें पोसलीं जात होतीं. या साऱ्या हकीकतींवरून फ्रान्सच्या साह्यानें राशियाचे पाऊल तेथें किती पक्कें रोंवलें गेलें होतें, हें कोणाच्याहि लक्षांत येईल. ते इतकें पक्कें रोंवलें गेले होतें कीं, आता तें मागें नेण्यांत राशियाला फायदा नव्हता.

बाल्कन संस्थानांत अशा प्रकारची परिस्थिति उत्पन्न झाली आहे, असा संशय जर्मनी व ऑस्ट्रिया यांना आलेला होताच; तथापि प्रत्यक्ष वस्तुस्थिति काय आहे, याचा शोध करण्याकरितां त्यांनीं माझी योजना केली होती. मला मिळालेल्या एकंदर माहितीवरून बाल्कन्समध्ये राशियाच्या वाढत्या वजनास आळा घालणें जर्मनीस व ऑस्ट्रियास किती अवश्य होतें हें दिसून आलें. त्याच रात्रीं मी ओरिएंट एक्स्प्रेस गाडीनें एकदम बर्लिनला आलों आणि कामागिरीचा रिपोर्ट फॉं स्टचामर यांस सादर केला. कौंट वेडेल हे केसरबरोबर कोठें बाहेर गेले असल्यामुळें मला खुद्द त्यांजकडे रिपोर्ट करतां आला नाहीं.

बाल्कन्समध्यें वाढलेलें राशियाचें वजन नाहींसें करण्याचा उपक्रम ऑस्ट्रिया व जर्मनी यांनीं ताबडतोब सुरू केला. राशियाच्या प्रमुखत्वाखालीं बल्गेरिया, सर्विया, मांटेनिग्रो यांचा संघ पक्का बनला असता, तर जर्मनी, ऑस्ट्रिया आणि इंग्लंड यांच्या राजकारणांत तो एक जबरदस्त अडथळा आला असता. टचानसच्या अरण्यात एकत्र भेटून या तीन देशांच्या मुत्सद्यांनीं जो बनाव घडवून आणण्याचें योजिलें होतें, त्याला या गोष्टीनें अडथळा आला असता. याकरतां हा संघ फोडणें अवश्य झालें होतें. ऑस्ट्रिया व जर्मनी याच्या कारस्थानानें हा संघ फुटला.

बाल्कनसंघापैकीं रुमानिया हें छोटें राष्ट्र सर्वांच्या अघाडीस असून तें सर्वांत अधिक शक्तिमानहि आहे. गेल्या बाल्कन युद्धाच्या आणीबाणीच्या प्रसंगीं रुमानिया कशा रीतीनें वागणार याकडे सर्वांचे डोळे लागून राहिले होते. बाल्कनच्या द्वीपकल्पांत ज्या कांहीं घडामोडी व्हावयाच्या त्याचे सूत्रधार रुमानियाच्या पडद्यामागें बसून आपल्या हालचाली करीत होते.

या डावाचीं सगळीं सूत्रें हातीं बाळगणारी अशी मध्यवर्ती सत्ता कोणती? या सत्तेची गुरुकिल्ली जर्मनी आणि ऑस्ट्रिया यांच्या हातीं होती. तुर्को-बाल्कन् युद्धाच्या आरभीं रुमानियाच्या नैर्ऋत्य सरहद्दीवर सैन्य आलें असतें; तर तुर्कांवर बाल्कन् सघाला ज्या स्वरूपाचा जय मिळाला, त्या स्वरूपांत पुष्कळ फरक पडला असता; पण तुर्को–बाल्कन् युद्ध संपून जाऊन बाल्कनसंघाची परस्परांत यादवी सुरू होईपर्यंत हे सैन्य मागेंच राहिलें होतें. असें कां झालें, याचीं कारणें मी आतां सांगतो.

सांप्रतच्या रुमानियाच्या राजघराण्याचें होहेनझोलर्न ( प्रशियाचे चालू राजघराणे ) घराण्याशीं अगदीं जवळचे नाते आहे. रुमानियाची राणी कार्मेन सिल्व्हा व राजा क्यारोल हीं दोघेंहि जर्मन वंशांतील आहेत, एवढें सांगितलें, म्हणजे मीं वर सांगितलेल्या नात्याची सत्यता लक्षांत येईल. त्याचप्रमाणें जर्मनी आणि रुमानिया यांमध्ये असलेला प्रत्यक्ष व्यापारी संबंधहि फार महत्त्वाचा आहे. सर्व बाल्कन् संस्थानांपैकीं रुमानियाला तुर्कांचा जाच कमी पोहोंचलेला आहे. यामुळें इतर बाल्कन् राष्ट्रांत तुर्कांबद्दल जो तीव्र द्वेष आढळून येतो. त्याला रुमानियात अस्तित्व नाहीं. याच कारणासाठीं रूसो–फ्रेंच राजकारणाला बल्गेरिया, सर्विया, मॉन्टेनिग्रो आणि आल्बेनिया या संस्थानांत जसें यश आलें, तसें तें रुमानियांत आलें नाहीं. रशियाचें राजकारण आणि पैसा यांना वश होऊन रुमानियानें तुर्कांविरुद्ध आपल्या फौजा समरांगणांत आणल्या असत्या, तर बाल्कन द्वीपकल्पाचा सगळा नकाशा आमूलाग्र बदलून गेला असता. तुर्की राज्याच्या वायव्य सरहद्दीवर रुमानियन फौज उतरली असती, तर बाल्कन फौजांचे मोर्चे थेट कान्स्टांटिनोपलला जाऊन पोहोंचले असते, यांत संशय नाहीं; पण रुमानियाचें सूत्रधारित्व ऑस्ट्रो-जर्मनांच्या हातीं असल्यामुळें रुमानियाची सेना घरच्या घरींच बसून राहिली. तिच्या तयारींत कोणत्याहि प्रकारची उणीव नव्हती; पण या तयारीचा उपयोग आपल्या कार्यासाठीं ऑस्ट्रो-जर्मनांनीं केला. आयत्या वेळीं ही फौज पुढें करून सर्विया आणि बल्गेरिया यांना ऑस्ट्रो-जर्मनांनीं जरबेंत ठेवलें. बल्गेरिया, सर्विया आणि मांन्टेनिग्रो यांना स्वतःच्या विजयामुळें मिळालेला मुलूख

आपल्या ताब्यांत कायमच्या राहण्यास रशियाची मदत होईल, असा भरंवसा होता आणि तशा अर्थाचें वचनहि रशियाकडून त्यांना मिळाले होतें; पण चमत्कारिक परिस्थितींत सापडलेल्या रशियाला आपलें वचन पुरे करतां आले नाहीं. यामुळें वरील संस्थानांना केवळ स्वतःच्या मगदुगवरच युद्धाचा शेवट करून घेणें भाग पडलें.

बाल्कन् द्वीपकल्पांत झालेल्या युद्धाच्या निकालानें सर्वांस फार आश्चर्य वाटले असेल; पण पडद्यामागें असलेल्या सूत्रचालकांस याचें कांहींच आश्चर्य वाटण्याचें कारण नव्हतें. तुर्काविरुद्ध एकट्या बल्गेरियानेंच इतके जय मिळविले होते कीं, बराचसा मुलूख त्याच्या पदरांत पडणे अवश्य होते. हीच गोष्ट बाल्कन संघांतल्या इतर राष्ट्रांनाहि लागू आहे. या युद्धाचा शेवट झाला त्या वेळीं युद्धापूर्वींचीच स्थिति कायम राहिली, ही गोष्ट केवळ सूत्रचालकांनीं उत्पन्न केलेल्या असामान्य परिस्थितीमुळें घडून आली. असे कां झाले ?

पूर्वीं एकमेकांस पाण्यांत पाहणारीं राष्ट्रें केवळ एकाद्या बाह्य शक्तीच्या दाबाने एकत्र झालीं असलीं, आणि पुढें ही बाह्य शक्ति ढिली पडली म्हणजे जे परिणाम घडून येतात, ते अनिवार्य असतात. अनिवार लोभ आणि परस्परांचा द्वेष हीं एकदम बाहेर पडतात. विशेषतः अशा प्रकारच्या द्वेषाला आणखी एखाद्या बाह्य शक्तीकडून प्रोत्साहन मिळालें म्हणजे तर बोलावयासच नको. बाल्कन संस्थानास जर्मनी आणि ऑस्ट्रिया यांजकडून असेंच प्रोत्साहन मिळालें होतें आणि त्याचा परिणाम काय झाला, हें जगाला आतां महशूर आहेच. सर्विया बल्गेरियाचा द्वेष करीत होता. बल्गेरिया सर्वियाला पाण्यांत पहात होता. ग्रीस या दोघांचाहि द्वेष करीत होता. रुमानियाच्या पाठीमागें शक्तिमान् सूत्रचालक असल्यामुळें त्यांच्या प्रोत्साहनानें रुमानियानें या साऱ्यांसच आपल्या पायाखालीं दडपलें. हीं सारीं राष्ट्रें लढाया करून थकून गेलीं होतीं. युद्धाच्या भेसूर ध्वनीचा त्यांना पुरा वीट आला होता, आणि त्यांतून फ्रांको-रूसो पैशाचें पाठबळहि बंद पडलें होतें. इतक्या गोष्टी एकसमयावच्छेदेकरून घडल्या नसत्या, तर जगानें पूर्वीं कधींहि न पाहिलेला असा गळेकापूचा बाजार

बाल्कन द्वीपकल्पांत उघडला गेला असता. बाल्कन संस्थानांतील या परस्पर भांडणामुळें तुर्कांचा मात्र फायदा झाला. त्यामुळें आड्रियानोपल आणि थ्रेसचा बराचसा भाग त्यांस परत मिळवितां आला.

रशियाच्या नेतृत्वाखालीं बाल्कन संस्थानांचा संघ निर्माण होऊं नये, हें आस्ट्रो–जर्मन राजकारणाचें मुख्य धोरण होतें. तसेंच तुर्की सत्ताहि नामशेष होणें, हें त्यांस अनिष्ट होतें. मोडकळीस आलेला टर्की, आणि प्रसंगीं दहा लाखपर्यंत सैन्य ऑस्ट्रियाच्या सरहद्दीवर उभें करण्यास समर्थ व रशियाच्या कह्यांत गेलेला बाल्कन संघ, हा संयोग ऑस्ट्रियाला फार भयावह झाला असता. मध्य युरोपांत जर्मनीला जीं कांहीं कारस्थानें साधावयाचीं आहेत तींहि अशा परिस्थितीनें लंगडीं पडलीं असतीं. युरोपांतील शक्तिमान् राष्ट्रांत युद्ध सुरू झालें असतां दहा लक्ष बाल्कन फौज ऑस्ट्रियाच्या सरहद्दीवर उभी राहून रशियातर्फें ऑस्ट्रियाविरुद्ध लढूं लागली, तर ऑस्ट्रियाचें सारें सैन्य एकट्या बाल्कन हद्दीवरच गुंतवून ठेवणें भाग होईल. अशा स्थितींत रशियाचा सेनासमुद्र थोपवून धरण्याचा भार एकट्या जर्मनीवरच पडणार. हें साधण्याकरतां जर्मनीला आपलें अर्धेंमुर्धें सैन्य रशियाकडेच गुंतवून ठेवावें लागणार, तसें झालें, म्हणजे जर्मनीची फ्रँको-बेल्जम-हॉलंड ही सरहद्द लंगडी पडणार. ही सारी अनर्थपरंपरा ऑस्ट्रो-जर्मनांनीं बाल्कन द्वीपकल्पांत केलेल्या कारवाईमुळें टळली.

बाल्कन संस्थानांत डॉक्टर आर्मेगार्ड कार्ल ग्रेव्ज् हें नांव कोणाच्या ऐकिवांत नाहीं; पण तेथल्या चैनी आणि उधळ्या लष्करी अम्मलदारांस " कौंट आर्थर झू वर्निग्रोड " यांचें नांव मात्र पक्कें स्मरत असेल.

---

## प्रकरण दहावें.

## इंग्लंडांतील कामगिरी आणि विश्वासघात !

१९११ सालीं एकामागून एक अनेक कामगिऱ्यांवर माझी योजना झाली होती. गेल्या कित्येक वर्षांत हें वर्ष युरोपच्या मुत्सद्यांना अतिशय त्रासाचें

गेलें. या सालीं ह्मणा किंवा पुढें लवकरच केव्हां तरी जगाला भिववून टाकणारें जें नाटक रंगभूमीवर येणार आहे, त्याच्या पहिल्या अंकाला मांटे कार्लोच्या कामगिरीपासून सुरवात झाली. यानंतर मोरोक्कोची कामगिरी, ट्यानस अरण्यांतली कामगिरी, बाल्कन युद्धांतले घोंटाळे, इत्यादि गोष्टींनीं हें नाटक हळुहळू आपल्या नियमित पर्यवसानाकडे जात आहे. प्रचंड वादळापूर्वी ज्याप्रमाणें कांहीं काळ अगदीं सामसूम असतें, त्याचप्रमाणें बाल्कन युद्धानंतरची शांतता ही भावी झंझावाताचो निदर्शक मात्र आहे. इंग्लंड, जर्मनी आणि ऑस्ट्रिया यांच्या मुत्सद्यांनीं ट्यानस अरण्यांत एकत्र जमून जो त्रिकुट संधि जमवून आणला होता, त्याजवर त्या त्या राष्ट्रांच्या सरकाराचें पक्कें शिक्कामोर्तब अद्यापि व्हावयाचें होतें. तारीख १८ नवंबर १९११ रोजीं या कामगिरीवर माझी योजना झाली त्या वेळीं हें शिक्कामोर्तब झालेलें नव्हतें, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

नेहमींप्रमाणें वुइलहेल्मस्ट्रासींतून मला बोलावणें आलें; पण या वेळीं कौंट वेडेल यांजसमोर मला न नेतां कोनिगरग्रेडझर नंबर ७० येथील जर्मनीच्या आरमारी बातमीखात्यांत नेण्यांत आलें. येथें आरमारी खात्याचे प्रमुख क्यापटन् स्यापकेन यांची व माझी गांठ पडली. इंग्लंडांतील एका कामगिरीवर माझी योजना होणार असल्याचें त्यांनीं मला सांगितलें. या बातमीनें मला फारसा आनंद झाला नाहीं. उलट मला थोडीशी धास्तीच वाटली आणि माझी धास्ती अस्थानीं नव्हती, हें तुमच्या पुढें ध्यानांत येईलच. नेहमींच्या पद्धतीप्रमाणें क्यापटनसाहेबांनीं माझी व तीन आरमारी तज्ज्ञांची गांठ घालून दिली. एक गृहस्थ जहाजें बांधण्याच्या कलेंत हुशार ह्मणून नाणावलेले होते आणि दुसरे दोघे पाणसुरुंग, आगमासे वगैरे स्फोटक हत्यारांचा उपयोग करण्यांत निष्णात होते. या तिघांनींहि निरनिराळ्या वेळीं आपापल्या धंद्यांतल्या गुरुकिल्ल्या माझ्या स्वाधीन केल्या. मी प्रथम जेव्हां या नौकरींत शिरलों त्या वेळीं कित्येक महिनेपर्यंत या विषयांचें शिक्षण मला देण्यांत आलें होतें, हें वाचकांना स्मरत असेलच. त्या साऱ्या विद्येची ही पुनः उजळणीच होती. दोन आरमारी अधिकाऱ्यांच्या शेजारीं बसून अनेक आरमारी नौकांचीं चित्रें

मी तासच्या तासपर्यंत बघत असें. हे नकाशे मोठाल्या भिंतीएवढाले प्रचंड होते. ब्रिटिश आरमारांतील प्रत्येक जहाजाची लांबी, रुंदी व त्याचें आकारमान यांची बरोबर नोंद त्या नकाशांत दिली होती. निरनिराळ्या जातींच्या नवीन बांधलेल्या इंग्रजी जहाजांच्या आकाशचित्रांचा अभ्यासहि या वेळीं मीं पुन्हां केला. या साऱ्या खटाटोपाचें कारण तुमच्या लक्षांत पुढें येईलच.

या रीतीनें मला विशिष्ट प्रकारचें शिक्षण देण्यांत स्कॉटलंडच्या किनाऱ्यावर असलेल्या ब्रिटिश आरमारी ठाण्यांत जहाजांच्या ज्या कांहीं तालमी होतात, त्यांचे रिपोर्ट व तेथील जहाजांच्या तयारीसंबंधीं माहिती जर्मनीला पाठविणें हाहि माझ्या कामगिरींतला एक भाग होता.

या सुमारास इंग्लंड व जर्मनी यांजमधील नातें थोडेंसें चमत्कारिक झालें होतें, हें तुमच्या लक्षांत आलेंच असेल. स्यानस अरण्यांत झालेल्या संधिपत्रावर सरकारी शिक्कामोर्तब अद्यापि व्हावयाचें होतें. या अरण्यांत झालेल्या खलबतासंबंधीं दोन्ही देशांतील सामान्य जनसमुहास यत्किंचितहि माहिती नव्हती हें उघडच आहे. निरनिराळ्या मुत्सद्यांनीं निरनिराळ्या प्रकारची ओरड करून या दोन देशांतील वातावरण भावी युद्धाच्या नादानें इतकें भारून टाकलें होतें कीं, हीं दोन मानवकुलें परस्परांवर तुटून पडण्यास तयार होऊन बसलीं होतीं. या वेळीं या दोन देशांतील परिस्थिति एकाद्या दारूच्या कोठारासारखी होती. भडका उठविण्यास एकादी बारीकशी ठिणगी या वेळीं पुरेशी झाली असती. अशा प्रकारची भयानक परिस्थिति असल्यामुळे गुप्त हालचाली केसर यांनीं कमी न करितां त्या उलट अधिक वाढविल्या होत्या. ‘ वारांगनेव नृपनीतिरनेकरूपा ’ हा अनुभव प्राचीन काळापासून आजपर्यंत एकसारखाच खरा आहे. दोन राष्ट्रांनीं परस्परांशीं संधि केला असला, तरी तेवढ्यामुळें दोघांच्याहि मनांतला पडदा गेलेला नसतो. अशा प्रकारें झालेले गुप्तसंधि आयत्या वेळीं अगदीं निरुपयोगी ठरतात, असा नेहमीं अनुभव येतो. युरोपियन राष्ट्रांत परस्परांत कितीहि तहनामे झाले असले, तरी त्यांची परस्परांवरील देखरेख कमी व्हावयाची नाहीं.

ही माझी कामगिरीची प्रस्तावना झाली. इंग्लंडांत मला जीं अनेक कामें करावयाचीं होतीं. त्यांतच ब्रिटिश आरमारावर देखरेख ठेवणें हेंहि एक काम होतें. स्कॉटलंडच्या किनाऱ्यावर होणाऱ्या प्रत्येक हालचालीची बातमी जर्मन आरमारखात्यास तारेनें मला कळवावयाची होती. मला आकाशचित्रांचा अभ्यास पुनः कां करावा लागला, याचें कारण वाचकांच्या लक्षांत आतां आलें असेलच. रात्रींच्या वेळीं अथवा सकाळीं धुकें पडलें असतां जहाजें नांवानें ओळखणें अर्थातच शक्य नव्हतें; पण आकाशचित्रांची पुरी ओळख झाल्यानंतर कोणत्या नमुन्यांचीं गलबतें हालचाल करीत आहेत, हें समजणें कठिण नव्हतें. याकरतां ब्रेडर जहाजें, प्रचंड क्रुझरें, टारपेडो बोटी इत्यादि निरनिराळ्या जातींच्या आकाशचित्रांचा अभ्यास मजकडून करविण्यांत आला होता. नकाशे पाहून झाल्यानंतर त्यांजवरील नांवें झांकून टाकून तीं चित्रें मला ओळखण्यास सांगत. अशा रीतीनें अमुक हा ' क्वीन मेरीचा नमुना, ' हा दुसरा ' अजॅक्सचा नमुना' आणि तिसरा 'व्हायपर ड्रिस्ट्रायर' चा नमुना इत्यादि नमुने मला ओळखण्यास सांगत. ब्रिटिश अरमारातील जहाजें संचांनीं बांधलेलीं आहेत. यापैकीं प्रत्येक संचांतील जहाजें लांबीरुंदींत, आकारमानांत व एकदर बांधणींत एकसारखीं असतात. हे निरनिराळे संच सर्व बाबतींत प्रत्येकापासून पृथक् असतात. बर्लिनमधून निघण्यापूर्वीं या साऱ्या संचांचीं आकाशचित्रे मजकडून पाठ करवून घेण्यांत आलीं होतीं.

या आरमारी विद्येशिवाय त्रिकोणमिति आणि भूनिरीक्षण यांची सुद्धां उजळणी मला करावी लागली. एडिंबरोजवळ रोझिथ बदरांत इंग्लंननें जें नवें आरमारी ठाणें बांधलें आहे, त्याची यथातथ्य माहिती मिळविण्याकरतां नुसत्या दृष्टिक्षेपानें अंतरांची मोजणी करतां येणें अवश्य होतें. याशिवाय क्रोमार्टी येथील ब्रिटिश आरमारी हालचालींवरहि मला लक्ष ठेवावयाचें होतें.

विशेषतः रोझिथ येथील ठाण्यावर लक्ष ठेऊन तेथें नवीन प्रकारची शस्त्रसामुग्री अथवा नवीन उपयुक्त यंत्रें यांची भर करण्यांत आली, तर तिजबद्दलची सर्व माहिती जर्मन आरमारखात्याला पुरवावयाचें काम

मजवर सोंपविण्यांत आलें होतें. त्या वेळीं स्कॉटलंडच्या किनाऱ्यावर ब्रिटिश आरमाराच्या तालमी सुरू होत्या. त्यांजवरहि मला नजर ठेवावयाची होती. हेलिगोलंड येथें जर्मनीनें मजबूत आरमारी ठाणें केल्यानंतर त्याला तोड म्हणून ग्रेटब्रिटननें रोझिथ आणि कोमार्टी येथें नवीं ठाणीं उठविलीं होतीं. जर्मनीच्या उत्तरकिनाऱ्यावर हल्ला करावयाचा असेल, तर तसें करण्यास स्कॉटलंडचा किनारा ही मोठी सोयीची जागा आहे. जर्मनी व ब्रिटन हे दोन्ही देश या वेळीं युद्धास उद्युक्त झाले होते, हें अगोदर सांगितलेंच आहे. एकाद्या क्षुल्लक कारणानेंहि कदाचित् युद्ध सुरू झालेंच, तर स्कॉटलंडच्या किनाऱ्यावरून ब्रिटिश आरमार हालल्यास त्याची बातमी ताबडतोब कळावी अशी व्यवस्था जर्मनीनें केली होती. रोझिथ किंवा कोमार्टी येथें यत्किंचितहि हालचाल दिसल्यास कोणत्या संचाचीं किती गलबतें बाहेर पडत आहेत व शक्य असल्यास या हालचालीचें कारण, इतकी माहिती तारेनें बर्लिन येथें पाठविण्याचा मला हुकूम होता.

ही माझी कामगिरी मीं कोणत्या रीतीनें उरकावी याजबद्दल बातमी खात्यामार्फत मला कांहीं विशेष हुकूम मिळाले नव्हते. अशा प्रकारचे हुकूम मिळावेत अशी माझी इच्छाहि नव्हती. या वेळीं विशेष सावधगिरी राखणें अवश्य झालें होतें. इंग्लंडचें वातावरण संशयाच्या ढगानीं भरून गेलें होतें. हेरांबद्दल एक कडक कायदा नुकताच तेथें पास करण्यांत आला होता. यामुळें अशा प्रकारच्या कामगिरीवर इंग्लंडांत जाणें फार धोक्याचें झालें होतें. बाल्कन संस्थानांतल्याप्रमाणें पाठींत सुरा बसण्याची तेथें भीति नव्हती ही गोष्ट खरी; पण आमच्यासारख्यांची हालचाल बंद करण्यास तुरुंगाचे दरवाजे ' आ ' करून बसले होते. कायदे पास करण्याची नेहमींची तऱ्हा सोडून [illegible] कायदा तातडीनें पास करून घेण्यांत आला होता. या कायद्याचीं कलमें इतकीं लवचिक होतीं कीं नुसत्या संशयावरूनसुद्धां न्यायाधीश आणि जूरी यांस कोणाहि मनुष्यास दोषी ठरवितां आलें असतें. त्या कायद्यांतलें सामान्य तत्त्व म्हणून जें मला आठवतें तें असें:—" कोणाहि मनुष्यानें

अथवा मनुष्यांनीं ग्रेटब्रिटनच्या सुरक्षितपणास धोका येईल, अशी माहिती अथवा असा लेख मिळविला अथवा तयार केला, तर त्यानें बेकायदेशीर कृत्य प्रत्यक्ष केलें नसतांहि त्याला गुन्हेगार समजण्यांत यावें. आणि या गुन्ह्याला सात वर्षेपर्यंत काळेपाण्याची सजा ठरविण्यांत यावी.

इंग्रजराष्ट्राच्या कायद्यांत या नव्या कानूची भर पडल्यामुळें तेथल्या सरकारची शक्ति किती वाढली होती, हें सांगण्यास कायदेपंडीत नको. हा कायदा तांतडीनें पास करून घेण्यांत आला होता, हें मीं तुह्मांला सांगितलेंच आहे. तसें करणें अवश्य होतें, हेंहि येथें कबूल केलें पाहिजे. केवळ सहा महिन्यांच्या अवधींत इंग्लंडांत तीन जर्मन हेर पकडण्यांत आलें होते. या सर्व गोष्टींचा विचार करतां आणि इंग्लंडांतील सरकारी नोकरांची दक्षता पाहतां या कामगिरींत पडण्यास मी फारसा उत्सुक नव्हतों, हें साहाजिकच आहे. माझा धंदा उघडकीस आला तर, त्या अपराधाला सांगितलेली सात वर्षांची शिक्षा माझ्या डोळ्यांसमोर पिशाच्चासारखी उभी राहून मला एकसारखी भेडसावीत होती. कारण, काळें पाणी आणि नरकवास हीं सारख्याच योग्यतेचीं आहेत. इंग्लंडांत जाण्यास दाखला लागत नाहीं ही गोष्ट खरी; पण परस्थ लोक तेथें काय करीत असतात याची माहिती अधिकाऱ्यांना नसते असें मात्र नाहीं. इंग्लंडांत शिरणें सोपे आहे; पण तेथून बाहेर पडणें मात्र फार कठीण. याशिवाय या उभय सरकारांत कांहीं गुप्त तहनामा झाल्याची खबर मला असल्यामुळें या कामांत पडणें एकंदरीनें बरें नव्हे असें माझें मन मला सांगूं लागलें. पुढे जें कांहीं घडलें, त्यावरून माझ्या मनोदेवतेचा कल बरोबर होता, हें सिद्ध झालेंच.

अखेरीस मोठ्या मिळकतीची आशा आणि अधिकाऱ्यांच्या वजनाचें दडपण यांचा जय होऊन मीं माझ्या मनोदेवतेविरुद्ध या कामगिरीचा स्वीकार केला. मीं बर्लिन सोडलें त्या वेळीं या कामगिरीला लागणारीं सर्व प्रकारचीं आयुधें मजपाशीं सज्ज होतीं. ब्रिटिश आरमारांतील प्रत्येक गलबत, प्रत्येक दुर्ग, प्रत्येक आरमारी ठाणें, आणि प्रत्येक कोठाराचीं

ठिकाणें यांचे संकेत शब्द तयार केलेलें पुस्तक मजपाशीं होतें. बातमीखात्याला तारेनें माहिती देण्यासाठीं ब्रुसेल्स, कोपेनहेगेन आणि प्यारीस या तीन ठिकाणीं व्यवस्था करण्यांत आली होती. प्रतिकूळ परिस्थितींत ब्रुसेल्सचें द्वार कदाचित् बंद झालेंच, तर या दुसऱ्या द्वारांचा उपयोग करावयाचा. सी. व्ही. नोएन्स रू द वेनिस नं. ३४ असा ब्रुसेल्सचा पत्ता होता. मजकडून येणाऱ्या सर्व तारा नोएन्स यानें बर्लिन येथील योग्य अधिकाऱ्यांकडे पाठवाव्या असें ठरविण्यांत आलें होतें. तसेंच बर्लिन येथून येणारीं सर्व पत्रें त्यानें लंडन येथील एका तंबाखूच्या दुकानावर पाठवावींत व तेथून तीं पुन्हां टपालांत पडून माझ्या स्काटलंडांतील गांवीं तीं मला मिळावींत अशी व्यवस्था करण्यांत आली होती. पुढें मला ग्लासगो येथें पकडण्यांत आल्यानंतर सहा तासांनीं या तंबाखूच्या दुकानदाराचा शोध पोलिसांनीं केला; पण तो दुकानदार अथवा नोएन्स यांपैकीं कोणीहि त्यांच्या हातीं लागला नाहीं.

अशाच प्रकारची व्यवस्था कोपेनहेगेनमध्यें हॉटेल स्टाड नांवाच्या खानावळीच्या म्यानेजराकडे करण्यांत आली होती. मी कोपेनहेगेन येथें एका कामगिरीवर गेलों असतां हा गृहस्थ जर्मन तैनातींत असल्याचें मला कळून आलें होतें. प्यारीसमध्यें रु द तिवोली भागांत मेरी ब्लांचीच्या दुकानींहि अशाच प्रकारची व्यवस्था करण्यांत आली होती.

हॉलंड आणि हार्वुईच या मार्गानें मी एडिंबरोला जाऊन पोहोंचलों. लंडनच्या मार्गानें न जाण्यांत माझा एक हेतु होता. विशेषतः त्या वेळचें वातावरण युद्धाच्या ढगांनीं व्याप्त झालेलें असल्यामुळें लंडनांत येणाऱ्या सर्व बोटी आणि गाड्या यांजवर सक्त नजर राखण्यांत येत असे. सामान्य प्रवाशाच्या लक्षांत ही गोष्ट फारशी येत नाहीं; तथापि प्रत्येक गाडीच्या वेळीं गुप्त पोलिसच नव्हे, तर सरकारानें नेमलेले कांहीं खास कामगारहि स्टेशनावर हजर असत ही गोष्ट खरी. त्यांच्या नजरेंतून बहुधा कोणतीहि गोष्ट चुकत नाहीं. इंग्रज नसलेला कोणीहि प्रवासी बोटींतून अथवा गाडींतून उतरल्याबरोबर एक वयातीत, करड्या केसांचा, उंच टोपीचा, हातांत छत्री असलेला असा पेन्शनर लष्करी अम्मलदारासारखा दिसणारा

गृहस्थ इकडे तिकडे पहात असलेला त्याला आढळून येईल. कोणाहि परस्थाबद्दल याला संशय आला, तर तो परस्थ लंडनांत शिरल्यापासून त्याजवर एकसारखी नजर राखण्यांत येते.

वरील सर्व भानगडींतून निसटण्यासाठींच मीं लंडनचा रस्ता टाळला आणि हॉलंडच्या रस्त्यानें एडिंबरोला उतरून प्रिन्सेस रस्त्यावरील बेलफर्ड हॉटेलमध्यें मीं आपला नळ दिला. या ठिकाणीं मी आपलें नांव ए. के. ग्रेव्हज एम. डी. असें नोंदून टयूरो, ऑस्ट्रेलिया, असा पत्ता दिला होता. स्कॉटलंडांतील सुप्रसिद्ध विद्यापीठांत अधिक शिक्षण घेण्याकरितां मी आलों आहें, असा समज करून देण्याचा माझा उद्देश होता. थोडे दिवस हॉटेलांत काढल्यानतर मिसेस म्याक्लिऑड नांवाच्या बाईच्या घरीं मीं स्वतंत्र बिऱ्हाड केलें. दर आठवड्याला मला हातखर्चासाठीं सवा दोनशें रुपये मिळत असत. याशिवाय मेजवान्या, मोटारगाड्यांचे प्रवास वगैरे खर्च वेगळा मिळत असे.

पहिला पंधरवडा मीं सामान्य निरीक्षणांत घालविला. आपल्या आजुबाजूची परिस्थिति कशा प्रकारची आहे, याचें निरीक्षण या अवधींत मीं केलें. मी नुकताच आजारांतून उठलेला व हवा पालटण्याकरतां आलेला इसम आहें, असा समज मीं पसरविला. एडिंबरो शहर व त्याच्या आजुबाजूंचा भाग येथें फिरून मीं शहराची सामान्य माहिती करून घेतली. या माझ्या भटकण्यांत फोर्थच्या खाडीचें निरीक्षणहि मीं कित्येक केळां केलें. या खाडीच्या किनाऱ्यावर रोझिथचें आरमारी ठाणें आहे. या खाडीवरून पलीकडे जाण्यास एक लांबलचक पूल बांधलेला आहे. ठाण्यांतून निघणाऱ्या व ठाण्याकडे येणाऱ्या गलबतास या पुलाखालून जावें यावें लागतें. या पुलासंबंधीं ब्रिटिश आरमार खात्याच्या फायद्याची एक गोष्ट सांगण्यासारखी आहे, पण ती पुढें सांगेन.

हळुहळू त्या पुलाच्या पहारेवाल्यांपैकीं एकाच्या पोटांत मी शिरलों. या मनुष्याचें नांव देण्याचें कारण नाहीं. कारण तशानें त्या बिचाऱ्याचें नाहक नुकसान होईल. त्याचा स्नेह मीं संपादन केल्यामुळें त्या आरमारी ठाण्याचें निरीक्षण करण्याची संधि मला मिळाली. तसेंच मला जरूर

असणाऱ्या अनेक बारीकसारीक गोष्टींची माहितीहि त्याजकडून मला मिळाली. ही माहिती मला देण्यांत आपण कांहीं अपराध करीत आहों, अशी त्या बिचाऱ्याची कल्पनाच नव्हती. ही माहिती देण्यांत त्याला कवडीचीहि प्राप्ति नव्हती, आणि या दृष्टीनें त्याला देशद्रोही समजण्याचें कांहीं कारण नाहीं. त्याचा बराचसा विश्वास व मैत्री संपादन केल्यानें त्या पुलाची बांधणी व त्यांतील सर्व प्रकारच्या खुब्या यांचा सविस्तर अभ्यास करण्याची संधि मला मिळाली. आरमारी दृष्टया हा पूल अत्यंत महत्त्वाचा आहे. या पहारेवाल्याच्या ओळखीनें खाडीच्या कित्येक संत्र्याशींहि माझी दोस्ती जमली. स्कॉटलंडच्या इतिहासाची मला चांगली माहिती होती. तिच्या आधारावर रॉबी बर्न्स, वॉलटर स्कॉट, प्रिन्स चार्ली वगैरे गत पुरुषांबद्दल अनेक प्रकारच्या गप्पा मी ठोकीत असें, आणि शिवाय त्या गप्पा ठोकतां ठोकतां व्हिस्कीच्याहि कांहीं बाटल्या आमच्यांत रिकाम्या होत असत. या माझ्या अघळ पघळ वर्तनामुळें मी अर्धामुर्धा स्कॉचच आहें, असा त्यांचा समज झाला होता. या संत्र्यांपासून रोझिथ येथील ठाण्यासंबंधीं मला अधिक निश्चित माहिती मिळाली. या ठाण्याच्या आसपासच्या भूरचनेची माहिती मिळवावयाची म्हणजे, तेथें प्रत्यक्ष काम करीत असलेल्या लोकांकडूनच ती मिळविणे भाग होतें. या भूमीचे नकाशे बर्लिन येथे आमच्या सग्रहालयांत होतेच; पण त्यांतील माहिती असावी तशी बरोबर नव्हती. रोझिथ येथील दुर्गासंबंधाची शास्त्रीय माहिती मीं कांहीं लष्करी व मुलकी अधिकाऱ्यांकडून मिळविली. यांपैकीं बहुतेक अम्मलदार चांगल्या उच्च दर्जाचे होते. यांना मेजवान्या वगैरे देऊन त्यांच्याशीं मीं बरेंच दळणवळण ठेवलें होतें.

मीं जो आकाशचित्रांचा अभ्यास बर्लिनमध्यें केला होता, त्याचा उपयोग होण्याची संधि आतां प्राप्त झाली. एके रात्रीं आरमारी जहाजांतून वाफ निघत आहे, अशी बातमी मला माझ्या पहारेकरी मित्राकडून मिळाली. मी त्या रात्रीं पुलावर जाऊन उभा राहिलों व पुढें काय होतें ह्याची वाट पहात बसलों. हलुहळू पहांटे पांचाचा सुमार झाला. धुकें जिकडे तिकडे पसरलें होतें. त्या धुक्याच्या पडद्या पाठीमागून आर-

मारी जहाजें हालण्यास सुरुवात झाली. जणूं काय पिशाचांचा संघ फेरावयास निघाला आहे, असें त्या वेळच्या देखाव्यावरून वाटण्यासारखें होतें. जहाजांची एकंदर संख्या सोळा होती, असें मला दिसलें. त्यांच्या आकाशचित्रांवरून त्यांत कांहीं ब्रेडर जहाजें, कांहीं क्रुझरें आणि कांहीं डेस्ट्रॉयर जहाजें होतीं. ताबडतोब ही माहिती ब्रुसेल्स मार्गानें मीं जर्मन आरमारखात्याला तारेनें कळविली. या गलबतांचें वर्णन देण्यांत मीं फक्त एकच चूक केली होती, असें मला पुढें आढळून आलें.

या ठिकाणीं इंग्लंडच्या हितासाठीं एक उपयुक्त सूचना मी त्याला फुकटांत देतों. माझ्या खटल्याच्या वेळीं मला चांगल्या रीतीनें वागवेल्याबद्दल हा मी मोबदलाच देत आहें, असें समजा. फोर्थ खाडीवरील पूल हा रोझिथ ठाण्याला एक मोठें धोक्याचें कारण आहे. तें कारण असें:--

रोझिथ ठाणें आणि बाहेरील समुद्र यांच्यामध्यें हा पूल असल्यामुळें याजपासून धोका उद्भवण्याचा संभव आहे. युद्धास सुरुवात झाल्यावर किंवा त्याच्या आधींहि थोडा वेळ हा पूल सुरुंगानें उडविणें अशक्य नाहीं. अशा रीतीनें हा पूल पडला गेला तर रोझिथ ठाण्याच्या तोंडाला बूच बसून आंतील सर्व आरमार जागच्या जागीं कोंडलें जाईल. शत्रूचीं जहाजें स्कॉटलंडच्या किनाऱ्याचा धुव्वा आपल्या तोफखान्यानें उडवीत असतां या कोंडलेल्या जहाजांना कोणतीच हालचाल करतां येणें कित्येक दिवसपर्यंत शक्य होणार नाहीं. माझ्या म्हणण्याचा अर्थ ब्रिटनच्या परराष्ट्रीय खात्याच्या लक्षांत येईलच.

ज्या भूमीवर हा पूल बांधला आहे, त्या भूमींत मधून मधून नरम आणि भुसभुशीत मातीचे पदर आहेत. यामुळें तेथें सुरुंग भरून ठेवयास फार सोयीचें झालें आहे. फोर्थ खाडीच्या पुलाला एडिंबरोकडून जो मार्ग येतो, त्या मार्गावरील दोन बखळी व त्यांतील घरेंहि जर्मनांच्या मालकीचीं आहेत, ही गोष्टहि मला समजली आहे. या बखळींच्या खरेदीपत्रांतील मालकांचीं नांवें स्कॉच नांवांसारखीं भासतात, पण मालक खरोखर जर्मन आहेत. या पुलाच्या दोन्ही टोंकांना मच्छिमार लोकांचीं

खेडीं आहेत व त्यांत पुष्कळ कोळी बाह्यतः ब्रिटिश नांवें धारण केलेले आहेत, पण त्यांचीं नांवें अद्यापिहि जर्मनीच्या आरमारी रजिस्टरांत नोंदलेलीं आहेत. युद्धाचा प्रश्न उपस्थित झाल्यास वरील दोन घरांत भरून ठेवलेल्या स्फोटक द्रव्यांचा उपयोग करून पूल व आजूबाजूची भूमि यांचे राई राईएवढे तुकडे करणें या माणसांस अशक्य नाहीं.

तीन आठवड्यांनंतर माझ्या हालचालींसंबंधीं संशय उपस्थित होत आहे, अशी शंका मला येऊं लागली. एके रात्रीं मी घरीं गेलों असतां माझ्या कपड्यांच्या घड्या मोडून त्या पुन्हां घातल्या गेल्या आहेत, असें मला आढळून आलें. मीं घराच्या मालकिणीला तावडतोब हांक मारली आणि माझा शिंपी येऊन गेला कीं काय असा प्रश्न तिला मीं विचारला. त्यावर तिनें नाहीं असा जबाब दिला. मीं म्हटलें, “ मग माझ्या कपड्यांना तुह्मांला हात लावण्याची काय जरूरी होती ? ”

तिचा चेहरा एकदम गोरामोरा झाला. ती बरीच घाबरून गेल्यासारखी दिसली. अडखळत अडखळत ती म्हणाली, “ मीं तुमच्या खोलींत पाऊल देखील ठेवलें नाहीं. हो-हो- पण आठवण झाली. तुमचा शिंपी आला होतासें वाटतें. नोकरानें त्याला तुमच्या खोलीचा दरवाजा उघडून दिला होता. ”

घरधनीण [illegible] मोठी वस्ताद होती. माझ्यापासून शक्य तितके पैसे वसूल करून अखेरीस माझ्या खटल्याच्या दिवशीं कोर्टांत म्हणाली, “ हा [illegible]हस्थ माझ्या घरीं राहिल्यापासून पंधराच दिवसांनीं हा जर्मन हेर असावा, असा मला संशय आला. ”

सारीं कामें बाजूस ठेवून मीं तावडतोब शिंप्याच्या दुकानीं गेलों आणि त्याजपाशीं चौकशी करतां बाईची गोष्ट बनावट होती, असें मला आढळून आलें. तो शिंपी माझ्या बिऱ्हाडीं मुळींच गेला नव्हता. माझ्या हालचालींवर नजर राखण्यांत येत आहे कीं काय, याची शहानिशा करून घेण्याचा मीं निश्चय केला. दुसऱ्याच दिवशीं प्रिन्सेस स्ट्रीटवरील एका सुप्रसिद्ध विश्रांतिगृहांत मी गेलों. तेथील बाजूच्या एका खोलींत जाऊन मीं कांहीं पत्रें लिहिलीं व त्यांपैकीं मुद्दाम एक जमिनीवर खालीं टाकून

दिलें. नंतर हात धुण्याकरितां नळाकडे गेलों व पांच मिनिटांच्या आंत परत येऊन पाहतों तों मीं जामिनीवर टाकलेलें पत्र गुप्त झाल्याचें आढळून आलें. तेथील चावीवाला व खिजमतगार यांजकडे या बाबतींत मीं चौकशी केली तेव्हां एक गृहस्थ तें पत्र खिशांत घालून चालता झाला, असें मला समजलें. माझ्या शकेचे निराकरण झालें. मजवर पाळत राखण्यांत येत होती, असें मला आढळून आलें.

आमच्या पाळतीवर असलेल्या या गुप्त पोलिसाला ग्रीक वाचतां येत असेल तर खरोखरच फार बहार उडाली असेल. कारण माझ्या पत्राचें भाषांतर करण्याचे श्रम घेऊन त्यानें आपला वेळ फुकट दवडला असेल, तर 'मेरीचें एक लहानसें कोंकरूं होतें' या इंग्रजी कवितेचें ग्रीक भाषांतर त्यास पहावयास मिळालें असेल.

आतां कांहीं तरी शिताफीचें धाडस केलें पाहिजे, असा हा प्रसंग असल्याचें मला स्पष्ट दिसून आलें. मी ताबडतोब एडिंबरो येथील मुख्य पोलिस ठाण्यावर गेलों आणि माझ्या नांवाचें कार्ड मुख्य अधिकारी रॉस यांस पाठवून दिलें. त्यांनीं मला खोलींत बोलाविलें. खोलींत गेल्याबरोबर मीं आपला तोफखाना एकदम सुरू केला.

" मी जर्मन हेर आहें, अशी शंका घेण्यास तुह्मांला कांहीं कारण आहे काय ? " माझ्या या प्रश्नाचा योग्य परिणाम त्या अधिकाऱ्यावर झाल्याचें मला दिसून आलें.

" छे ! छे ! मुळींच नाहीं. आपण काय म्हणतां याबद्दल मला मुळींच माहिती नाहीं. "

" मग माझ्यावर जी नजर राखण्यांत येत आहे, ती आपल्या हुकुमानें नव्हे तर ? "

" असें खरें. यासंबंधानें मीं कांहींच हुकूम दिलेले नाहींत. "

" अशा प्रकारच्या महत्त्वाच्या गोष्टींत आपल्या हुकुमावांचून खालचे अधिकारी आपणच कांहीं खटपटी करतील हें शक्य दिसत नाहीं. "

" पण तुमच्या हालचालींवर नजर ठेवण्यांत येत आहे, असें तुह्मांला वाटण्याला कांहीं कारण आहे काय ? "

" कारणें पुष्कळ आहेत. एका गुप्त पोलिसानें तर माझ्या खोलींत शिरून माझें सामानसुमानसुद्धां तपासलें. ही गोष्ट धडधडीत ब्रिटिश कायद्याविरुद्ध आहे, आणि अशा प्रकारची झडती घेण्यास वारंट लागत असतें, ही गोष्टहि तुह्मांला ठाऊक असेलच. मी जर्मन हेर आहें, अशी शंका घेण्यास तुह्मांला कांहीं कारण असेल, तर तुह्मांला काय करावयाचें असेल तें आतांच करा. नाहीं तर हा नसता मूर्खपणा तरी बंद करा. मी आतांपर्यंत या गोष्टी थट्टेवारी नेल्या. पण मनुष्याच्या थट्टेखोर स्वभावालासुद्धां कांहीं सीमा असतेच. "

माझें हें भाषण ऐकून रॉससाहेबांनीं गंभीर मुद्रा धारण केली. ते धिटाईनें ह्मणाले, " डॉक्टर, आम्ही हुकुमाचे धनी आहों, ही गोष्ट तुह्मांला ठाऊक आहेच. तथापि तुमच्या बाबतींत कांहीं तरी चूक झाली असावी अशी खात्री वाटते आणि अतःपर आमच्याकडून तुह्मांला उपसर्ग पोहोंचणार नाहीं. "

एवढें भाषण व परस्पर सलाम होऊन मी तेथून बाहेर पडलों. अर्थातच एवढ्यानेच माझ्या मागचा शुक्लकाष्ठ सुटणार नाहीं, हें मला माहीत होतें; तथापि मी मुख्य पोलिस अधिकाऱ्याची भेट घेऊन आलों या एवढ्या गोष्टीनें पोलिसांची हालचाल थोडी मंदावेल अशी खात्री वाटून मी तिकडे अधिक लक्ष दिले नाहीं. बर्लिनला तारा व पत्रें लिहिण्याचा माझा क्रम मीं धड्याक्यानें सुरू ठेवला व माझ्या एकंदर दिनचर्येंत मीं कांहींच फरक केला नाहीं. रॉससाहेबांची भेट होऊन आठ दिवस झाल्यानंतर ग्लासगो येथील वुइलियम बर्डमोअर आणि कंपनी ही ब्रिटिश सरकाराकरतां एक नवीन चौदा इंची तोफ तयार करीत असल्याची खबर मला कळली.

या बातमीवरून मी आपला मुक्काम हालवून ग्लासगोला गेलों व या तोफेसंबंधीं माहिती मिळविण्याचा निश्चय मीं केला. तेथें सेंट्रल स्टेशन हॉटेलमध्यें राहून थोड्याच आठवड्यांच्या अवधींत या नव्या हत्यारासंबंधीं समग्र माहिती मीं मिळविली. ती माहिती मीं कशी हस्तगत केली, याचा तपशील सांगणें फार कंटाळवाणें होईल; तथापि थोडक्यांत इतकेंच सांगावयाचें कीं ' दाम करी काम ' ही म्हण सर्वत्र सारखीच लागू पडते.

या नव्या तोफेची रचना, गोळ्या उडवण्याची पद्धत वगैरे सर्व प्रकारची माहिती मीं मिळविली. ग्लासगोस असतांना जेम्स स्त्र्याफर्ड या नांवानें माझा पत्र व्यवहार चालत असे. या नांवानें आलेलीं दोन पत्रें मीं जनरल पोस्टआफिसांत जाऊन घेतलीं; पण तिसऱ्या खेपेस मी पत्र मागावयास गेलों असतां एस्. स्त्र्याफर्ड या नांवानें एक पत्र आल्याचें मला सांगण्यांत आलें. ' पत्र माझेंच आहे, ' असें मीं म्हटलें.

तेथील कारकुनाचें समाधान झालें नाहीं असें दिसलें. तो म्हणाला, " तुह्मी जेम्स स्त्र्याफर्ड असें नांव सांगतां, त्या अर्थी हें पत्र तुह्मांस मला देतां येत नाहीं. अशी गोष्ट करणें पोस्टाच्या कायद्याविरुद्ध आहे. "

कारकुनाविरुद्ध तक्रार करणें शक्य नसल्यानें मी तेथून तसाच बाहेर पडलों. पोस्टमार्फत येणाऱ्या पत्रांत कांहीं आक्षेप घेण्यासारखा मजकूर किंवा वस्तु घालण्याचा मूर्खपणा आमचे खातें करील, असें क्षणभरहि माझ्या चित्तांत आलें नाहीं. तथापि पुढें जें कांहीं घडून आलें, त्यावरून असा ' मूर्खपणा ' त्यांनीं केला होता, असें सिद्ध झालें. तसेंच नेहमींच्या शिस्तीला सोडून हें पत्र जेम्स स्त्र्याफर्ड या नांवानें न येतां एस्. स्त्र्याफर्ड या नावानें कां आलें, याचाहि उलगडा पुढें झाला. यापूर्वीं मला येणारीं सर्व पत्रें डॉक्टर ए. के. ग्रेव्हज या नांवानें येत असून तीं लंडन येथील बरोज आणि वेलकम या नांवाच्या सुप्रसिद्ध गांधिच्या पाकिटांतून येत असत. हीं पाकिटें व कागद या कामासाठीं मुद्दाम तयार करण्यांत आले होते. प्रथम हीं पत्रें लंडनला यावयाचीं व तेथें या पाकिटांत घालून तीं मजकडे रवाना व्हावयाचीं असा क्रम असे, युरोपांतील पोस्ट ऑफिसें फार संशयखोर झालीं आहेत. तेव्हां त्यांना या पत्रांचा संशय येऊं नये म्हणून ही व्यवस्था मुद्दाम करण्यांत आली होती. एडिंबरो येथील डॉक्टरला एखाद्या सुप्रसिद्ध गांधीकडून पत्रें येणें हें अगदीं स्वाभाविक होतें.

मी एडिंबरोहून चौदा इंच तोफेची माहिती काढण्यासाठीं निघालों, त्या वेळीं आमच्या लंडन येथील साथीदारांस जेम्स स्त्र्याफर्ड या नांवानें साध्या पाकिटांतून पत्रें पाठविण्याचा इशारा मी दिला होता. पहिलीं दोन पत्रें बरोबर नांवाचीं व साध्या पाकिटांत घातलेलीं अशीं होतीं; पण या

तिसऱ्या पत्रावर नांव चुकीचें होतें. एवढेंच नव्हे, तर तें बरोज आणि वेलकमच्या पाकिटांतून आलें होतें. या ' मूर्खपणाचें ' कारणहि मला पुढें कळलें.

तें पत्र पोस्टांतून घेण्यास कोणीच मालक न आल्यामुळें बरोज आणि वेलकमकडे तें परत पाठविण्यांत आलें. कंपनीनें तें पत्र फोडलें, तेव्हां त्यांत जर्मन भाषेंत टाइपरायटरनें छापलेलें एक पत्र व प्रत्येकीं दहा पौंडांची एक अशा बँक ऑफ इंग्लंडच्या पांच नोटा आंत निघाल्या. पत्रांतील मजकूर अशा स्वरूपाचा होता कीं, तें पत्र पोलिसकडे पाठविणें कंपनीस इष्ट वाटलें.

एप्रीलच्या १४ तारखेस संध्याकाळीं मी पोशाक करून आपल्या लिहिण्याच्या खोलींत बसलों होतों. त्या दिवशीं माझे कांहीं स्नेही आपल्या पंक्तीचा लाभ देण्यासाठीं संध्याकाळीं हॉटेलांत यावयाचे होते. त्यांची मी वाट पहात असतां एक नोकर माझ्या खोलींत आला आणि ह्मणाला, तुमची भेट घेण्यासाठीं कोणी इसम खालीं आला आहे.

माझें चित्त अस्वस्थ झालें. पुढें येणाऱ्या संकटाची छायाच जणूं मला दिसूं लागली. हे माझे स्नेहीच आले असते, तर मला खालीं येण्याची सूचना न करतां तेच वर आले असते. पोलीसनें मला धरावें अशीच ही वेळ असली, तर ती टळणार नाहीं, असेंहि मला स्पष्ट दिसलें. या धंद्यांत मनुष्य नेहमीं दैववादी बनतो; तथापि स्वसंरक्षणार्थ माझ्या आतल्या सद्याच्या खिशांत माझ्या औषधाची छोटी पेटी मीं घातली. जरूर पडलीच तर माझ्या संरक्षणाचें हेंच साधन होतें. नंतर मी खालीं आलों. त्या वेळीं माझा एक हात बाजूच्या खिशांत असून दुसरा कोटाच्या आंतील बाजूस होता. जरूर पडलीच तर त्या औषधांची पेटी चटकन काढतां यावी असा माझा उद्देश होता.

मी जिना उतरून खालीं येऊं लागलों. जिन्याच्या शेवटच्या पायरीवर मी पोंचलों असेन नसेन इतक्यांत साधा पोषाख केलेल्या पोलिसांनीं मजवर झडप घातली. पुढें काय करावयाचें याचा मी फार झटपट विचार करूं लागलों. खिशांतील पुड्या शिपायाच्या तोंडावर उधळून मी तेथून

निसटलों असतों; पण तेवढ्यानें ब्रिटिश बेटांतूनच काय, पण ग्लासगो शहरांतूनहि मला बाहेर पडतां आलें नसतें. अशा पळण्यानें माझ्या वरील आरोपास उलट पुष्टि मात्र आली असती. असा विचार करून मी निमुटपणें त्यांच्या स्वाधीन झालों. नंतर थोडेंसें अवसान आणून मला कां धरतां असा प्रश्न मीं त्यांना केला.

इन्स्पेक्टर ह्मणाला, "तें तुह्मांला लवकरच समजेल."

इतक्यांत माझ्या खोलींतील टेलीफोनची घंटा वाजली. इन्स्पेक्टर धांवतच तिकडे गेला. माझा एकादा साथीदार मला बातमी देत असावा असें त्यास वाटलें.

नंतर त्यानें माझा झाडा घेण्याचा हुकूम शिपायांना केला; परंतु माझ्या पाशीं एकादें पिस्तुल, बांबगोळा किंवा जंबिया अशांपैकीं कांहींच हत्यार सांपडलें नाहीं, हे पाहून त्याला फार आश्चर्य वाटलें. नंतर त्यानें मला माझ्या खोलींत परत नेलें आणि तेथें माझें सामानसुमान तपासून त्याचें एक गांठोडें त्यानें बांधलें. माझें पुढें काय होणार, याचा अजमास मला होताच; तथापि पोलिसला मीं अगदींच पोकळ सोडलें नाहीं. हॉटेलचे म्यानेजर मिस्तर–यांस आणखी एका साक्षिदारासह बोलावण्यास मीं सांगितलें. हे साक्षिदार आंत आले आणि त्यांनीं माझ्या साऱ्या चीजवस्तूंची नोंद केली. नंतर या साऱ्या वस्तू पोलिसानें आपल्या ताब्यांत घेतल्या. माझ्या सर्व खतापत्रांची नोंद योग्य रीतीनें होत आहे कीं, नाहीं याची मीं काळजीपूर्वक तपासणी केली. एकाद्या हेरावर खटला सुरू झाला ह्मणजे तपासणीच्या वेळीं त्याजवळ न सांपडलेले कागदहि पुष्कळ वेळां कोर्टांत येत असतात! या सर्व प्रकरणाचा शोध आपणच एकट्यानें लावला असून लंडनच्या बरोज वेलकम कंपनीची आपणास कांहींच मदत झालेली नाहीं, अशा थाटानें तो इन्स्पेक्टर वागत होता. त्यानें मला धाकदपटशाहि देण्याचा यत्न करून पाहिला. माझें पकड वारंट मला वाचून दाखवा, अशी निकड मीं त्याच्या मागें लावली; तेव्हां मोठ्या नाइलाजानें त्यानें तें वारंट वाचून दाखविलें. पार्लमेंटांत घाईघाईनें पास केलेल्या गोपन-

स्फोटाच्या कायद्याखालींच तें वारंट काढलें असून ब्रिटिश साम्राज्याच्या सुरक्षितपणास धोका आणण्याचा आरोप त्यांत मजवर ठेवला होता.

ती रात्र मीं ग्लासगोच्या तुरुंगांत काढली. दुसऱ्या दिवशीं मला तेथील म्याजिस्ट्रेटापुढें उभें करण्यांत आलें. शेरिफच्या कोर्टांत चौकशी व्हावी, असा म्याजिस्ट्रेटनें हुकूम दिला. तारीख १२ जुलई रोजीं शेरिफच्या कोर्टांत माझा खटला निघाला. शेरिफनें अधिक चौकशी न करतां एडिबरो येथील हायकोर्टाकडे तो खटला वर्ग केला. कोणत्याहि प्रकारची चौकशी न करतां खटला वर्ग झाला, म्हणजे तो कोर्टांत येण्याची अधिकांत अधिक मुदत ब्रिटिश कायद्याप्रमाणे १०५ दिवसांची आहे. या मुदतीचें शेवटचें मिनिट भरेपर्यंत मला वाट पहावी लागली, हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. माझ्या पूर्वचरित्राची माहिती मिळविण्याचा यत्न पोलिस करीत होते; पण त्यांत त्यांना यश आलें नाहीं.

लॉर्ड प्रोव्हो यांजकडून मला एक पत्र आलें व माझ्या बचावाचीं सर्व साधने खटल्याचे आधीं एक दिवस मीं त्यांजकडे द्यावीं, असें त्यांनीं मला कळविलें होतें. त्या वेळीं मजपाशीं बचवाचीं कोणतींच साधनें नव्हतीं. मीं कोणतीहि गोष्ट नाकारली नाहीं, अथवा कबूलहि केली नाहीं. मीं कोणताच अपराध केला नसल्यामुळें मला कांहीं बचावहि करावयाचा नाहीं, असें मीं लॉर्ड प्रोव्हो यांना कळविलें. माझ्या या उत्तरानें लॉर्डसाहेब अधिकच बुचकळ्यांत पडले. माझीहि इच्छा तीच होती.

त्या वेळचीं इंग्रजी आणि स्कॉटिश वर्तमानपत्रें तुह्मीं पाहिलीं, तर इंग्लिश किंवा स्कॉटिश कोर्टांत इतका चळवळ उडविणारा खटला पूर्वीं कधींहि आला नव्हता, असें वर्णन तुम्हांस आढळून येईल.

आतां या खटल्यासंबंधीं सविस्तर हकीकत मी उघडपणें सांगतों. माझी गुप्तपणें सुटका कशी झाली, आणि ती कोणीं व कां केली, हें गौप्यहि मी आतां उघड सांगणार आहें. मी अमेरिकेंत आहें, ही गोष्ट फुटेपर्यंत मी तुरुंगांत आहें, असा जर्मन परराष्ट्रखात्याचाहि समज होता.

सरकारतर्फे मजविरुद्ध एकंदर पंचेचाळीस साक्षिदार उभे करण्यांत आले होते. त्यांत ॲडमिरल, कर्नल, क्याप्टन, लष्करी आणि आरमारी

तसेच पोस्ट खात्याचे अधिकारी इत्यादि अनेक लहानथोर मंडळी होती. या सर्वांचेच हुद्दे मला आतां आठवत नाहींत. युरोपांतील सर्व भागांतून वर्तमानपत्रांचे बातमीदारहि आले होते. कारण, या खटल्यांत सर्व युरोपचाच संबंध होता. कोर्टाची विस्तीर्ण इमारत प्रेक्षकांनीं अगदीं गच्च भरून गेली होती, असें मला आतां आठवतें. खटल्याच्या संबंधांत बाहेर पडलेलीं बडीं बडीं नांवें, खटल्याची चमत्कारिक परिस्थिति आणि तो खटला एका जर्मन हेरावर होता ही गोष्ट, इतक्यामुळें या खटल्याला अपूर्वता प्राप्त झाली होती. त्यामुळें सर्वत्र विलक्षण चळवळ उडाली होती.

स्कॉटलंडचे लॉर्ड जस्टिस हे स्वतःच न्यायासनावर बसले होते.लष्करी बाबतींत हे गृहस्थ स्वतः फार निष्णात आहेत. सरकारतर्फे सॉलिसिटर जनरल सर ए. एम्. अँडरसन हे खटला चालवीत असून, अॅडव्होकेट डेप्युटी जी. मॉर्टन हे त्यांना मदत करीत होते. सरकारनें त्या वेळीं माझ्या विरुद्ध नामांकित कायदेपंडित उभे केले होते.

ब्रिटिश कोर्टांत खटले चालविण्याचें काम किती गंभीरपणानें चालविलें जातें, हें प्रत्यक्ष पाहिल्याशिवाय कळावयाचें नाहीं. १९१२ च्या जुलई महिन्याच्या २३ साव्या तारखेस सकाळीं दहांचा ठोका पडला आणि माझ्या खटल्यास सुरवात झाली. राजकीय थाटाचा लाल झगा परिधान करून लॉर्ड जस्टिस यांची स्वारी कोर्टाच्या प्रमुखस्थानीं विराजमान झाली. ‘ खामोश खामोश ’ असा पुकारा चोपदारांनीं केला. एवढी प्रस्तावना झाल्यानंतर जूरी बोलावण्यां । आली. ज्यूरीपैकीं कित्येक गृहस्थांस मीं नापसंत केलें. गुप्त खात्यांतील बारा वर्षांच्या अनुभवानें चेहऱ्यावरून मनुष्याची पारख करण्याची विद्या मला बरीच साध्य झाली होती. ज्यूरीच्या पिंजऱ्यांत बसलेले पक्क्या डोक्याचे व सावध असे ते बारा स्कॉटिश गृहस्थ भक्कम पुराव्यावांचून मजविरुद्ध निकाल देणार नाहींत अशी माझी पक्की खात्री होती. मजविरुद्ध जमा केलेला पुरावा पोकळ आहे, व तेवढ्यावरून आरोपाची शाबिती मजवर होणार नाहीं, असें त्या वेळीं मला वाटत होतें, हें मी प्रांजलपणें सांगतों.

ब्यारिस्टरची मदत मीं नाकारली, याबद्दल जज्जसाहेबांनाहि फार आ-

अर्य वाटलें व ' कायद्याच्या मुद्यांसंबंधीं मी तुमचें रक्षण करीन ' असें ते ह्मणाले; व त्याप्रमाणें त्यांनीं केलेंहि. तरी पुढें माझ्या बाजूनें काम चालविण्यासाठीं एक ब्यारिस्टर उभा करण्यांत आला होता. सॉलिसिटर जनरलच्या बऱ्याच मुद्यांविरुद्ध जज्जसाहेबांनीं निकाल दिला व बऱ्याच मुद्यांसंबंधीं त्यांच्याशीं वादविवादहि केला. एकंदरींत न्यायाची तराजू फारच समतोलपणें उचलली गेली, हें मी आनंदानें व प्रांजलपणें कबूल करतों. स्कॉटिश न्यायपद्धति किती चोख आहे, याचें माझा खटला हें एक उदाहरण होय.

पहिल्या दिवशीं आरमारी आणि लष्करी तज्ज्ञांवांचून इतरांची उलट तपासणी करण्याचें मीं नाकारलें. ग्लासगो येथील बर्डमोअर आणि कंपनीच्या तोफांच्या कारखान्याचे सुपरिन्टेडेंट रियर-ॲडमिरल टी. बी. स्टूयाटनहडेर यांजवर उलट तपासणीचा जंगी भडिमार मीं केला. ॲडमिरलसाहेब दिसण्यांत चेंबरलेनसारखे दिसत होते. चेंबरलेनसाहेबांप्रमाणें त्यांनींहि एका डोळयाला कांच लावली होती. सरकारतर्फेचे महत्त्वाचे साक्षिदार या नात्यानें ॲडमिरलसाहेबांनीं विशेषशी कामगिरी बजावली नाहीं. नव्या चौदा इंची तोफेसंबंधीं साक्ष देण्याकरतां यांना बोलावण्यांत आलें होतें. खुद्द ग्लासगो येथील कारखान्यांतून प्रत्यक्ष माहिती मिळविली असल्यावांचून या नव्या तोफेसंबंधीं इतकें तपशीलवार ज्ञान कोणासहि असणें शक्य नाहीं, हा मुद्दा या साक्षिदारामार्फत सरकारास सिद्ध करावयाचा होता. अर्थातच, तोफांच्या एकंदर यंत्ररचनेच्या शास्त्राचें विवरण सुरू झालें. ॲडमिरल यांना अनेक प्रश्न विचारून या विशिष्ट तोफेचा गोळा उडविण्याचें व निशाणांत घुसविण्याचें सामर्थ्य किती असतें या मुद्यावर त्यांस मीं घोंटाळयांत घातलें. बोलण्यावरून बोलणें वाढत चाललें आणि हे गृहस्थ ब्रिटिश आरमार खात्यांत रियर—ॲडमिरलच्या दर्जापर्यंत वाढले असतांहि स्वतःच्या तोफखान्यासंबंधीं मजहून त्यांना अधिक माहिती नाहीं, असें प्रेक्षकांस वाटूं लागलें. या प्रश्नोत्तरांच्या जाळयांत गुरफटतां गुरफटतां कांहीं गुप्त गोष्टींचा स्फोट करण्याच्याहि ते बेतांत आले; पण इतक्यांत सावध होऊन ते कोर्टाकडे वळून ह्मणाले,

" न्यायाधीश महाराज, खुल्या कोर्टांत या मुद्याची अधिक चर्चा करणें ब्रिटिश सरकारच्या हितसंबंधास बाधक आहे. "

तोफांच्या रचनेसंबंधाचे माझें एकंदर ज्ञान अगोदरच इतकें विस्तृत होतें कीं, बर्डमोअर कंपनीच्या कारखान्यांतून चोरून माहिती मिळविण्याचें मला कारणच नव्हते. हे माझें ह्मणणें मी अखेरपर्यंत सोडलें नाहीं. यानंतर सरकारतर्फे आणखी एका आरमारी तज्ज्ञाची साक्ष झाली. त्यानें आपल्या उलट तपासणींत असें स्पष्ट कबूल केलें कीं, ' आरोपीला तोफखान्याचें जें सामान्य ज्ञान आहे, त्यावरून आमच्या नव्या चौदा इंची तोफेच्या रचनेचे बरोबर अनुमान करणें त्याला शक्य आहे ! "

अॅडमिरलसाहेबांच्या हाताखालील कांहीं अम्मलदारांची कित्येक नाटकी स्त्रियांशीं दोस्ती होती. या स्त्रियांच्या मार्फत जी माहिती मला मिळाली, तीच माहिती कोर्टांत माझ्या उपयोगी पडली, ही गोष्ट मी आतां अॅडमिरलसाहेबांस सांगितली, तर निःसंशय त्यांस मोठा आनंद होईल !

यानंतर माझ्या सामानांत सांपडलेली एक चिठ्ठी पुराव्यांत दाखल करण्यांत आली. तींत पुढील मजकूर होता.

" वुइलियम बर्डमोअर आणि कंपनी, पार्क हेड, ग्लासगो. बी. पहिली मागणी. एक नवी १३. ५ तोफ. एक आरमारी. लांबी ५१ फूट वजन ७३ टन. बारा इंचीपेक्षां लांबी १ फूट अधिक; पण वजनांत बारा टन अधीक. गोळ्याचे वजन १२५० पौंड. बारा इंची गोळ्यापेक्षां ४०० पौंड अधिक. "

पहिल्या दिवशीं कोर्टांतील काम आटोपल्यानंतर नव्या तोफांची माहिती मिळविण्याच्या आरोपांतून मी मोकळा होईन अशी प्रत्येकाची खात्री झाली होती. ही माहिती मीं मिळविली होती ही गोष्ट मी आतां कबूल करतों.

कोर्टाला मधली सुट्टी झाली, तेव्हां कोर्टाचा चोपदार खुद्द जज्जसाहेबांकडून मला फराळाचें सामान घेऊन आला व जज्जसाहेबांनीं आपला सलामहि कळविण्यास सांगितलें आहे, असें तो म्हणाला. तेव्हां मला

फार आश्चर्य वाटून आनंदहि झाला. मी आरोपी नसून कोर्टाच्या पाहुण्याप्रमाणेंच मला वागविलें जात आहे, असें मला वाटलें.

दुसऱ्या दिवशीं बरोज आणि वेल्कम कंपनीचें पत्र पुराव्यांत दाखल झालें. पोस्टाच्या कामगारानें जें पत्र मला देण्याचें नाकारलें आणि त्याला मालक नसल्यामुळें जें सदरहू कंपनीकडे परत पाठविण्यांत आलें, तेंच हें पत्र. सरकारी वकिलांनीं मोठी गंभीर मुद्रा धारण करून तें पत्र कोर्टाला मोठ्यानें वाचून दाखविलें. त्यांतील मजकूर असा होता. " प्रिय महाशय ! तुह्मीं हातीं घेतलेल्या कामांत तुह्मी आपल्या मध्यस्तीचें काम यशस्वीपणें पार पाडलें, याबद्दल आह्मांस मोठा संतोष झाला आहे. मालाचा नमुना तावडतोब पाठविण्याची कृपा करावी. तुमच्या दुसऱ्या कामगिरीसंबंधीं इतकेंच कळवावयाचें कीं, आह्मांला तिचा कितपत उपयोग होईल, हें सांगतां येत नाहीं. कसेंहि असलें तथापि आमची पेढी या कामाबद्दल आपणास शंभरांहून अधिक देण्यास खूष नाहीं. " पत्राच्या खालीं सही नव्हती.

पत्र वाचीत असतां प्रत्येकीं दहा पौंडांची याप्रमाणें पांच नोटा सर अँडरसन यांनीं आपल्या हातांत धरल्या होत्या. पत्र वाचून झाल्यानंतर आरोपास पुष्टि देण्याकरतां त्यांनीं जोरदार भाषण केलें. त्याचा मतलब असा. " ज्युरींतील सभ्य गृहस्थहो, केवळ वरवर पाहणारास या पत्रांत कांहीं संशयास्पद मजकूर दिसणार नाहीं; पण ज्याकोबाईट बंडाच्या वेळीं सरकाराबद्दल उल्लेख करतांना पेढी किंवा कंपनी असा शब्द वापरण्यांत येत असे हें आपणांस स्मरत असेलच. हें पत्र प्रामाणिकपणें केवळ व्यापारधंद्याचेंच होतें, तर तें भलत्याच कंपनीच्या पाकिटांत कां आलें ? खुद्द त्या कंपनीला याबद्दल कांहींच माहिती नाहीं. त्याजवर सही कां नाहीं ? त्यांत रोकड कां होती ? शंभर पौंड देण्यास ती पेढी खुष आहे; पण ही रकम कशाबद्दल द्यावयाची ? सद्गृहस्थहो, या साऱ्या गोष्टींचीं कारणें अगदीं उघड आहेत. "

त्या पत्रानें ज्युरी, कोर्ट आणि वर्तमानपत्रें यांनाच नव्हे, तर साऱ्या इंग्लंडला घोंटाळ्यांत पाडलें होतें. आतां या घोंटाळ्याचा मी उलगडा करतों.

हें पत्र जर्मन सरकाराकडून आलें होतें. त्या पत्रांत नमुना या शब्दानीं ज्या वस्तूचा उल्लेख केला आहे, ती वस्तु म्हणजे नव्या चौदा इंची तोफेंत वापरण्याकरतां तयार केलेलें एक नवें स्फोटक द्रव्य. यांपैकीं थोडेंसें मीं मिळविलें होतें. याचा नमुना माझ्या सामानासुमानांत सांपडला नाहीं, अथवा आरोप शाबीत करण्यासारखी दुसरी कोणतीहि वस्तु मजपाशीं सांपडली नाहीं, ह्याचें कारण हेंच कीं अशा प्रकारें गुप्त काम करणाऱ्या आह्मां लोकांना अगोदर सावध रहाणें नेहमींच इष्ट असतें. अशा प्रकारच्या वस्तु सुरक्षित ठिकाणीं ठेवून त्या जागेची किल्ली एखाद्या विश्वासू मनुष्याजवळ ठेवून त्याला मुखत्यारपत्र दिलेलें असतें.

पत्रांत या नमुन्याचा उल्लेख आहे. तो नमुना म्हणजे हें नवें स्फोटक द्रव्य. तसेंच दुसऱ्याहि एका कामगिरीचा त्यांत उल्लेख आहे. ही दुसरी कामगिरी अत्यंत महत्वाची असून ब्रिटनच्या सुरक्षितपणाशीं तिचा अत्यंत निकट संबंध होता. पत्रांतील दुसरा कोणताहि मजकूर या मुद्याइतका महत्त्वाचा नव्हता.

क्रोमार्टी येथील ठाण्यांत दुसरे कांहीं हेर कामगिरीवर होते. त्यांचीं नांवें मला माहीत नव्हतीं. आपल्या कामगिरीचा रिपोर्ट ते मजकडे पाठवीत त्या वेळीं त्यावर ते आपल्या गुप्त खात्यांतला नंबर मात्र घालीत. त्यांच्याद्वारें मिळालेली माहिती जर्मनींत कळवून पुढें काय करावयाचें, हें मी ठरवीत असें. आतां ही दुसरी कामगिरी कोणती तें सांगतों, ब्रिटनच्या एका आरमारी अम्मलदाराला शंभर पौंड दरमहा द्यावयाचे व त्याच्या मोबदल्यांत युद्ध सुरू झाल्याबरोबर त्यानें एका बंदराच्या संरक्षित जागीं एक असें भयंकर विश्वासघाताचें व देशद्रोहाचें कृत्य करावयाचें कीं, त्याचा उच्चारहि माझ्यानें करवत नाहीं. दुसरी कामगिरी ती ही.

ज्यूरींतील गृहस्थांबद्दल माझी जी कल्पना होती, ती बरोबर ठरली. त्यांच्यावर या पत्राचा परिणाम कांहींच झाला नाहीं. त्यांतलि मजकूर इतका अस्पष्ट स्वरूपाचा होता, कीं, सरकारी वकिलाच्या जंगी शब्दपांडित्यानेंहि त्या मजबूत डोक्यांच्या पांच गृहस्थांवर त्याचा कांहींच परिणाम

झाला नाहीं. या खटल्याच्या अनकूल निकालाबद्दल माझ्या मनांत पूर्ण उमेद होती; पण इतक्यांत एक चपरासी सर अँडरसनजवळ आला आणि त्यानें एक पाकीट त्यांच्या हातांत दिलें. तें पाकीट मी ओळखलें आणि ताबडतोब मी अगदीं गारठून गेलों. वकिलानें तें वाचून पाहिलें आणि त्याच्या चेहऱ्यावर मंद स्मिताची लकेर दिसूं लागली. अखेरीस मी जाळ्यांत बांधला जाणार अशी माझी खात्री झाली.

कोर्टाकडे वळून वकिलानें पातळ कागदाचे दोन तुकडे जज्जसाहेबांपुढें केले आणि तो म्हणाला, " ग्रेटब्रिटनच्या हितसंबंधाविरुद्ध अत्यंत भयंकर असा सांकेतिक भाषेंत लिहिलेला पुरावा मला कोर्टाला दाखवावयाचा आहे. "

हा मजकूर खरोखरच भयंकर होता. या दोन कागदांत ब्रिटनच्या आरमारांतील प्रत्येक गलबत, प्रत्येक आरमारी ठाणें, प्रत्येक किल्ला आणि प्रत्येक माऱ्याची जागा यांची नोंद केली होती. त्यांत एकंदर दहा हजारांवर नांवें नोंदलीं होतीं आणि प्रत्येक नांवासमोर एक खुणेचा आंकडा होता. उदाहरणार्थ, क्विनमेरी या बेडर जहाजाला ८१३ हा नंबर देण्यांत आला होता. "

भवितव्यतेच्या गोष्टी कांहीं साधनांनीं अगोदरच समजतात, असा माझा विश्वास आसल्याचें, मीं यापूर्वींच कबूल केलें आहे आणि माझा असा विश्वास बसावयाला कारणेंहि झालीं. प्रथम या जाळ्यांत मला गुंतविण्यास बरोज आणि वेलकमचें पत्रच कारणीभूत झालें आणि आतां त्या जाळ्याची गांठ पक्की बसण्यास हीच कंपनी पुन्हां कारण झाली. डॉक्टर लोकांच्या उपयोगाकरतां ही कंपनी कांहीं पुस्तकें तयार करीत असते. याच पुस्तकांत सदरील संकेतचिन्हें मीं लिहिलीं होतीं.

सूक्ष्मदर्शक कांचेच्या सहाय्यानें हे सांकेतिक शब्द मीं अगदीं बारीक अक्षरांनीं लिहिले होते. कारण नांवें पुष्कळच असल्यामुळें तीं नुसतीं पाठ करून ध्यानांत ठेवणें अशक्य होतें. समोरासमोरच्या दोन पानांवर हीं नांवें लिहिलीं असून नंतर त्या पानांच्या कडा चिकटवून टाकल्या होत्या. ज्या वेळीं ब्रिटिश आरमारी जहाजांच्या हालचाली सुरू असल्याचें

मला समजे, त्या वेळीं मी एखाद्या उंच जागीं जाऊन त्या साऱ्या हाल-चाली पहात असें. नंतर गलबतांचीं आकाशचित्रें ध्यानांत ठेवून या पुस्तकाच्या सहाय्यानें मीं बर्लिनला बातम्या देत असें. उदाहरणार्थ—

२१४, ६९, ७००, ९१०, २१ इत्यादि. मध्यंतरी जरूर लागणारे शब्द ए. बी. सी. कोडाच्या सहाय्यानें मी भरून काढीत असें.

अशा रीतीनें बर्लिन येथील जर्मन आरमाराच्या बातमीखात्याला रोझिथ येथील आरमारी जाहाजांच्या हालचालींच्या बातम्या मी देत असें. वर सांगितलेल्या कोडांत सांकेतिक शब्द कसे वापरलेले असतात याचा नमुना येथें देतों. 'बातमी पसरली' 'आंत येत आहे" बाहेर जात आहे' 'युद्धाची तयारी करीत आहे' 'बचावाचीं जाळीं टाकलीं.' तटबंदीवर शिबंदी ठेवली.' 'संरक्षणाच्या हालचाली समुद्रावर सुरू आहेत.'' कोळसा आगगाडीनें येत आहे.'' राखून ठेवलेलें सैन्य बऱ्याच मोठ्या प्रमाणावर येत आहे.'' बंदराबाहेर सुरुंग पेरण्याचें काम सुरू आहे.' 'सर्व स्तब्ध आहे.' 'विशेष सांगण्यासारखें कांहीं नाहीं.' 'व्यापारी जहाजें दिसूं लागली आहेत.' इत्यादि.

हें संकेत चिन्हांचें पुस्तक सरकारच्या हातीं लागल्यानंतर पुढें अधिक चर्चेचें कारणच उरलें नाहीं. मीं आपल्यातर्फे दोन तीनपेक्षां अधिक साक्षिदार बोलाविले नाहींत आणि यांना तरी मी फक्त एकच प्रश्न विचारला,

"इंग्लंडासंबंधीं माझ्या मनाचा कल कसा असावा असें तुह्मांस वाटतें ?"

त्या सर्वांनीं हें स्पष्टपणें कबूल केलें कीं, मीं जरी एखाद्या परकीय राष्ट्राच्या वतीनें हेराचें काम करीत असलों, तरी व्यक्ति या नात्यानें इंग्लंडाविरुद्ध वैरभाव मीं केव्हांहि प्रगट केला नाहीं.

अशा साक्षींचा उपयोग माझी शिक्षा कमी करण्याकडे होईल, इतकीच मला आशा होती. ज्युरी आपलें मत ठरविण्यासाठीं बाजूला गेली आणि अर्ध्याच तासानें परत येऊन ब्रिटिशसाम्राज्याच्या सुरक्षितपणास धोका आणण्याचा अपराध मजवर शाबीत झाला असल्याचें तिनें सांगितलें.

हेरांच्या नव्या कायद्याप्रमाणें या गुन्ह्याला सात वर्षें काळ्या पाण्याची शिक्षा सांगितलेली आहे, हें वाचकांना ठाऊक आहेच.

मुख्य न्यायाधीश ज्यूरीला खटला समजावून सांगत असतां दिसण्यांत उच्च दर्जाचे काळा पोषाक केलेले एक इंग्रज गृहस्थ कोर्टांत आले. यापूर्वीं हे गृहस्थ कोर्टांत केव्हांच आढळले नव्हते. चपराशानें मोठ्या आदबीनें या गृहस्थांना जज्जसाहेबांपाशीं नेलें. दोन मिनिटेंपर्यंत हे गृहस्थ जज्जसाहेबांच्या कानाशीं कुजबुजत होते व जज्जसाहेब मधून मधून आपलें डोकें हालवीत होते. मला चांगली जबर शिक्षा मिळणार, असें या प्रकारावरून मला वाटलें. पण जज्जसाहेबांनीं निकाल दिला तो असाः—

" सर्व गोष्टी लक्षांत घेतां या गुन्हेगारास अठरा महिन्यांची सजा कोर्ट फर्मावित आहे. "

मीं हंसून आपल्याशींच म्हटले ' चला निघा आर्मगार्ड कार्ल ग्रेव्हज. "

शिक्षेबद्दल सर्व प्रेक्षकांस फार आश्चर्य वाटत असल्याचें उघड दिसून आलें. माझ्या आजुबाजूला आश्चर्याचे उद्गार सर्वत्र ऐकूं येत होते. विशेषतः परक्या देशांतल्या बातमीदारांना तर फारच नवल वाटलें. मला सात वर्षें काळ्यापाण्यावर जावें लागणार अशी प्रत्येकाची खात्री असतां अठरा महिन्यांच्या साध्या सजेवर मी निभावलों, ही गोष्ट खरोखरच कल्पनातीत होती. असें कसें झालें ?

एडिंबरो येथील कॉऊन्टहिलच्या तुरुंगांत मला प्रथम नेण्यांत आलें. यानंतर दोन आठवड्यांनीं ग्लासगोजवळील बारलेनी तुरुंगांत आमची बदली झाली. एकंदर परिस्थितीचा विचार करतां मला तुरुंगांत इतक्या चांगल्या रीतीनें वागविण्यांत आलें कीं, या गोष्टीचें मला खरोखरच आश्चर्य वाटलें. माझ्या खटल्याच्या वेळीं जी मेहरनजर मजवर दाखविण्यांत आली होती, तीच तुरुंगांतहि मजबरोबर आली होती. इकडे तिकडे प्रश्न विचारून माझ्यापासून कांहीं अधिक माहिती काढण्याचा यत्न बारलेनी तुरुंगाचे अधिकारी करीत होते, असें मला तावडतोब दिसून आलें; पण या त्यांच्या प्रयत्नास यश आलें नाहीं; तथापि कांहीं सूचक वाक्यें बोलण्याचें त्यांनीं कमी केलें नाहीं.

" तुह्मी येथें फुकटचे कां अडकून पडलां ? " " तुह्मी बाहेर कां पडत नाहीं ? " " तुमच्या योग्यतेला अनुरूप असें कांहीं तरी—"

खालच्या वार्डरापासून तों थेट वरिष्ठ अधिकाऱ्यापर्यंत अशा प्रकारचीं वाक्यें माझ्या कानीं पडत; तथापि मीं आपल्या तोंडाचें कुलूप केव्हांच काढलें नाहीं.

कॉमन्स सभेंत मजसंबंधीं एका सभासदानें कांहीं माहिती विचारली असतां, सरकारकडून त्याला ती देण्यांत आली नाहीं, हें मीं आरंभीच सांगितलें आहे. ती माहिती आतां मी सांगतों.

मला तुरुंगांत नेल्यानंतर पांच आठवड्यांनीं तुरुंगाच्या गव्हरनरच्या ऑफिसांत मला नेलें. त्या वेळीं शिपायी बाण्याचा, आणि सडपातळ असा एक इंग्रज गृहस्थ तेथें बसला होता. हा रिसाल्यांत कोणी कामगार असावा, असें मीं तेव्हांच ओळखलें. लष्करी कामगार वारंवार पाहण्याची ज्याला संवय आहे, त्याला ते कोठेंहि ओळखूं येतात. ऑफिसांत गेल्याबरोबर गव्हरनर मला म्हणाले, " ग्रेव्हज, हे एक गृहस्थ तुला भेटण्यासाठीं आले आहेत. "

तो गृहस्थ गव्हरनरास म्हणाला, " मला जरा बराच वेळ लागेल. तुह्मी आपलें काम करा. ". गव्हरनरसाहेब आह्मां दोघांस ऑफिसांत सोडून बाहेर गेले. तो परका गृहस्थ उठून मजजवळ आला आणि म्हणाला, " डॉक्टर, माझें नांव रॉबिनसन. या, असे खुर्चीवर बसा. "

मी कैदी असल्यामुळें मी उभाच राहिलों होतों, हें सांगावयास नकोच. रॉबिनसननें मला प्रथम कुशल प्रश्न विचारण्यास सुरवात केली.

" आधिकारी तुह्मांला येथें कसे वागवितात ? "

" मला कोणतीहि तक्रार करण्यास जागा नाहीं. "

" ही कैद तुह्मांस कंटाळवाणी झाली असेल ? "

" हो. हें स्वाभाविक आहे. मी पुरा दैववादी आहें. किस्मत ! क्यापटन्साहेब ! या साऱ्या नशिबाच्या गोष्टी. "

" ओहो ! तुह्मी क्यापटन म्हणतां ? हें तुह्मांला कसें समजलें ? आपली तर पूर्वी केव्हांहि भेट झाली नव्हती. "

" भेट झाली नव्हती हें खरें; पण लष्करी कामगार माझ्या पाहण्यांत इतके आले आहेत, कीं ब्रिटिश रिसाल्यांतील कामगार ओळखणें मला अशक्य नाहीं. आपण पूर्वीं हुज्जार रिसाल्यांत कामगार होतां वाटतें ? "

" क्यापटन्साहेब कांहीं वेळ हंसतच राहिले. मुद्यावर गोष्ट कशी आणावी, यासाठीं ते मला प्रथम चाचपून पहात होते, असें दिसलें. नंतर मजकडे वळून ते एकदम म्हणाले,

" दोस्त, तूं जर्मनीच्या तर्फे आह्मांविरुद्ध काम करीत होतास हें आह्मांला समजलें आहे. तसेंच जातीनें तूं जर्मन नाहींस, हेंहि आह्मांला ठाऊक आहे. मग तूं आमच्या तैनातींत कां राहूं नये ? तसें करण्याला तुझीं कांहीं खाजगी कारणें आहेत का ? "

" क्यापटनसाहेब, केवळ पैशाच्या लोभानें अथवा केवळ कैदेंतून सुटण्यासाठीं आमच्या या धंद्यांतला कोणीहि मनुष्य आपल्या पहिल्या धन्याशीं निमकहरामी करणार नाहीं, हें तुह्मांला तरी ठाऊक असलें पाहिजे. आम्ही बोलून चालून उघड्या डोळ्यानेंच या धंद्यांत पडत असतों. डाव फसला, तर त्याचा परिणाम काय होणार, हेंहि आह्मांला चांगलें ठाऊक असतें. कांहीं कमी जास्ती झालें, तर त्याबद्दल आम्ही कधींहि ओरड करीत नाहीं. "

क्यापटनसाहेब कांहीं वेळ मजकडे रोखून पहात होते. थोड्या वेळानें ते म्हणाले, " तुमच्या संबंधानें जी कांहीं माहिती आह्मांला मिळाली, ती बरोबर होती असें दिसतें. इंग्लंडांत पाय ठेवल्यापासून तुह्मी आपली कामगिरी करीत असतां आणि तसेंच खटल्याचे वेळीं व अखेरीस तुरुंगांत जी मनाची शांत वृत्ति तुम्हीं दाखविली, ती पाहून आह्मांस खरोखरच फार आश्चर्य वाटतें. तसेंच या कामगिरींत तुमच्या सारख्या निष्णात मनुष्यानें जो थोडासा निष्काळजीपणा दाखविला, त्याचेंहि आह्मांस नवल वाटतें. एकंदरींत या कामगिरीसंबंधीं तुम्हांस फारसा उत्साह नव्हता, असें आह्मांस दिसून आलें. तुह्मीं जें कांहीं केलें, त्याहून बरीच अधिक कामगिरी तुम्हांस करतां आली असती. * * * तुह्मांला अगदींच अल्प शिक्षा मिळाली याचें तुह्मांला नवल वाटूं नये का ? "

थोडासा हंसरा चेहरा करून मीं म्हटलें, " क्यापटनसाहेब, मला कोण-याच गोष्टीचें आश्चर्य वाटत नाहीं. "

माझें उत्तर ऐकून क्यापटनसाहेब अधिकाधिक उत्सुक होत आहेत असें दिसलें. ते म्हणाले, " समजा, कीं या जाळयांत तुम्हांस तुमच्या सरकारानेंच गुंतविलें, असें आम्हीं सिद्ध केलें, तर पुढें कसें काय ? "

क्यापटनसाहेबांच्या या प्रश्नाचाहि मजवर फारसा परिणाम झाला नाहीं. असें केव्हां तरी घडून येणार, हें मला प्रथमपासूनच ठाऊक होतें. याकरतां इंग्लंडमध्यें जितकी कामगिरी करणें शक्य होतें, तितकी ती न करतां प्रथमपासूनच मी निष्काळजी राहिलों.

" तुह्मी म्हणतां असें असेल, तर तुमच्याशीं ठराव करण्यास मी नाकबूल नाहीं; पण जोंपर्यंत माझ्या समोर लोखंडी गज दिसत आहेत, तोंपर्यंत मी डोळे असून आंधळा आणि कान असून बहिरा झालों आहें. "

क्यापटनसाहेब हांसून म्हणाले, " ठीक आहे डॉक्टर. मी तुमची भेट पुन्हा लवकरच घेईन. "

" तसें तुह्मी कराल, यांत मला मुळींच शंका नाहीं; पण माझ्यासमोर मला जोंपर्यंत लोखंडी गज दिसत आहेत, तोपर्यंत माझ्या भेटींत जाणारा वेळ म्हणजे काळाचा अपव्यय होय, एवढें मात्र कृपा करून ध्यानांत ठेवा. "

" तें सारें माझ्यावर सोंपवा. " असें ह्मणून क्यापटनसाहेब माझ्याशीं शेकह्यांड करून निघून गेले.

पुनः माझ्या कोठडींत मला नेण्यांत आलें. यानंतर दोन तीन रात्रीं मला चांगलीशी झोंप आली नाहीं, हें मी प्रांजलपणें कबूल करतों. माझ्या खटल्याच्या वेळीं आणि त्यानंतर तुरुगांत जो शांतपणा मीं दाखविला, तो खरोखर नाटकी होता. क्यापटन रॉबिनसनच्या भेटीसारख्या प्रसंगीं मी शांतवृत्ति धारण करीत असें; पण तसें करण्यास मला अत्यंत प्रयास पडत आणि त्यामुळें माझी मानसिक शक्तीहि अत्यंत क्षीण झाली. यानंतरहि थोडे दिवस मी अगदीं बावरल्यासारखा झालों होतों. माझी झोंप साफ उडून गेली होती. रात्रीच्या वेळीं मी आपल्या खोलींत किती तरी वेळ नुसत्या येरझारा घालीत असें.

तथापि माझ्या कल्पनेप्रमाणें पुढच्याच आठवड्यांत क्यापटन रॉबिनसन पुनः माझ्या भेटीस आले. ते आले त्यावेळीं रात्र बरीच उलटून गेली होती. सर्व कैदी आपल्या कोठड्यांत स्वस्थ पडले होते. तुरंगाच्या दुय्यम गव्हरनरानें स्वतः मला बोलावून ऑफिसांत नेलें. दुसरा कोणीहि वार्डर किंवा तुरुंगाचा दुसरा कोणताहि अधिकारी आमच्या नजरेस पडला नाहीं.

गव्हरनराच्या ऑफिसांत रॉबिनसन मला भेटलें. ते मला म्हणाले, " कसें काय डॉक्टर ? आतां तुमच्याशीं पक्का ठराव करण्याकरतां मी आलों आहे. तुमचा मला उपयोग होण्यासारखा आहे. तुमच्या शिक्षेंतले सोळा महिने आद्याप शिल्लक आहेत. हे महिने तुह्मी आमच्या नौकरींत घालविण्यास राजी आहां काय ? तसें असेल, तर पैशासंबंधीं मग ठराव करतां येईल. तुमचे पाय जाळ्यांत गुंतविण्यास खुद्द जर्मन सरकारनेंच प्रयत्न केला, असें सिद्ध करण्याजोगा पुरावा मजजवळ तयार आहे. "

त्यांनीं जो पुरावा मजपुढें ठेवला, त्यांवरून त्यांचें म्हणणें खरें आहे, असें मला निःसशय दिसून आलें. जर्मनीच्या इतक्या भानगडी मला समजल्या होत्या कीं, मी जगांत मोकळें रहाणें त्यांना अनिष्ट वाटलें. सात वर्षेपर्यंत बिनबोभाट मीं तुरुंगात कुजत पडावें, अशी युक्ति त्यांनीं योजिली. तेवढ्या अवधींत स्यानस अरण्यांतलें खलबत पक्क दशेस येईल, अशी त्यांची कल्पना होती.

क्यापटनसाहेब म्हणाले, " आतां पुढें काय करावयाचें, याबद्दल तुह्मी कांहीं सूचना करतां कां ? "

" माझा उपयोग तुह्मांला थोडासाहि जरी करून घेणें असेल, तर माझ्या सुटकेची बातमी तिसऱ्या कानास कळतां उपयोगी नाहीं, हें मी तुह्मास सुचवून ठेवतों. हें साध्य कसें करावयाचें हें तुमचें तुह्मी पहा. माझी प्रकृति बरोबर नाहीं, अशी बातमी मी ऐडिंबरो येथें पसरविली होती. तशीच तुरुंगांतहि आहे, असा लोकांचा अद्यापहि समज असेल. या आधारावर माझी बदली दुसऱ्या तुरुंगांत झाल्याचा बहाणा तुह्मी करूं शकाल. मग पाहिजे तेथें तुह्मी मला न्या. दुय्यम गव्हरनर, गव्हरनर

आणि तुह्मी स्वतः यांवांचून आणखी कोणालाहि खरा प्रकार समजण्याचें कारण नाहीं. ”

क्यापटन रॉबिनसन म्हणाले, “ बरोबर, बरोबर. माझा स्वतःचा बेत असाच आहे. ”

एवढें भाषण झाल्यानंतर रॉबिनसन निघून गेले आणि मी आपल्या कोठडींत परत आलों. दुसऱ्या दिवशीं पहांटे साडेपांच वाजतां तुरंगाच्या लेफटेनन्ट गव्हरनरानें मला उठविलें. ते एकटेच आले होते. वार्डर किंवा तुरुंगांतिल दुसरा कोणताहि अधिकारी जवळपास दिसत नव्हता. मी गव्हरनरच्या ऑफिसांत गेलों. त्या ठिकाणीं माझे कपडे आणि सारी चीज वस्त तयार करून ठेवली होती. मीं पोशाख केला आणि आह्मी दोघे तुरंगांतून बाहेर पडलों. नंतर एका भाड्याच्या मोटार गाडींत बसून ग्लासगोंतील क्यालिडोनियन स्टेशनावर आह्मी आलों. अद्यापि रात्र बरीच असल्यामुळें रस्त्यावर लोक हिंडूं फिरूं लागले नव्हते. यामुळें आह्मांला कोणी ओळखील अशी भितीहि नव्हती. पहांटेच्या गाडीनें आह्मी लंडनांस आलों. तेथें युस्टन स्टेशनांवर क्यापटन रॉबिनसन आह्मांला भेटले. आह्मी तिघे एका वेटिंगरूममध्यें गेलों. त्या ठिकाणीं मजबद्दलची पावती क्याटपन रॉबिनसन यांनीं लेफटेनंट गव्हरनर यांस दिली. पावती घेऊन लेफटेनन्ट गव्हरनर निघून गेले. थोड्या वेळानें माझ्या हातीं एक पाकीट देऊन रॉबिनसन हे निघून गेले. आतां मी एकटाच मागें राहिलों. माझ्या मनांत असतें, तर मला येथूनच पोबारा करतां आला असता. ब्रिटिश सरकारानें मजवर पूर्ण विश्वास टाकला होता, असें मला उघड दिसून आलें. स्टेशनापासून बाहेर पडून मी रसेल हॉटेलमध्यें गेलों व तेथें एक खोली ठरवून तेथल्या नोंदबुकांत मीं आपल्या नांवाची नोंद केली. खोलींत जाऊन रॉबिनसन यांनीं दिलेलें पाकीट मी उघडलें. यांत एक दहा पौंडाची नोट व एक चिठी होती. चिठींत पुढील मजकूर होता.

“ मेफेअर परगण्यांतील नंबर—च्या टेलिफोनवर सकाळीं साडे दहा वाजतां हांक मारणें. ”

चिठींत सांगितल्याप्रमाणें मीं त्या नंबरवर तार केली. क्यापटन रॉबिनसन यंत्राजवळ आले आणि त्यांनीं मला ट्राफलगार स्क्वेअरमधील मोर्ले हॉटेलमध्यें दुपारीं एक वाजतां भेटण्यास बोलावलें. मोर्ले हॉटेलमध्यें मि. मॉर्गन या नांवाचे आणखी एक गृहस्थ आह्मांस भेटले. हे गृहस्थ इंग्लिश हेर खात्यांत असावेत, असा मीं तेव्हांच तर्क केला आणि माझा तर्क बरोबर होता, असें मला पुढें कळलें. तुह्मी व क्यापटन रॉबिनसन दुपारीं डाऊनिंग स्ट्रीटमध्यें जा. " असें मार्गन यानें मला सांगितलें. या ठिकाणीं प्रधानमंडळापैकीं एक गृहस्थ माझी भेट घेणार आहेत, असेंहि ते म्हणाले.

क्यापटन रॉबिनसन व मी डाऊनिंगस्ट्रीटवर गेलों. तेथल्या नोंदबुकांत सही केल्यानंतर मला एका बाजूच्या खोलींत नेण्यांत आलें. क्यापटन रॉबिनसन बाहेरूनच निघून गेले. येथें मीं आपलें नांव ट्रेन्टन स्नेल असें दिलें होतें.

या खोलींत वीस मिनिटें वाट पाहिल्यानंतर एक चपराशी मजकडे आला व आह्मी दोघे एका जिन्यानें वर गेलों. तेथील एका खोलीचें दार उघडून व मला आंत सोडून चपराशी निघून गेला. मीं वर पाहिलें तों सर एडवर्ड ग्रे तेथें बसले असल्याचें मला आढळून आलें.

सर साहेब एका मोठ्या हिरवें अस्तर घातलेल्या महागनी टेबलाजवळ बसले होते. ही खोली एखाद्या खाजगी लायब्ररीसारखी दिसत होती. पुस्तकें, स्मरणवह्या, पत्रें इत्यादि वस्तुंचे गंजच्यागंज टेबलांवरच नव्हे, तर खुर्च्यांवरहि पडले होते. तेथेंच एक भव्य व चामड्यानें मढविलेली आरामखुर्चीहि डोळ्यांत एकदम भरत होती.

ही आरामखुर्ची एवढी मोठी होती कीं, तिजवर बसलेले सर साहेब लहान मुलाप्रमाणें दिसत होते. कांहीं कागद वाचण्यांत ते अगदीं गढून गेले होते, असें दिसलें. त्यांजसमोर मी सुमारें दहा मिनिटें उभा राहिलों होतों, तरी त्यांनीं मजकडे लक्ष दिलें नाहीं. तथापि समोरच्या कागदाच्या कडेवरून ते मजकडे मधून मधून पहात होते असें माझ्या लक्षांत आलें. हातांतील कागद बाजूला ठेवून त्यांनीं मला बसावयास सांगितलें, तरी मी

तसाच उभा राहिलों. ग्रे साहेबांनीं टेबलाचा खण उघडून एक कागदाचें पुडके बाहेर काढलें. त्यांत मजसबंधींचा रिपोर्ट असावा, असा मला संशय आला. पुढें घडून आलेल्या गोष्टींनीं हा माझा संशय खराहि ठरला. सर साहेब आणखी कांहीं वेळ या कागदाकडेच पहात राहिले. मी येथें होतों, याचें जणूं काय त्यांना भानच राहिलें नाहीं. या वेळाचा फायदा घेऊन मींहि सरसाहेबांचें थोडेंसें निरीक्षण केलें. हे गृहस्थ विलक्षण मितभाषी आणि अत्यंत थंड्या स्वभावाचे असावेत असा माझा समज झाला. इतकीं थंडीं माणसें इंग्लंडाशिवाय अन्यत्र कोठेंहि आढळून यावयाचीं नाहीत. पौर्वात्यांशीं सबंध शतकभर दाट परिचय झाल्यामुळें इंग्लंडांतहि पौर्वात्यस्वभावाचे कांहीं विशेष आढळून येतात. मनांत कांहीं असले तरी चेहरा अगदीं निर्विकार ठेवून मनांत काय चाललें आहे, याचा मागमूस कोणासहि लागूं द्यावयाचा नाहीं, ही पौर्वात्यांची कला इंग्रज मुत्सद्यांसहि चांगली साधली आहे. त्यांच्या ठिकाणीं असलेली अत्यंत निरीक्षक दृष्टि आणि एकाग्रतेचें सामर्थ्य यांचा मागमूस त्यांच्या चेहऱ्यावरून केव्हांहि लागावयाचा नाहीं.

थोड्या वेळानें सरसाहेब म्हणाले, " जर्मनीच्या आरमारी तयारीसंबंधीं तुह्मांला बरीच माहिती असावी, असा माझा तर्क आहे. "

" होय साहेब. मला सामान्य माहिती आहे. माझी माहिती एका विशिष्ट भागापुरतीच आहे. "

" कोणत्या भागापुरती ? "

" आरमाराच्या बातमी खात्याचीच फक्त मला माहिती आहे. "

" त्यांचें बातमी खातें फार विस्तृत प्रमाणावर व फारच लायक रीतीनें चालतें अशी लोकवार्ता आहे. ही गोष्ट खरी आहे काय ? "

" ही गोष्ट सर्वथा खरी आहे. हें खातें कसें चालतें, हें वर्णन करून सांगतां येणार नाहीं. "

माझें हें उत्तर ऐकून सर एडवर्ड कांहीं सूचक प्रश्न मला विचारूं लागले व मींहि त्यांना तशाच दर्जाचीं उत्तरें दिलीं. आमच्या संवादांत कांहीं

विशेष माहिती निर्माण होण्याचा रंग दिसेना. शेवटीं त्याच्या मनांत काय होते तें एकदम बाहेर पडलें.

" कांहीं आरमारी कामगार अथवा दुसरे अम्मलदार पैसे घेऊन पर-राष्ट्रीय बातमीदारांना माहिती पुरवितात. असें तुह्मांस वाटतें काय ? असे कांहीं अम्मलदार तुमच्या माहितींत आहेत काय ? "

' इंग्रज अम्मलदार ' किंवा ' इंग्रज कामदार ' असें सर एडवर्ड यानीं स्पष्ट म्हटले नव्हतें; तथापि त्यांच्या मनांत काय होतें, हें मीं ताडलें; पण मला असलेली सारी माहिती त्यांस न सांगण्याचा निश्चय मीं केला.

" असेहि कांहीं ऑफिसर आहेत. " माझ्या या उत्तरानें सर साहे-बांच्या चित्तांत अगदीं गडबड उडालेली त्यांच्या चेहऱ्यावर दिसली.

" हें तुह्मांला कसे ठाऊक झाले ? असें ठांसून सांगण्यास तुमच्या जवळ काय पुरावा आहे ? " हे प्रश्न विचारीत असतां सर साहेबांची वृत्ति अधिकच बावरल्यासारखी दिसूं लागली.

" मजपाशीं प्रत्यक्ष पुरावा नाहीं. ( असा पुरावा मजजवळ होता. ) तरी क्विन मेरी आणि ॲजाक्स यांसारख्या बेडर जहाजांचे प्लॅन जर्मनीच्या हातांत पडले, यावरून तुमच्या देशांतील वरिष्ठ कामगारांच्या मदतीखेरीज ही गोष्ट झाली नाहीं, हें उघड सिद्ध होतें. "

आणखीहि कांहीं तपशील मजकडून काढावा ह्मणून त्यांनीं यत्न करून पाहिला; पण मी अगदीं गप्प बसलों होतों. क्विन मेरी आणि ॲजाक्स यांच्या प्लॅनबद्दल सर साहेबांस मला मोठी मजेची गोष्ट सांगतां आली असती. ते आणखी कांहीं वेळ एक लठ्ठसा रिपोर्ट वाचीत बसले. थोड्या वेळानें पुनः एकवार कांहीं सूचक प्रश्नांचा भडिमार त्यांनीं माझ्यावर केला. त्यांचा एकंदर मुद्दा माझ्या अगोदरच ध्यानांत आला होता. त्यांच्या एकंदर भाषणाचा सामान्य मथितार्थ मी येथें देतों.

उच्चदर्जाच्या कामगारांच्या संमेलनाच्या वेळीं तुह्मी केव्हां हजर होतां का ? उदाहरणार्थ-ट्यानस अरण्यांतल्या भेटीच्या वेळीं तुह्मी होतां काय ? तुह्मी हजर होता याबद्दल कांहीं लेखी पुरावा आहे काय ?

या प्रश्नांनीं मी मुळींच भांबावून गेलों नाहीं. हे प्रश्न येणार हें मला अगोदरच ठाऊक होतें. त्यानस अरण्याच्या भेटीच्या वेळीं मी हजर होतों, ही गोष्ट छपविणें निरर्थक आहे, असें त्यांच्या प्रश्न विचारण्याच्या पद्धतीवरूनच मला कळून चुकलें. त्या भेटीस आलेल्या एका इंग्रज मुत्सद्यानें बोअर युद्धाच्या वेळची माझी ओळख काढली होती, हें वाचकांना अठवत असेलच. ही गोष्ट सर साहेबांस त्यानें सांगितली असण्याचा संभव होता. वास्तविक तेथें मी हजर असल्याचा कांहीं लेखी पुरावा मजजवळ नव्हता व तसें मीं सर साहेबांस सांगितले, तथापि त्यांच्या प्रश्नाचें एकंदर धोरण मला बरेंसे वाटले नाहीं. सरसाहेब दोहोंपैकीं एक गोष्ट करीत असावे, असा मला संशय आला. एक तर या भेटीच्या वेळीं घडलेल्या साऱ्या गोष्टी त्यांस कळल्या नसाव्या किंवा त्या भेटींत नक्की काय निष्पन्न झालें, हें मजपासून काढण्याचा त्याचा बेत असावा. एकंदरींत अधिक न बोलतां बेताबाताने वागण्याचा हा प्रसंग होता.

यानंतर फ्रेंचांचे सैन्य आणि आरमार याबद्दल कांहीं खोंचदार प्रश्न त्यांनीं मला विचारले. ब्रिटिश आणि फ्रेंच यांची परस्पर तुलना मीं स्वानुभवानें करावी असा त्यांचा उद्देश दिसला. एकंदरीनें जर्मनी आणि ब्रिटन याजमध्ये चाललेली स्नेहसंबंधाचीं बोलणीं शेवटी कितपत फलद्रूप होतील, याजबद्दल सरसाहेबांच्या मनांत शंका असावी असें दिसलें.

यानंतर खुद्द जर्मन बादशहासाठीं केलेल्या कामगिऱ्यांची माहिती मीं सांगावी अशा धोरणानें आणखी कांहीं प्रश्न त्यांनीं विचारले; पण मीं त्यांस उत्तरें दिली नाहींत.

पुढें थोड्या दिवसानीं क्यापटन रॉबिनसन यांजकडून पुढील योजनेचा नक्की बेत मला कळला. ब्रिटिश हेरखात्यातर्फे माझी पहिली कामगिरी मला मिळाली. नंतर दुसऱ्या एका कामगिरीनिमित्त मी न्यूयार्क येथे आलों व तेथें या धंद्यास अखेरचा रामराम ठोकला.

**संपूर्ण.**

भारत-गौरव-ग्रंथमाला-पुष्प आठरावें.

# केसरची प्रभावळ!



न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते।

भगवान् श्रीकृष्ण.

प्रकाशक—प्र. श्री. भसे, गिरगांव–मुंबई.

मुद्रक—केशव रावजी गोंधळेकर,
'जगद्धितेच्छु प्रेस,' ४३२ शनवार पेठ, पुणें.

द्वितीयावृत्ति.

१९१७.



किंमत बारा आणे.

# केसरची प्रभावळ!

## जर्मन आरमाराचे जनक
## फॉ टिरपिट्झ.

जर्मन आरमाराच्या प्रचंड उत्क्रांतीचा इतिहास ज्या वेळीं लिहिला जाईल त्या वेळी त्यांत एका नांवाचा अत्यंत प्रमुखत्वानें उल्लेख होईल. तें नांव ह्मणजे ग्रँड ॲडमिरल फॉ टिरपिट्झ हें होय. आरमारी राष्ट्रांत जर्मनीनें जे बरेंच प्रमुखत्वाचें पद आज प्राप्त करून घेतलें आहे, ते संपादन करण्यास याच नरश्रेष्ठांचा उद्योग बहुतेकांशीं कारण झाला आहे. किंबहुना केसरच्या आरमाराचे जनकत्वच यांजकडे आहे, असें ह्मणण्यास काहीं हरकत नाहीं.

बर्लिन येथील लोक त्यांस "अनंत काळचे टिरपिट्झ" या नांवानें संबोधित असतात. गेलीं पंधरा सोळा वर्षें जर्मन आरमाराचीं सर्व सूत्रे एकसारखीं त्यांच्या हातीं आहेत. राजकारणांत नित्य घडून येणाऱ्या अस्मानीसुलतानींतून इतकीं वर्षें आपल्या जाग्यावर एकसारखे टिकलेले गृहस्थ फारच थोडे. आजपर्यंत यांच्या जोडीला फक्त बिस्मार्क यांनाच तेवढें बसवितां येईल. इतक्या अवधींत कित्येक चान्सेलर, कित्येक युद्ध-खात्याचे प्रधान आणि कित्येक तिजोरी कामदार आले व गेले; पण आरमारी कायद्यांची घटना करणारे हे गृहस्थ आपल्या जागीं अद्याप कायमच राहिले. समुद्रावर वर्चस्व स्थापण्याकरतां जर्मनीनें किती पक्का निश्चय केला आहे व या दृष्टीनें आजपर्यंत तो कसा पाळला आहे, हें यावरून स्पष्ट दिसून येतें. "केसर व्युइलियम आणि आरमार" या नांवाचें एक निमसरकारी पुस्तक नुकतेंच प्रसिद्ध झालें आहे व त्यांत जर्मन आरमाराच्या जनकत्वाचा मान बादशहाकडे दिला आहे; पण खऱ्या दृष्टीनें विचार करतां १८९८ सालापासून जर्मन आरमाराच्या सेक्रेटरीच्या जागीं असलेले ग्रँड ॲडमिरल आलफ्रेड फॉ टिरपिट्झ यांसच हा मान

देणें योग्य होईल. असें करण्यांत जर्मनीच्या शहानशहाचा कांहीं उपमर्द होईल हें खरें; पण सत्य तें सत्यच.

आलफ्रेड टिरपिट्झ हे एका सामान्य घराण्यांत जन्मास आले. त्यांना पुढें आणण्यांत कोणीहि मोठ्या मनुष्याचा पाठिंबा नव्हता. ते अत्यंत खालच्या दर्जाच्या अधिकारापासून तों थेट मुख्य पदापर्यंत केवळ स्वतःच्या हिमतीनें वाढले. यांचा उत्साह व सामर्थ्य हीं फार दांडगीं आहेत. तसेंच इच्छाशक्ति, महत्त्वाकांक्षा आणि कामाची तडफ, हे गुणहि त्यांच्या ठिकाणीं अपूर्व आहेत. पहिल्या प्रतीची मुत्सद्देगिरी, कामाचा उरक आणि आरमारी कौशल्य यां गुणत्रयींचा संयोग यांच्या ठिकाणीं जसा आढळतो, तसा तो जगांतील इतर आरमारी खात्यांत आढळत नाहीं.

त्यांच्या जागीं उत्तम प्रतीची मुत्सद्देगिरी असल्यामुळें मुख्य मंत्र्याच्या जागेसाठीं त्यांचें नांव आजपर्यंत अनेकवार सुचविण्यांत आलें आहे. या जागांसाठीं जशा योग्यतेचीं माणसें लागतात, तशा योग्यतेचीं माणसें जर्मनींत फार पैदा होत नाहींत. अशा थोड्या लोकांच्या कोटींतच यांची गणना होते. आरमारी खात्याचें त्यांचें काम आतां बहुतांशीं पूर्णावस्थेस आलें आहे, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. त्यांनीं जर्मनीला नवें आरमार उत्पन्न करून दिलें आहे. एवढेंच नव्हे, तर सतत पंधरा वर्षांच्या दीर्घ प्रयत्नानें या खात्याचें काम त्यांनीं इतक्या पूर्णावस्थेस नेलें आहे, कीं, त्यांच्या अभावीं त्या खात्याला योग्य माणसाची वाण पडणार नाहीं.

फॉं टिरपिट्झ मुख्य प्रधानाच्या जागीं आले, तर त्या देशाच्या राजनीतीचें एकच धोरण राहील. तें धोरण ह्मणजे आरमारी बाबतींत कांहीं झालें तरी, आरमाराच्या वाढीला ते आपल्या अमदानींत खळ पडूं देणार नाहींत. नव्या आरमाराची पहिली कल्पना त्यांच्याच डोक्यांत जन्मास आली. आरंभीं ह्मणजे १८९८ सालीं जर्मनीचा आरमारी खर्च अवघा साठ लक्ष पौंड होता. १९१३ सालीं दोन कोट तीस लक्ष पौंड झाला. ही सारी वाढ टिरपिट्झ यांच्याच मेहनतीचें फळ होय. पार्लमेंट आणि सामान्य जनता यांच्या मनोविकाराचा फायदा घेऊन त्या द्वारें त्यांनीं ही खर्चाची बाबत देशाकडून कबूल करून घेतली.

जर्मनीच्या सरकारी नौकरींत मानाच्या जागा फक्त उच्च दर्जाच्या घरंदाज लोकांना मात्र मिळतात. असा समज सर्वत्र आहे; पण हा समज किती खोटा आहे, हें फॉं टिरपिट्झ यांच्या उदाहरणावरून चांगलें व्यक्त होतें. ब्रयांडनबर्ग परगण्यांतील ओडर नदीच्या कांठीं असलेल्या कुस्ट्रिन नांवाच्या गांवीं यांचा जन्म झाला. हा गांव समुद्रकिनाऱ्यापासून पुष्कळ लांब आहे. यांच्या घराण्यांत नाविक विद्या जाणणारा यापूर्वी कोणीहि नव्हता. यामुळें या विद्येचे कांहीं अनुवंशिक संस्कार यांच्या ठिकाणीं असण्याचा संभव नाहीं. हे सोळा वर्षांचे होईपर्यंत यांचा अभ्यास एका मध्यमप्रतीच्या शाळेंत झाला. यानतर ते प्राशियन आरमारांत शिरले. या वेळीं प्राशियन आरमार ह्मणजे कांहीं लहान पडावांचा समुदाय होता. चार वर्षें काम केल्यानंतर यांना लेफटेनंटचा हुद्दा मिळाला. आणि आपल्या वयाच्या पंचविसाव्या वर्षीं ते लेफटेनंट कमॉंडर झाले. आरमारांत हा हुद्दा विशेष महत्त्वाचा आहे, असें नाहीं; तथापि या हुद्यांवर असतां यांच्या बुद्धीचा कुशाग्रपणा उघडकीस येऊ लागला. स्वतःच्या मतांची छाप आपल्या वरच्या व खालच्याहि अम्मलदारांवर बसविण्याची यांची हातोटी याच वेळीं उघडकीस आली. त्यांचा भावी आयुष्यक्रम कशा प्रकारें जाणार हें याच वेळीं ठरलें, असें ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं. केवळ दृश्य स्थितीच्या पलीकडे पाहण्यास अवश्य असणारी दूरदृष्टि यांच्याइतकी त्या वेळीं दुसऱ्या कोणासहि नव्हती. आरमारासंबंधीं नव्या नव्या कल्पना काढून त्यांचा प्रसार करण्याचा व त्या अमलांत येण्यासाठीं अनुयायी मिळविण्याचा उपक्रम त्यांनीं सुरू केला. या वेळीं त्यांस जे अनुयायी मिळाले, ते त्यांच्यापेक्षांहि अधिक उत्साहानें त्यांच्या मसलती पार पाडण्यासाठीं उद्योग करूं लागले. आरमारी बाबतींत यांनीं सर्वांच्या आघाडीस असावें, असा जणूं काय ईश्वरी संकेतच होता. प्राशियाच्या लष्करांत आणि नुकत्याच जन्मास आलेल्या आरमारांत जुनाट लोकांचें या वेळीं बरेंच वर्चस्व असे. त्यांचा मोठेपणा मुख्यतः त्यांच्या जुनाटपणावरच अवलंबून असे आणि एवढ्याच कारणासाठीं सामान्यजनताहि त्यांचा मोठेपणा कबूल करीत असे; पण फॉं टिरपिट्झ हे या सामान्य

नियमास अपवाद होत. जुनें तें सोनें असें ह्मणण्याची प्रवृत्ति यांनीं प्रथम साफ झुगारून दिली. या त्यांच्या गुणामुळें त्यांना उत्तम प्रकारचे अनुयायी मिळूं लागले. आरमारांत मानाच्या जागा मिळण्यास केवळ आंगचे गुणच उत्तम असावे लागतात, तें तत्त्व प्रथम यांनीं अमलांत आणलें. मोठें घराणें, श्रीमंत अथवा इतर बाबी या वास्तविक फारशा किंमतीच्या नाहींत, असें यांनींच स्पष्ट केलें.

इ. स. १८९१ मध्यें फॉं टिरपिट्झ हे कील ठाण्याच्या मुख्य अधिपतीच्या जागीं आले. जर्मनीच्या सर्व आरमारी कारभाराचें कील हें मुख्य ठाणे आहे. या जागीं आल्यामुळे आरमाराची संघटना आणि त्यांतील नव्या प्रकारच्या रचना करण्यास लागणारी जी बुद्धिमत्ता यांज-पाशीं होती, तिच्या कार्यास चांगलाच अवसर मिळाला. त्यांनीं प्रथम टारपेडो ( आगमाशाचें ) खातें हातीं घेतले. या खात्यांत पुष्कळ नवीन सुधारणा अमलांत आणून लवकरच त्यांनीं तें पहिल्या प्रतीचे खातें बनविलें. जर्मनीच्या आरमारांत एकदर प्राविण्याबद्दल या खात्याचा मोठा लौकिक आहे. इतर राष्ट्रांच्या आरमारांनींहि जर्मनीच्या या खात्याचें प्राविण्य कबूल केले आहे. जर्मनीचें हे खातें इतक्या नांवलौकिकास येण्यास मुख्यतः फॉ टिरपिट्झ याचेच श्रम कारणीभूत झाले आहेत. हें खातें यांनीं हातीं घेतलें, त्या वेळीं जर्मन आरमाराच्या या शाखेंत मठभर लहानशा होडक्यांचा ताफा मात्र होता. यांतूनच त्यांनीं आपल्या कौशल्यानें नवा शक्तिमान ताफा निर्माण केला. आगमाशाच्या विद्येंत लागणारी कुशलता ज्यांच्या आंगीं उपजतच आहे, असे आरमारी कामगार त्यांनीं निवडून काढले आणि अविरत उद्यमानें व उत्साहानें त्यांनीं या काम-गारास त्यांच्या कलेंत निष्णात करून सोडलें. जर्मन आरमाराच्या या खात्यांत जी प्रवीणता आज आढळून येते, तिचा प्रारंभ अशा रीतीनें झाला आहे. अशा रीतीनें आगमाशाच्या विद्येंत त्यांनीं नव्या मन्वंतरास सुरवात केली व आरमाराची ही शाखा पूर्णावस्थेस आल्यानंतर त्यांनीं आपलें लक्ष खात्याच्या अंतर्रचनेकडे लावलें. खात्याच्या रचनेंत ज्या कांहीं उणीवा त्यांच्या नजरेस येत, त्यांजवर ते निर्भीडपणें टीका करीत.

बर्लिन येथील आरमारी कचेरी आणि बाल्टिक समुद्रावरील आरमारी ठाणीं याच्यात जें नातें या वेळीं होते, त्यावर त्यांनीं पुष्कळ कडक टीका केली. बर्लिन येथील आरमारी सेक्रेटरी व आरमारचे मुख्य अधिकारी यांजमधील संबंध कसे असावेत याची नवीन दिशा त्यांनीं शोधून काढली. या वेळीं त्यांना बर्लिन येथील आरमारी खात्यांतच जागा मिळाली. त्यांच्या उपपत्ती प्रत्यक्ष व्यवहारांत कितपत टिकतात, हें पाहण्याची संधि प्राप्त झाली. त्यांच्या कडक टीकेमुळें त्यांना शत्रूहि कांहीं कमी नव्हते. त्यांना कमीपणा आणण्याची संधि ते पहातच होते; पण स्वतःच्या अंगीकृत कार्यांत यश मिळविण्याची विद्या फॉ टिरपिट्झ यांस पूर्ण साध्य झाली होती. शत्रूंनीं केलेल्या अनेक कारस्थानांस भीक न घालतां त्यांनीं आपलें ह्मणणे खरें केले. आपल्या उपपत्ती अव्यवहार्य नाहींत, ही गोष्ट त्यांनीं अवघ्या दोन वर्षांच्या अवधींत सिद्ध केली. या दोन वर्षांनंतर लवकरच त्यांना व्हाईस ॲडमिरल हे मानाचें पद प्राप्त झालें. एकंदर आरमारी खात्यांतहि त्यांनीं चांगले नांव मिळाविलें होते. आरमारी खात्यांतील लोक त्यांना 'डर मिस्टर' या लाडक्या नांवानें संबोधित असत. या जर्मन शब्दाचा अर्थ धनी किंवा मालक असा आहे. यावरून एकंदर खातें यांना किती मान देत असे, हे उघड दिसून येतें.

फॉ टिरपिट्झ हे आतां अधिकारसंपन्न झाले होते; तथापि स्वतःच्या परिस्थितीकडे पाहण्याची त्यांची दूरदृष्टि या वेळीं भविष्यकाळाचा ठाव काढीत होती. खात्याच्या अंतर्रचनेची सुधारणा करण्याचें अत्यंत अवघड काम पुरें केल्यानंतर जर्मनीच्या नांवलौकिकास साजेल, असें नवें आरमार निर्माण करण्याच्या उद्योगास ते लागले. जर्मनीची औद्योगिक उत्क्रांति या वेळीं पूर्ण भरास आली होती. देशाचा समुद्रावरील व्यापार एकसारखा वाढत्या प्रमाणावर होता. व्यापारी आगबोटींची भर एक-सारखी पडत होती. प्रचंड आरमाराचें महत्त्व लोकांच्या मनांत उत्पन्न करून देण्यास ही संधि फार चांगली आहे, असें फॉ टिरपिट्झ यांना आढळून आलें. त्यांच्या या उपक्रमास प्रोत्साहक अशी आणखी एक नवीन गोष्ट या संधींत घडून आली. १८९९ सालच्या पावसाळ्यांत

प्रसिद्ध बंडस्रात प्रकरण उपस्थित झालें. जर्मनीची बंडस्रात नांवाची टपाली आगबोट आफ्रिकेकडे जात असतां एका इंग्लिश आरमारी जहाजानें तिला वाटेंत अडविलें. जर्मनीला आरमारी पाठबळ नसल्यामुळें जर्मनीचा समुद्रावरील व्यापार अगदीं असंरक्षित स्थितींत आहे, असें फॉ टिरपिट्झ यांनीं लोकांच्या मनांत भरवून दिलें. बंडस्रात प्रकरणाचा फायदा घेऊन साऱ्या देशभर त्यांनीं चळवळीस सुरवात केली, जर्मनीला मोठ्या आरमाराची अत्यंत आवश्यकता आहे, अशा अर्थाचीं व्याख्यानावर व्याख्यानें जिकडे तिकडे झडूं लागलीं. या प्रकरणावरून त्यांनीं लोकांत देशाभिमानाची एवढी लाट उसळून दिली कीं, १९०० सालींच नवा आरमारी कायदा जन्मास आला. हा कायदा पास झाल्याबरोबर त्यांना फॉ हें अत्यंत मानाचे उपपद प्राप्त झालें.

फॉ (von) ही पदवी जर्मनींतल्या वंशपरंपरेच्या सरदारकीची निदर्शक आहे. १९०२ सालीं नव्या कायद्याप्रमाणें तेरा हजार टनाचें बॅंश्विग नांवाचें नवें प्रचंड जहाज समुद्रांत ढकलण्यांत आलें आणि त्या वेळीं फॉ टिरपिट्झ हे दुय्यम ॲडामिरलचे पूर्ण ॲडमिरल झाले. १९०७ सालीं त्यांनीं आणखी एक नवा आरमारी कायदा पास करून घेतला. सामान्य जनतेंत त्यांनीं आपलें नांव इतकें वाढविलें होतें कीं, त्यांचा कायदा नापास करणें, जर्मन पार्लमेंटास शक्य नव्हतें. या नव्या कायद्याप्रमाणें जहाजाचा आकार व वजन वाढवून दरवर्षी चारांऐवजीं सहा जहाजें बांधण्याचें ठरविण्यांत आलें. फॉ टिरपिट्झ यांच्या या कामगिरीनें बादशहा इतके खूष झाले, कीं, त्यांनीं त्यांस ब्लॅकईगलचें पदक मोठ्या समारंभानें अर्पण केलें. हा मान जर्मनींत अत्यंत मोठा समजला जातो.

फॉ टिरपिट्झ हे इंग्रज राष्ट्राचे द्वेष्टे आहेत, हें ह्मणणें अगदीं चुकीचें आहे. असें ह्मणणें ह्मणजे त्यांच्या नांवास निष्कारण कलंक लावण्यासारखें आहे. ब्रिटिशांच्या द्वेषाची कल्पनाहि कधीं त्यांस शिवली नाहीं. उलट पक्षीं इंग्रजांचे ते मोठे चहाते आहेत. त्यांच्या सर्व मुलांचें शिक्षण इंग्लंडांत झालेलें आहे. इंग्रजी राष्ट्राच्या नौकानयनाच्या पूर्वापर इतिहासाचें

